


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
राज्य मराठी विकास संस्था
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

'नवी क्षितिजे' हे मराठीतील एक महत्त्वाचे नियतकालिक (त्रैमासिक) असून ते सद्यस्थितीत कार्यरत नाही. संस्थेच्या उपरोक्त प्रकल्पातंर्गत 'नवी क्षितिजे' ह्या नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीकरण करता येणे शक्य असल्याने सदर नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीकरण करून संस्थेच्या संकेतस्थळावर उपलब्ध करून देण्यासाठी राज्य मराठी विकास संस्थेद्वारे सदर नियतकालिकाचे संपादक व मालक स्मृतिशेष श्री. नाना जोशी ह्यांच्या कन्या श्रीमती शर्मिला जोशी ह्यांना विनंती करण्यात आली होती.

सदर विनंतीस श्रीमती शर्मिला जोशी ह्यांनी मान्यता दिल्यामुळे आणि सदर नियतकालिकाचे अंक उपलब्ध करून दिल्यामुळे 'नवी क्षितिजे' ह्या नियतकालिकाच्या (त्रैमासिक) अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देणे शक्य होत आहे.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे/ नियतकालिकांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था, मुंबई आणि नवी क्षितिजे संपादक-मंडळ यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे, कलावंतांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्व राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे नसतील.

अनुक्रमणिका




**संपादक**
श्री. नाना जोशी

**रचना**
हर्मिष देव्हारे

**अक्षरजुळणी**
अभिजित पंडित

**मुद्रण व्यवस्था**
संतोष राणे
शारदा ऑफसेट, ठाणे.

**मुखपृष्ठ**
हर्मिष देव्हारे

**मालक, मुद्रक, प्रकाशक आणि पत्रव्यवहार**
श्री. नाना जोशी
४ अ, सोमणनगर,
क्रांतीवीर भाई बालमुकुंद मार्ग,
मुंबई - ४०० ०१२.

# नवी क्षितिजे

अंक ५६ – २००३

## अनुक्रमणिका



**नवी क्षितिजे संबंधी**

* सुट्या अंकाची किंमत रुपये १५०/-
* ५३, ५४, ५५ व ५६ अशा चार अंकांची किंमत रु. २०१
* प्रत्येक अंकाची पृष्ठसंख्या सुमारे १७० ते १७५
* वर्गणी मधल्या अंकापासून स्वीकारली जाणार नाही. थोडक्यात ५० या अंकासाठी वर्गणी पाठवल्यास ४९ व्या अंकापासूनच अंक पाठविण्यात येईल.

## संपादकीय

नवी क्षितिजेचा ५६ वा अंक. या अंकात पहिला लेख **कॉलेट डाऊलिंगने** ज्यास 'सिंड्रेला गंड' हे नाव दिले आहे त्या संबंधी डॉ. प्रतिभा कणेकर यांनी शोधक बुद्धीने विवेचन केलेले आहे. ते वाचकास 'स्त्री स्वातंत्र्य चळवळी'बद्दल नवीच दृष्टी प्राप्त करून देईल. एक जुनी फ्रेंच म्हण आहे त्याची आठवण काही वाचकांना होईल. 'गोष्टी बदलतात पण त्या खरे म्हणजे पूर्वी होत्या तशाच राहतात.' असा त्या म्हणीचा मतीतार्थ आहे. दुसरा लेख सिंगमंड फ्राईड हे वैज्ञानिक की कवी नवी कल्पना करणारे व्युत्पन्न पंडित याविषयी आहे. तो सर्वस्वी नव्या दृष्टीकोनातून लिहलेला आहे असे नवी क्षितिजेच्या आजवरच्या वाचकास आढळून येईल. 'आधुनिकीकरणाचे गतिशास्त्र' ही लेखमाला या अंकापासून चालू होत आहे. 'आधुनिकीकरण' हा शब्दप्रयोग आपण अनेक वेळा ऐकतो व वाचतोही. पण त्याचा नेमका अर्थ काय आहे हे तो शब्द वापरणाऱ्या कोणासही माहित नसते. या लेखमालेने त्या शब्दाची व्याप्ती व त्याच्या मर्यादा कळण्यास मदत होईल अशी अपेक्षा. प्रासंगिक टिपणीत प्रख्यात तत्त्वज्ञ कार्ल पॉपर यांची शेवटची मुलाखत देण्यात आलेली आहे. कार्ल पॉपर यांचे "मुख्य समाज आणि त्याचे शत्रू' या ग्रंथाची आता अभिजात साहित्यात गणना केली जाते. हा तत्त्वज्ञ वयाच्या ९० व्या वर्षी देखील किती स्पष्टपणे व मूलगामीपणे विचार करीत होता याची साक्ष ती त्यांची शेवटची मुलाखत आहे. या मुलाखतीनंतर ते थोड्याच दिवसानी कालवश झाले. दुसरे प्रासंगिक टिपण "वैज्ञानिक समीकरण हे सुंदर असलेच पाहिजे" असा जगतविख्यात शास्त्रज्ञ आईनस्टाईन यांचा आग्रह होता. त्याबद्दल हे महान शास्त्रज्ञ नेमके काय सांगत होते हे वाचावयास मिळेल. हे सर्व साहित्य 'नवी क्षितिजे'च्या साक्षेपी व रसिक वाचकाच्या पसंतीस उतरेल अशी अपेक्षा आहे.

हा अंक ५३ ते ५६ या चौदाव्या खंडातील शेवटचा अंक. 'नवी क्षितिजेच्या वर्गणीदारानी' आपल्या वर्गणीचे नुतनीकरण करावे ही विनंती.

नवी क्षितिजेला अनेकांचे सहाय्य झालेले आहे. प्रथम वर्गणीदार, केव्हा तरी निघणाऱ्या 'नवी क्षितिजे'ला आपला सक्रीय पाठिंबा देत राहिले याबद्दल, श्री. अभिजित पंडित यांनी अंकाची सुलभ देखणी छपाई कशी होईल याची व्यवस्था केल्याबद्दल, सौ. सुमती जोशी, श्री. विठ्ठल गोठणकर, श्री. श्रीकृष्ण खोत, डॉ. प्रतिभा कणेकर यांनी वेळात वेळ काढून लिहिल्याबद्दल, **एलनॉर केलेमन** (ELEANOR KELEMEN) मुरसटाऊन (MOORES TOWN N. J. U. S. A) न्यू जर्सी, यु. एस. ए. यांनी वेळोवेळी अनेक ग्रंथ पाठविल्याबद्दल, नवी क्षितिजे या सर्वांचा मन:पूर्वक आभारी आहे. आपल्या हाती हा अंक पडेल तेव्हा इ. स. २००४ला सुरुवात झालेली असेल आपणा सर्वांना नव्या वर्षाच्या शुभेच्छा !

**-- नाना जोशी**

---

अनुक्रमणिका

# समाजशास्त्र व स्त्री स्वातंत्र्याची चळवळ

## सिंड्रेला गंड अर्थात स्त्री मनात दडविलेले स्वातंत्र्याविषयीचे थर

- डॉ. प्रतिभा कणेकर

प्रस्ताव

एक मूल्य म्हणून 'स्त्री-स्वातंत्र्या'चा जगाने स्वीकार केला तरी स्त्रीमुक्तीची वाट सहज सोपी नव्हती. पुरुषसत्ताक समाजप्रणालिने सहजपणे, आचारात स्त्रीला स्वातंत्र्य मिळू द्यायचे नाही म्हणून आपली वेगळी रणनीती आखणे ही गोष्टही एकवेळ समजण्यासारखी आहे परंतु स्त्रीस्वातंत्र्याची जाणीव झालेली आधुनिक स्त्री देखील स्वातंत्र्याचे भय अंतर्मनात वाळगताना दिसते. यालाच कॉलेट डाऊलिंगने 'सिंड्रेला गंड' असे नाव दिले.

ही सिंड्रेला कोण? देशोदेशींच्या परीकथांमध्ये ती थोडी बहुत वेगवेगळी रूपे धारण करून आली आहे. बालवयापासून ती परिचित होते ती एक सुंदर, चांगल्या स्वभावाची, गरीब, अन्यायाची बळी ठरलेली मुलगी म्हणून. जेव्हा एक राजपुत्र घोड्यावरून येतो आणि बायको म्हणून तिला घेऊन जातो तेव्हाच तिची दु:खातून सुटका होते.

मुळात सिंड्रेलाची गोष्ट ही परीकथा किंवा बालकथा नाही. ग्रीम बंधूंनी युरोपभरातून गोळा केलेल्या सुमारे दोनशे लोककथांतील ही एक लोककथा आहे. इ. स. १८५३ मध्ये ग्रीम बंधूंच्या या सर्व कथा ग्रेट ब्रिटनमध्ये प्रथम प्रसिद्ध झाल्या. नंतर १९८४त चॅन्सलर प्रेस, लंडनने नव्या रूपानं त्याची दुसरी आवृत्ती काढली, नंतर जगभर त्याच्या अनेक आवृत्त्या निघाल्या. १९८९ मध्ये ऑस्ट्रियात पुनर्मुद्रित झालेल्या या पुस्तकातून मूळच्या सिंड्रेलच्या गोष्टीचा हा अनुवाद केला आहे.

लोककथेत लोकमानस अतिशय स्थूलपणे परंतु स्पष्टपणे उमटत असते. 'सिंड्रेला गंडा'च्या संदर्भात सिंड्रेलाच्या गोष्टीकडे नव्याने बघताना स्त्रीला घडवणारे लोकमानस कसे होते त्याची चांगली कल्पना येते. 'चांगले वागणे' ची व्याख्या "मुकाट्याने अन्याय सहन कर. रड. पण तू स्वत: अन्यायाचा प्रतिकार करू नकोस. हवी तर इतरांकडे मदतीची याचना कर. अशी दिसते. कुटुंबातील सत्त-संघर्षाचे एक रूप समोर येते. स्त्रीचे शरीर सौंदर्य किती महत्त्वाचे ठरत होते ते लक्षात येते. सावत्र आईने बुटात बसण्यासाठी आपल्या मुलींची पावले कापणे हेही प्रतीकात्मक ठरते.

आणि पहिल्याच दिवशी मुक्त होण्याची संधी मिळाली असता सिंड्रेलाला कोणते भय आडवत होते? हा प्रश्नही अस्वस्थ करतोच.



अनुक्रमणिका

## १. सिंड्रेला

एकदा काय झालं, एका गावामध्ये एका श्रीमंत माणसाची बायको खूप आजारी पडली. आता काही आपण वाचत नाही हे तिला कळून चुकलं. तशी आपल्या एकुलत्या एका मुलीला तिनं आपल्या उशाशी बोलावलं आणि ती म्हणाली, "सोनुले, नेहमी चांगली वाग आणि श्रद्धाळू राहा; म्हणजे तो दयाळू परमेश्वर नेहमी तुझं रक्षण करील आणि स्वर्गातून मी नेहमीच तुझ्याकडे बघत असेन आणि तुझा विचार करत असेन." असं म्हणताना तिने डोळे मिटले आणि काही वेळातच तिचा प्राण गेला.

ही मुलगी रोज आईच्या थडग्यापाशी जायची आणि रडायची. ती आईने सांगितल्याप्रमाणे सगळ्यांशी खूप चांगलं वागायची आणि देवावर श्रद्धा ठेवायची. हळूहळू थंडीचे दिवस आले आणि तिच्या आईच्या थडग्यावर बर्फ साठला, मग वसंत ऋतू आला आणि थडग्यावरचा बर्फ वितळायला लागला आणि इकडे तिच्या वडिलांनी दुसरे लग्न करून नवीन बायको घरी आणली.

या बायकोने येताना आपल्याबरोबर आपल्या आधीच्या दोघी मुलींनाही आणले. त्या मुली गोऱ्यापान आणि दिसायला सुंदर होत्या पण मनाने अतिशय दुष्ट होत्या. आता या गरीब बिचाऱ्या मुलीच्या आयुष्यात दुर्दैवाचे पर्व चालू झाले. "शी ! ही मूर्ख मुलगी आता आपल्याबरोबर राहणार की काय?" त्या दोघी आपसात म्हणाल्या. "आता प्रत्येकानं आपल्या खाण्यासाठी स्वत:चं स्वत: मिळवलं पाहिले, हवं तर तू स्वयंपाकाचं काम कर." असं तिला म्हणत त्यांनी तिचे छान, स्वच्छ कपडे काढून घेतले; तिला एक मळका झगा दिला आणि साधे लाकडी बूट तिला घालायला दिले. "आता कशी राजकन्या शोभून दिसते पाहा तरी !" तिला वेडावून दाखवत त्या म्हणाल्या आणि त्यांनी तिला स्वयंपाकघरात रवानगी केली. बिचारी आता पहाटेपासून रात्रीपर्यंत कष्ट करू लागली. तिला लवकर उठून पाणी भरावे लागे, विस्तव पेटवावा लागे, अन् स्वयंपाक करून सर्व आवराआवरी करावी लागे. शिवाय त्या बहिणी जमेल तिथे तिचा अपमान करायच्या, तिची थट्टा करायच्या आणि मुद्दाम तिच्यासाठी कामं वाढवून ठेवायच्या. रात्री ती दमायची पण त्या तिला बिछान्यावर झोपू द्यायच्या नाहीत. तिला बळजबरीने चुलीजवळच्या राखेत बसायला लावायच्या आणि ती घाणेरडी दिसते म्हणून त्यांनी तिचे नाव ठेवले 'सिंड्रेला.' Cinder चा अर्थ फुफाटा, भट्टीतील विझत आलेला कोळसा, राख त्यात तिला बसणे भाग पाडले म्हणून ती सिंड्रेला.

एकदा त्यांचे वडील एका जत्रेला जायला निघाले. त्यांनी त्या दोघी मुलींना विचारलं, "तुमच्यांसाठी काय आणू?" एक म्हणाली, "छान छान कपडे आणा." दुसरी म्हणाली, "मला मोती आणि हिरे आणा." "आणि तुला ग सिंड्रेला काय आणायचं?" "तुम्ही घरी

यायला निघाल निघाल तेव्हा तुमच्या हॅटला पहिल्यांदा जो फुलांचा गुच्छ अडकेल तो तुम्ही माझ्यासाठी आणा.'' ती म्हणाली. परत येताना वडिलांनी एकीसाठी छानसे कपडे आणले. दुसरीसाठी मोती-हिरे आणले. सिंड्रेलाला त्यांनी एक हेझलची (Hazel-nuts चे हे झाड आहे) डहाळी दिली. तिने त्यांचे खूप खूप आभार मानले आणि आपल्या आईच्या थडग्याजवळ जाऊन तिने तिथे ती फांदी लावली. आणि ती इतकी रडली, इतकी रडली की तिच्या अश्रूंनी त्या रोपाला पाणी घातले गेले आणि त्याचे एक सुंदर मोठे झाड झाले. दिवसातून तीन वेळा सिंड्रेला झाडाखाली जाऊन रडायची आणि प्रार्थना करायची, अन् प्रत्येक वेळी एक छोटासा पांढराशुभ्र पक्षी झाडावर असायचा. अन् एखाद्या गोष्टीचा तिने मोठ्याने उच्चार केला की तिला जे हवे असायचे ते तो तिच्यासाठी टाकायचा.

असे पुष्कळ दिवस गेले. त्या गावच्या राजाने तीन दिवसांचा एक उत्सव करायचा असे ठरवले. देशातल्या सर्व सुंदर मुलींना या समारंभासाठी आमंत्रित केले; कारण राजपुत्र त्यांच्यातून एकीची आपली वधू म्हणून निवड करणार होता. जेव्हा सिंड्रेलाच्या सावत्र बहिणींना ही बातमी समजली तेव्हा आपल्यालाही जायला मिळणार म्हणून त्यांना फार आनंद झाला. त्यांनी सिंड्रेलाला हाका मारून हुकूम सोडायला सुरुवात केली, ''आमचे केस विंचरून दे. आमचे बूट चकचकीत कर, आमच्या ड्रेसचे पट्टे नीट बांधून दे. अगं, आम्हाला राजवाड्यावर जायचंय ना !'' सिंड्रेलाने सगळी कामे केली. तिला रडू येत होते. कारण आपण पण जावे आणि राजवाड्यात नृत्य करावे असे तिला वाटत होते. म्हणून आपल्या सावत्र आईकडे तिने जाण्याची परवानगी मागितली.

''अगं बाई, अशी धुळीनं भरलेली, घाणेरडी, अशी का तू त्या समारंभाला जाणारेस? तुला ना नवे कपडे ना बूट; आणि तू कसली नृत्य करणार?'' पण ती जेव्हा पुन्हा पुन्हा विनवणी करायला लागली तेव्हा शेवटी आई तिला म्हणाली, ''हे बघ, मी आत्ताच टोपलीभर शेंगा राखेत भाजत ठेवल्या आहेत. दोन तासात त्या सगळ्या वेचून काढ अन् मग तू जा.''

तशी सिंड्रेला आईच्या खोलीतून मागच्या दरवाजाने परसदारी गेली आणि बागेत जाऊन तिने हाका मारायला सुरुवात केली, ''अरे अरे, पाळलेल्या कबुतरांनो, आणि पारव्यांनो आणि स्वर्गातल्या सर्व पक्षांनो, या रे या. मला मदत करा. राखेतनं चांगल्या शेंगा वेचून टोलीत भरा आणि किडक्या हव्या तर तुम्ही खा.'' लगेच स्वयंपाकघराच्या खिडकीतून आधी दोन कबुतरं आली, मग पारवे आले आणि मग सगळे पक्षी आले आणि किलबिल करत राखेत शेंगा शोधू लागले. टिप टिप टिप टिप करत त्यांनी सगळे [illegible] दाणे टोपलीत गोळा केले. एका तासात सगळे काम पूर्ण करून सगळे पक्षी पुन्हा उडून गेल. सिंड्रेला ती टोपली घेऊन सावत्र आईकडे गेली; मनातल्या मनात तिला आनंद झाला होता कारण आता तिला समारंभाला जायला मिळणार होते, पण आई म्हणाली, ''सिंड्रेला, तुझ्याजवळ चांगले



अनुक्रमणिका

कपडे नाहीत. तुला नाचता येत नाही. सगळे तुला हसतील. तू काही जाऊ नको.'' सिंड्रेला रडू लागली तशी तिची सावत्र आई म्हणाली, ''मी राखेत टाकीन त्या बिया स्वच्छ करून त्यांनी दोन टोपल्या तासाभरात भरून ठेवशील तर मी तुला त्यांच्याबरोबर जाऊ देईन.'' सिंड्रेलाला काही हे काम करता येणार नाही असे तिला वाटले. आईने राखेत बिया टाकल्यावरोवर सिंड्रेला मागीलदारी गेली आणि मगाशी जशा पक्षांना हाका मारल्या होत्या तशा हाका घालायला तिने सुरुवात केली, ''पाळलेल्या कबुतरांनो आणि पारव्यांनो, आणि स्वर्गातील सर्व पक्षांनो, माझ्या मदतीला या आणि सगळ्या चांगल्या बिया टोपल्यांत भरा. किडक्या बिया तुम्हाला हव्या तर तुम्ही खा. मग स्वयंपाकघराच्या खिडकीतून प्रथम दोन कबुतरं आली. पारवे आले, पाठोपाठ किलबिल करत सर्व पक्षी राखेवर उतरले. टिप् टिप् टिप् त्यांनी सुरुवात केली अन् सर्व बिया टोपलीत जमा केल्या. जेमतेम अर्ध्या तासात सगळ्या बिया वेचून देऊन सगळे पक्षी उडून गेले. सिंड्रेलाने ती टोपली घेतली आणि आता आपल्याला समारंभाला जायला मिळेल अशा आनंदात ती सावत्रआईकडे गेली. पण आई तिला म्हणाली, ''याचा काही उपयोग नाही. तुला आमच्याबरोबर येता यायचं नाही. तुझ्याजवळ चांगले कपडे नाहीत; अन् तुला नाचता येत नाही. आम्हाला तुझी लाज वाटेल.'' आणि तिला तिथेच टाकून आपल्या दोन्ही गर्विष्ठ मुलींबरोबर ती समारंभाला निघून गेली.

घरात सिंड्रेला एकटीच उरली; तेव्हा ती आपल्या आईच्या थडग्यापाशी, हेझलच्या झाडाखाली गेली आणि म्हणू लागली,

''प्रिय वृक्षा, हलव आणि सळसळव तुझी पाने
आणि चांदी अन् सोने फेक माझ्यासाठी त्वरेने''

मग त्या पक्षाने एक सोन्या-चांदीचा फ्रॉक तिच्यासाठी टाकला अन् चांदीच्या कलाबतून कशिदा काढलेल्या रेशमी सपाता खाली टाकल्या. घाईघाईने सिंड्रेलाने हा पोषाख परिधान केला आणि ती राजवाड्यात नृत्यासाठी गेली. तिच्या सावत्र बहिणींना आणि सावत्र आईला ती अजिबात ओळखू आली नाही. तिच्या सोनेरी फ्रॉकमध्ये ती इतकी सुंदर दिसत होती की त्यांना ती कुणी दूरदेशीची राजकन्याच वाटली. ती सिंड्रेला असू शकेल अशी त्यांना शंकाही आली नाही, कारण ती तर घरी चुलीपाशी राखेतल्या बिया निवडत बसली असणार होती. मग तो राजपुत्र तिच्याजवळ आला, अन् तिच्या हातात हात गुंफून तिला नृत्यासाठी घेऊन गेला, त्याने दुसऱ्या कुणाहीबरोबर नृत्य केले नाही अन् तिचा हात त्याने धरून ठेवला, कारण इतर कुणी तिला नृत्याबद्दल विचारले की तो म्हणे, ''ती माझी भिडू आहे.'' ते संध्याकाळपर्यंत नृत्य करीत राहिले. जेव्हा तिने घरी परतण्याची इच्छा प्रकट केली तेव्हा तो म्हणाला, ''थांब, मी तुला नीट घरी पोहोचवतो.'' कारण ती कुणाची मुलगी आहे ते त्याला पाहायचे होते. पण तरी ती निसटलीच आणि पटकन् उडून एका कबुतराच्या घरट्यात



अनुक्रमणिका

शिरली. वडिल येईपर्यंत राजपुत्र थांबला. ते आल्यावर तो म्हणाला, "ती विलक्षण मुलगी कबुतराच्या घरट्यात शिरली." आत्ता त्या सावत्र आईच्या मनात आले, "ही सिंड्रेला तर नसेल?" मग त्यांनी एक हातोडा आणला, राजपुत्राने कबुतराच्या घराचा दरवाजा तोडला. पाहिले, तर तिथे कुणी नाही. जेव्हा त्या तिघी घरी आल्या तर त्यांना दिसले की सिंड्रेला तिच्या घाणेरड्या कपड्यात चुलीजवळ बसली आणि बाजूला तेलाची चिमणी जळते आहे.

दुसऱ्या दिवशी जेव्हा तिच्या सावत्रबहिणी आणि आई समारंभाला गेल्या तेव्हा ही हेझलच्या झाडाकडे गेली आणि कालच्यासारखे गाणे तिने पुन्हा म्हटले,

"प्रिय वृक्षा, हलव आणि सळसळव तुझी पाने
आणि माझ्यासाठी सोने आणि चांदी टाक त्वरेने."

मग त्या पक्षाने कालच्यापेक्षा फारच सुंदर पोषाख तिच्यासाठी टाकला. जेव्हा ती नृत्यासाठी गेली तेव्हा तिचे सौंदर्य पाहून सर्वांना आश्चर्यच वाटले. तो राजपुत्र तिच्या येण्याचीच वाट पाहात होता. लगेच त्याने तिच्या हातात हात गुंफला आणि त्याने तिच्याबरोबरच नृत्य केले. दुसऱ्या कुणी तिला नृत्याबद्दल विचारल्यावर कालच्याप्रमाणेच त्याने उत्तर दिले, "ती माझी भिडू आहे." संध्याकाळ झाल्याबरोबर ती जाण्याची घाई करू लागली. राजपुत्र तिच्या मागोमाग धावला कारण, ती कुणाची मुलगी आहे ते त्याला पाहायचे होते. पण ती निसटली आणि बागेतल्या एका घरामागे गेली. तिथे झाडावर सुंदर, रसाळ पेअर लटकत होते अन् खारी फांद्यांवरून सरसरत होत्या. पण राजपुत्राला काही ती दिसली नाही. तो वडिल येईपर्यंत उभा राहिला. ते आल्यावर तो त्यांना म्हणाला. "ती विलक्षण मुलगी माझ्यासमोरून निसटलीच. मला वाटतं ती या झाडावर चढली." वडिलांच्या मनात आले, "ती सिंड्रेला तर नसेल?" मग एक कुऱ्हाड घेऊन त्यांनी झाडाचे तुकडे तुकडे केले पण तिथे कुणीच नव्हते. जेव्हा ते घरात पोचले तेव्हा सिंड्रेला कालच्या प्रमाणेच आपल्या मळक्या पोषाखात चुलीजवळच्या राखेत बसली होती.

तिसऱ्या दिवशी जेव्हा तिची सावत्र आई आणि बहिणी बाहेर पडल्या तेव्हा सिंड्रेला आपल्या आईच्या थडग्याशी गेली आणि म्हणाली,

"प्रिय वृक्षा, हलव आणि सळसळव तुझी पाने
आणि चांदी आणि सोने टाक माझ्यासाठी त्वरेने"

मग पक्षाने इतका सुंदर आणि चमकदार पोषाख टाकला की तसा या पूर्वी तिने घातलाच नव्हता अन् त्यावर तर खरेखुरे सोने होते. जेव्हा ती दरबारात आली तेव्हा कुणाच्या तोंडून शब्द उमटेना, आणि राजपुत्र एकटा तिच्याचबरोबर नृत्य करत राहिला अन् कुणी तिला नृत्याबद्दल विचारले की तो म्हणे, "ती माझी भिडू आहे." संध्याकाळ झाली तशी ती जायला निघाली. राजपुत्र तिचा पाठलाग करू लागला. ती इतक्या वेगाने धावत

सुटली की त्याला तिच्यापर्यंत पोहोचता येईना. पण आज त्याने एक युक्ती केली होती आणि तिच्या वाटेत पिचेस पसरले होते. त्यामुळे धावताना तिचा एक बूट निसटून पडला. राजपुत्राने तो उचलला. तो अगदी लहानसा अन् डौलदार होता अन् खऱ्या सोन्याचा होता. मग दुसऱ्या दिवशी तो तिच्या वडिलांकडे गेला आणि त्यांना म्हणाला, 'जिच्या पायात ही सोन्याची चप्पल बरोबर बसेल तीच माझी बायको होईल.' त्या दोघी बहिणींना खूप आनंद झाला कारण त्यांची पावलं खूप सुंदर होती. मोठ्या बहिणीने तो वर उचलला आणि आपल्या पायाला येतो का हे पाहण्यासाठी ती आपल्या खोलीत येऊन गेली; तिची आई बाजूला उभी राहिली. मुलीचा अंगठा काही त्या शिरेना तेव्हा आई लगबगीने सुरी घेऊन आली आणि मुलीला म्हणाली, "कापून टाक तो अंगठा. तू राणी झाल्यावर तुला पावलाची काय गरज पडणार आहे?' मुलीने अंगठा कापला आणि आपले पाऊल कसेबसे बुटात कोंबले. सगळ्या वेदना मुकाट्याने सहन करत ती राजपुत्राकडे गेली. त्याने आपली वधू म्हणून तिला घोड्यावर बसवले; आणि तो निघाला. ते जेव्हा थडग्याजवळून जात होते तेव्हा तिथल्या हेझलच्या झाडावर दोन छोटे शुभ्र पारवे बसले होते अन् ते गात होते,

मागे वळून पहा, मागे वळून पहा
रक्ताचे थेंब दिसतील चपलेवर
चप्पल किती लहान, पाऊ मोठे फार
नव्हे तुझी वधू ती, घोड्यावर.

तेव्हा राजपुत्राने मागे वळून पाहिले, तर त्याला तिच्या अंगठ्यातून रक्त वाहताना दिसले. त्याने घोडा तसाच वळवळा, "ही माझी वाग्दत्त वधून नव्हे" म्हणून तिला घरी आणून सोडले. नंतर दुसऱ्या बहिणीने तो बूट उचलला आणि ती प्रयत्न करायला आपल्या खोलीत गेली. तिचा अंगठा त्यात पटकन् शिरला पण तिची टाच खूपच मोठी होती. आईने लगेच सुरी आणि आणि ती म्हणाली, "तुझ्या टाचेचा एक तुकडा कापून टाक. एकदा तू राजाची राणी झालीस की तुला कुठे दूरवर चालावे लागणार आहे?" आईने तिच्या टाचेचा एक तुकडा कापला आणि तिचे पाऊल बुटात कोंबले. आपल्या वेदना लपवत ती खाली राजपुत्राकडे आली. त्याने तिला आपली वधू म्हणून घोड्यावर बसवली आणि घोड्याला टाच मारली. ते जेव्हा हेझलच्या झाडाजवळून जाऊ लागले तेव्हा झाडावर बसलेले दोन लहानसे शुभ्र पारवे गाणे गाऊ लागले,

"मागे वळून पहा, मागे वळून पहा
रक्ताचे थेंब दिसतील चपलेवर
चप्पल किती लहान, पाऊल मोठे फार

नव्हे तुझी वधू ती, घोड्यावर.

त्याने मागे वळून पाहिले. तर तिच्या बुटावरून ओघळणारे रक्त त्याला दिसले आणि मोजा रक्ताने पूर्ण माखलेला दिसला. मग त्याने आपला घोडा वळवला. या खोट्या वधूला घरी आणून सोडले. "ही सुद्धा माझी खरी वाग्दत्त वधू नाही. तुम्हाला आणखी एक मुलगी आहे का?" त्याने विचारले. "नाही." वडिल म्हणाले. "माझ्या पहिल्या पत्नीची मुलगी आहे. सिंड्रेला. पण ती लहान आहे. ती काही वधू होऊ शकणार नाही." राजपुत्र म्हणाला, "तिला आणा तर खरं." त्यावर सावत्र आई म्हणाली, "छे ! छे ! ती अगदी घाणेरडी आहे. तिला तुमच्यापुढे आणायचीही मला लाज वाटेल." पण राजपुत्राने हट्टच धरला तेव्हा सिंड्रेलाला बाहेर बोलावले गेले. प्रथम हात-पाय-तोंड धुवून ती समोर आली. राजपुत्राने तिला तो सोन्याचा बूट दिला. सिंड्रेला तिथेच स्टुलावर बसली. आपला जड लाकडी बूट काढून तिने हा बूट घातला, अन् तो तिला अगदी बरोबर बसला. तो घालून ती जेव्हा उभी राहिली तेव्हा राजपुत्राने तिच्या चेहऱ्याकडे पाहिले. हिच्याबरोबरच आपण नृत्य केले होते हे त्याच क्षणी त्याला आठवले. तो उद्गारला, "हीच माझी खरी वधू." सावत्रआई आणि तिच्या दोघी मुलींना धक्काच बसला, त्या पांढऱ्याफटक् पडल्या. मग राजपुत्राने तिला घोड्यावर बसवली आणि घोड्याला टाच मारली. ते जेव्हा हेझलच्या झाडाजवळून जाऊ लागले तेव्हा ते दोन लहानसे शुभ्र पारवे गाऊ लागले.

मागे वळून पहा, मागे वळून पहा
थेंबही नाही रक्ताचा चपलेवर
किती बरोबर बसलीय चप्पल,
हीच तुझी वधू रे, घोड्यावर.

गाणं संपल्यावर ते उडून सिंड्रेलाच्या खांद्यावर येऊन बसले. अन् तिच्याबरोबर राजवाड्यात गेले. तिथे सिंड्रेलाचे आणि राजपुत्राचे मोठ्या थाटामाटात लग्न झाले आणि सिंड्रेलाशी दुष्टपणे वागल्याबद्दल तिच्या दोघी बहिणींना आंधळे करण्याची शिक्षा दिली गेली.

## (२) सिंड्रेला गंड अर्थात स्त्रीमनात दडलेले स्वातंत्र्याविषयीचं भय

पाश्चात्त्य जगात इ. स. १९६० च्या सुमारास स्त्रीस्वातंत्र्याची चळवळ सुरू झाली, त्या गोष्टीला आता चाळीस वर्षे उलटली आहेत. स्त्रीस्वातंत्र्याच्या विचाराची वेगवेगळ्या परिप्रेक्ष्यांमधून मांडणी करतांना उदारमतवादी स्त्रीवाद, जहाल स्त्रीवाद, मार्क्सवादी स्त्रीवाद, समाजवादी स्त्रीवाद, अफ्रो-अमेरिकन स्त्रीवाद, तिसऱ्या जगातील स्त्रीवाद असे स्त्रीवादी विचाराचे अनेक पैलू मांडले गेले; व त्यातून स्त्रीवादी विचार अनेकांगांनी विकसित होत

गेला. स्त्रीच्या घरकामाचे मूल्य, स्त्रीच्या शरीरावर तिचा हक्क, स्त्रीला आर्थिक स्वातंत्र्य, स्त्रीचे निर्णयस्वातंत्र्य, स्त्रीचे सक्षमीकरण हे आज स्त्रीस्वातंत्र्याच्या संदर्भात सर्वमान्य झालेले महत्त्वाचे मुद्दे आहेत. इ. स. १९९० च्या दशकात पुरुषकेंद्री समाजव्यवस्था व पुरुषकेंद्री अभ्यासशाखा यांच्या पुनर्रचनेची मागणी होऊ लागली आहे. व त्याचा एक भाग म्हणून 'स्त्रीत्व' व 'पुरुषत्व' या संकल्पनाही तपासून पाहिल्या जात आहेत.

सैद्धांतिक पातळीवर स्त्रीवादी विचार असा प्रगत होत असताना प्रत्यक्षात स्त्रीच्या संदर्भात काय स्थिती आहे. याचाही अभ्यास दुसऱ्या पातळीवर चालूच आहे. भारताच्या संदर्भात हुंडा, सती, स्त्रीचे आर्थिक व शारीरिक शोषण, पुरुषाच्या व्यवसाधीनतेचे स्त्रीवरील परिणाम, हिंसा व स्त्री, मूलतत्त्ववाद व स्त्री या समस्यांवर अभ्यासकांनी लक्ष केंद्रित केले आहे. पाश्चात्य जगातही स्त्रीच्या दुय्यमत्वाची कारणे व त्यावर उपाय शोधण्याचे प्रयत्न होतच आहेत.

इ. स. १९७०-१९८० च्या दशकात मनोविश्लेषणशास्त्राचा आधार घेऊन स्त्रीच्या मानसिकतेचा शोध घेण्याचा प्रयत्न चालू होता. त्या टप्प्याकडे माझे लक्ष वेधले गेले एका लहानशा पुस्तकामुळे. त्या पुस्तकाचे शीर्षक आहे The Cindrela Complex व त्याचे उपशीर्षक आहे Women's Hidden Fear of Independence न्यूयॉर्कमध्ये इ. स. १९८१ त प्रसिद्ध झालेल्या या पुस्तकाची इ. स. १९८२ त पॉकेटबुक आवृत्ती निघाली आहे.

कॉलेट डाऊनिंग ही मुक्तपत्रकारिता करणारी स्त्री या पुस्तकाची लेखिका आहे. आपल्या स्वत:च्या व्यक्तिगत जीवनातील अनुभव, आपल्या भोवतालच्या स्त्रियांचे जीवनानुभव, स्त्री-संस्थांच्या चालकांच्या मुलाखती, मानसोपचारतज्ज्ञांच्या मुलाखती व त्यांचे अहवाल या सर्वांच्या आधारे स्त्रीच्या आजवर घडत गेलेल्या मानसिकतेविषयी ती जी निरीक्षणे मांडते त्यांना सहजच सैद्धांतिक मोल प्राप्त होते.

कॉलेट डाऊनिंगची या पुस्तकाखेरीज The skin Game व How To Love A Member of opposite sex ही पुस्तकेही प्रसिद्ध आहेत. शंभरच्या वर तिचे लेख प्रसिद्ध झाले आहेत आणि काही पुस्तकांच्या लेखनात तिचा सहभाग आहे.

आपल्या लेखनावर आपल्याला पैसा मिळतो आहे व आपल्या लेखनाला प्रतिसादही चांगला मिळतो आहे याची तिला जाणीव होती. एका नमुनेदार मध्यमवर्गीय कुटुंबात वाढलेल्या या स्त्रीच्या आयुष्यात तिशी ओलांडत असताना एक नवे वळण आले. ती म्हणते, "मुलांच्या जन्मानंतर माझा नवरा मानसिकदृष्ट्या आजारी झाला. ते अल्सरने निधन पावण्यापूर्वी नऊ वर्षे, त्याला वर्षातून एकदा तरी हॉस्पिटलला ठेवावे लागे. या मानसिक

आजारपणाच्या काळात तो कुठलीही बौद्धिक जबाबदारीची नोकरी करू शकत नसे. फार तर कुठेतरी निरोप पोहाचवणं, बशा घू इतपत कामे तो अखेरच्या पाच वर्षात करत होता. ह्या काळात मी दोन निर्णय घेतले होते. त्याच्या आजारपणात त्याला सोडून द्यायचे नाही आणि दुसरे म्हणजे मुलांना त्यांच्या वडिलांना भेटू द्यायचे. आजवर मला कुणाचा तरी आधार होता, माझी कुणीतरी काळजी घेत होते पण आता मी नोकरी करू लागले तेव्हा अशा लाडक्या 'पत्नी'पणाकडून मला एकट्या 'आई'पणाकडे जावे लागले.'' या टप्प्यावर तिच्या लक्षात आले की तिच्यासारख्या मानसिक अवस्थेत जगणाऱ्या इतरही अनेक स्त्रिया आहेत. त्यांच्याशी दूरध्वनीवर बोलून तिची बऱ्यापैकी ओळखही झाली. या सगळ्याजणी मुलांबाबत एकमेकींना सल्ला द्यायच्या, गरजेनुसार एकमेकींना पैसे उसने द्यायच्या. पण तरीही या सगळ्याजगणींना एकतऱ्हेचे भय वाटत होते, त्या एकतऱ्हेची असुरक्षितता अनुभवत होत्या. एखाद्या जंगलात, धूसर अंधारात रस्ता चाचपडत राहावे तसे काहीसे त्यांच्या वावतीत घडत होते. या अवस्थेचे वर्णन लेखिकेने असे केले आहे, ''आम्ही एकमेकींच्या खांद्यावर डोकी ठेवून रडायचो, मद्य पीत राहायचो, सिगारेटीमागून सिगारेटी ओढत राहायचो. त्याहून विचित्र म्हणजे नवयौवनांप्रमाणे आम्ही डेटिंगही करू लागलो. वयाच्या तेहतिसाव्या वर्षी मला कोणता पुरुष हवा होता? .... उत्तर येत होतं 'कुठलाही.' म्हणजे आम्ही मुक्त होतो तरी घाबरलेल्या अवस्थेत जगत होतो. घरातला पुरुष गेल्यावर नवे आयुष्य चालू करण्याऐवजी ते पूर्वीसारखेच टिकवण्याचा आमचा प्रयत्न चालू होता.''

कॉलेट या मनोवस्थेचे अधिक बारकाईने विश्लेषण करते. ती म्हणते, ''माझे आयुष्य मी माझ्या हाती घेतच नव्हते. 'स्त्रीवादा'च्या पडद्याआडून माझ्या परिस्थितीला 'ते' जबाबदार आहेत असे मी म्हणत राहिले. लिखाणावर पैसा मिळत होता, प्रसिद्ध मिळत होती तरी ते श्रेय माझे असे वाटत नसायचे. उलट आपली एवढी कुवत नसताना ते आपल्याला मिळतेय अशी भावना होती. किंबहुना त्या काळात लिखाण हा सुद्धा एकतऱ्हेचा 'सेफ्टी व्हॉल्व' होता.''

एकदा कॉलेट फ्ल्यूने आजारी पडली. त्यावेळी तिचे वय पस्तिशीचे होते. एकाकी अवस्थेत, तापाने फणफणलेल्या स्थितीत पडून असताना तिला एकाएकीच जणू साक्षात्कार झाला. ती म्हणते, ''प्रौढावस्थेत माणसाला एकटेपणा येतच असतो. परंतु हे वास्तव स्वीकारायला स्त्रीला कुणी शिकवलेलेच नसते. किंबहुना आयुष्यभर कुणीतरी आपली काळजी घेणार आहे हेच तिच्या मनावर बिंबवलेले असे. त्यामुळे एकटे पडण्याचा प्रसंग आला की ती मानसिकदृष्ट्या खचून जाते.''

आपल्याच मनाचा असा कानोसा घेताना १९७० च्या दशकामधील स्त्री-स्वातंत्र्य पर्वातील स्त्रीच्या मानसिकतेबद्दलही ती विचार करू लागली. ''१९७० मध्ये एक एक

सांस्कृतिक पर्व उलटले. तेव्हा स्त्रियांना सांगितले जाऊ लागले की, तुम्ही बालपणी पाहिलेली स्वप्ने दुबळी होती. खरे तर तुम्ही पैसा, सत्ता, स्वातंत्र्य यांची अपेक्षा करायला पाहिजे. मात्र या स्वातंत्र्यानेच स्त्रीला घाबरवले. नोकऱ्यांमध्ये मिळणारी बढती, त्याबरोबर आलेल्या कामाच्या जबाबदाऱ्या, एकटीने प्रवास करण्याची संधी, एखाद्या प्रसंगी आपला आपण मार्ग काढणे, आपल्या सहृदांचे वर्तुळ आपले आपण तयार करणे या गोष्टींची स्त्रियांना सवयच नव्हती. स्वातंत्र्याबरोबर अनेक मागण्या आल्या. त्यातलीच एक म्हणजे विश्वासार्हता आणि इथेच गुंतागुंत होऊन बसली. आदर्श कन्या-माता-पत्नीही व्हायचे आणि नव्या बाहेरच्या क्षेत्रातही यशस्वी व्हायचे. दोन्हीपैकी कशावर विश्वास ठेवायचा?''

एकदा विचारांना अशी दिशा मिळाली आणि स्वत:च्या अनुभवांना ती अलिप्तपणे न्याहाळू लागली. ''नवरा समर्थ आणि आपण दुबळ्या' हीच स्त्रीची मानसिकता झाल्याने तिला स्वत:लाच सामर्थ्यहीन झाल्यासारखे वाटते आणि मग ती नवऱ्यावर चिडचिड करत राहाते.'' हे तिचे अनुभवाचे बोल.

न्यूयॉर्क मॅगेझिनला तिचा Beyond Liberation, Confession of A Dependent Woman हा लेख प्रसिद्ध झाला आणि विशी पासून पन्नाशीपर्यंतच्या अनेक स्तरातील स्त्रियांच्या पत्रांचा तिच्यावर अक्षरश: पाऊस पडला. सगळ्या स्त्रियांच्या म्हणण्याचा आशय एकाच वाक्यात सांगायचा तर असा होता, ''अगं, तशी तू एकटीच नाहीएस.''

म्हणजे परावलंबित्व; वैफल्य, चीड यांनी अनेक बायकांची मने पोखरली होती. त्यांना स्वातंत्र्य हवे होते पण त्याचे **भयच** त्यांना मुक्त होऊ देत नव्हते. एखाद्या साथीच्या रोगाप्रमाणे ह्या अंतर्मनातील भयाची लागण सर्व स्त्रियांमध्ये झाली होती. स्त्रियांना परावलंबित्वाचे जणू बाळकडूच दिले जाते. यामुळे स्त्री भयग्रस्त बनते. ती वयाने वाढली तरी तशी परावलंबी राहाते. स्वत:साठी ड्रेस (पोषाख) घ्यायचा तरी तिला नवऱ्याची परवानगी लागते. किंवा सहा आकडी पगार मिळविणाऱ्या स्त्रीचा प्रियकर/नवरा परगावी गेला तर तिला रात्ररात्र झोप लागत नाही.''

'आपली सतत कुणीतरी काळजी घ्यावी' या स्त्रीच्या अंतर्मनातील भावनेला कॉलेटने **'सिंड्रेला गंड'** असे नाव दिले आहे. 'कुणीतरी येईल आणि माझे आयुष्य बदलून टाकील.' अशी सिंड्रेलाप्रमाणे या स्त्रिया वाट पाहात असतात; आणि त्यामुळे आपल्यातील सृजनशीलतेचा, सामर्थ्याचा त्या पुरेपूर उपयोग करून घेऊ शकत नाहीत.

बाह्यत: यशस्वी वाटणाऱ्या अनेक क्षेत्रांमधील स्त्रियांनी तशी कबुली दिली आहे मानसशास्त्रात डॉक्टरेट मिळवलेल्या, स्वत: कृतिशील स्त्रीवादी असणाऱ्या बत्तीस वर्षाच्या एका स्त्रीने म्हटले आहे की, ''मी विवाह केला नाही, मला मुले झाली नाहीत याबद्दल एक अपराधीपणाची भावना सतत माझ्या मनात असे.' स्वत:ला कडवी स्त्रीवादी, म्हणवणाऱ्या

एका बुद्धिमान गीतकार स्त्रीने आपल्याला फारसे यश का मिळू शकले नाही याची मीमांसा अशी केली, "कुणी पुरुषाने माझ्यासाठी काहीतरी करावे असे मला आतून वाटत असे हे ते कारण असावे." एका चित्रकर्तीची कबुली अशी आहे की, "आयुष्यभर माझ्या अंतर्मनात एक पोरकं पोर दडलेलं होतं. ते मला भित्रं, घाबरट बनवत होतं. माझा स्वत:वरचा विश्वास डळमळीत करीत होतं. मी जेव्हा चित्र रंगवायचे तेवढा काळच मला मुक्त वाटायचं."

अशा 'सी-सॉ'वर हेलकावणाऱ्या स्त्रियाना नव्या युगातल्या स्त्रिया म्हणायचे का? त्या सतत प्रश्नांच्या चक्रव्यूहात सापडलेल्या दिसतात, ॲनी टेलरला पडणारे हे प्रश्न प्रातिनिधिक म्हणावे लागतील. तिला वाटायचे, "आपण आदर्श आई झालो तर नोकरी करता येईल? नोकरीत मनस्वीपणे काम केले तर प्रेम करता येईल? तिथे स्पर्धेत टिकता येईल? घरी राहिलो तर आपण निरूपयोगी आहोत अशी जी अपराधीपणाची भावना येते तिच्यापासून दूर राहता येईल?" आधुनिक मानसशास्त्रीय संशोधन सांगते की, स्वत:च्या सामर्थ्याविषयी शंका हे आजच्या स्त्रीचे वैशिष्ट्य आहे. उदासीनता, परावलंबित्व, स्वत:ला जोखता न येणे हे अस्थिर गुणधर्म स्त्रियांमध्ये पुन्हापुन्हा आढळतात व पुरुषांपेक्षा तिचे असलेले वेगळेपण अधोरेखित करतात.

अमेरिकेत असलेल्या एका वाक्प्रचाराच्या संदर्भात स्त्रीमानसिकतेचे विश्लेषण कॉलेटने पुस्तकाच्या दुसऱ्या प्रकरणात केले आहे. इंग्रजीत 'Female achievement gap' असा हा शब्दप्रयोग आहे. त्याचे भाषांतर करायचे तर 'आत्मसमीकरणातील स्त्रीधर्मीय खिंडार' असे काहीसे ते करता येऊ शकेल. याचा अर्थ असा की एकाच क्षमतेच्या असलेल्या स्त्री-पुरुषांमध्ये पुरुष व स्त्री जे मिळवतात त्यात पुरुषापेक्षा स्त्रीला जे कमी मिळते ते कमी मिळालेले म्हणजे Female achivement gap होय.

१९६० ते १९७६ या कालावधीतील स्त्रियांच्या नोकऱ्यांची पाहणी केली असता पुरुष जी कमाई करतात त्याच्या ६० टक्केही कमाई स्त्रिया करत नाहीत असे लक्षात आले 'स्टॅनफोर्ड गिफ्टेड चाइल्ड स्टडी' ने केलेली पाहणी धक्कादायक होती. विद्यार्थ्यांचे बुध्यांक तपासले असता त्यातील सहाशेच्या वर विद्यार्थी १३५ बुध्यांक असलेले होते. यात मुलीही होत्या व त्यातील २/३ मुलींचे बुध्यांक तर १७० व त्याही वरचे होते म्हणजे त्या प्रतिभावंत होत्या. परंतु पुढच्या काळात त्या गृहिणी झाल्या किंवा कार्यालयीन कामकाज करत राहिल्या. स्त्रियांची ही बुद्धिमत्ता वाया जात असते व त्याचा संपूर्ण राष्ट्रावर परिणाम होत असतो. १९८०च्या सुमारास मानसोपचारतज्ज्ञांनी या समस्येची गंभीरपणे दखल घ्यावयास सुरुवात केली.



अनुक्रमणिका

**या बुद्धीवान स्त्रियांना मागे कोण खेचते?**

**भय : भीती - डॉ. अलेक्झांड्रा सायमंड** म्हणतात की, प्रगतीच्या प्रवासात एक तऱ्हेची अस्वस्थता, काळजी असणे अगदी स्वाभाविक असते. परंतु तिचा अनुभव घेणेच स्त्रिया नाकारतात. त्यांना बालपणापासून तसे घडवलेच जात नाही. १९४४ त **हेलेन ड्वाश्श** (Helen Deutsch) चे असे निरीक्षण होते की, स्त्रियांमध्ये क्षमता असली तरी आपल्या सहचराने मिळवलेल्या यशात त्यांना आनंद वाटतो. त्याच्या यशासाठी आपण त्याग करतोय असे त्यांना वाटतच नाही. त्या स्वत: जेव्हा बाहेरच्या विश्वात पाऊल टाकू पाहतात तेव्हा त्यांना सहचराचा आधार लागतो. **सायमंड** यांचे यावर म्हणणे असे आहे की, आपल्या इच्छा-आकांक्षा दडपून टाकायलाच मुलीला लहानपणापासून शिकवले जाते.

Female achivement gap चा विचार करताना लक्षात येते की व्यवहारात लिंगभावाधारित दुय्यमत्वाची वागणूक स्त्रीला मिळते हे खरेच आहे. स्त्रियांना पद्धतशीरपणे सत्तेपासून दूर ठेवले जाते. परंतु स्त्रियाही स्वत: दूर राहू बघतात हेही तितकेच खरे आहे.

१९७६च्या एका पाहणीतून हाती आलेले निष्कर्ष असे होते की, ४९% पदवीधर, ७२% पदव्युत्तर पदवी घेतलेल्या व ५३% डॉक्टरेटची पदवी घेतलेल्या स्त्रिया अत्यंत बेताच्या पगारात काम करत होत्या. त्याही परंपरागत स्त्रियांची म्हणून मानली गेलेली जी क्षेत्रे आहेत. (शिक्षणक्षेत्र, पत्रकारिता, ललित-उपयोजित कलांचे क्षेत्र, परभाषा व साहित्यक्षेत्र, सुश्रुषा (नर्सिंग) व ग्रंथालयशास्त्र) त्यातच त्या काम करत होत्या. जे मिळवण्याची त्यांची क्षमता होती ते त्या मिळवत नव्हत्या. याच्या कारणांचा शोध घेताना लक्षात आले की घर सोडून कामावर जायला स्त्रिया फारशा उत्सुक नसतात. नवऱ्याचा पगार पुरत नाही किंवा घटस्फोट झालाय, वैधव्य आलेय तर त्या नोकरीवर जातात पण नोकरीवर जाणे ही त्यांच्यासाठी आनंददायी गोष्ट नसते. **रूथ मोल्टन** या स्त्रीवादी मानसोपचारतज्ज्ञेचे म्हणणे असे आहे की, बाह्य जगापासून दूर पळण्यासाठी स्त्रिया गरोदरपण स्वीकारतात. अशा स्त्रिया आपल्या मुलांनाही स्वतंत्रपणे वाढू देत नाहीत. आपल्या नवऱ्याची, मुलांची व कुटुंबाची काळजी घेण्यासाठी बाहेरचे जग मिटून टाकले, उद्या म्हातारपणात तेच आपली काळजी घेणार आहेत अशी त्या अपेक्षा करतात, अन् तिथेच त्यांचे चुकते. अमेरिकन कुटुंबपद्धतीत या गोष्टीचा अजिबात सकारात्मक परिणाम दिसत नाही. अशा स्त्रियांची आर्थिक मिळकतही जेमतेमच असते.

**कॉलेट** तिशीच्या वयातील एका गटाला भेटली. त्यांचे नवरे बऱ्यापैकी पैसा मिळवणारे होते, कुणी शेअर ब्रोकर कुणी विद्यापीठात प्राध्यापक, कुणी सरकारी अधिकारी असे होते. या स्त्रियांना रिकामपणामुळे वैफल्याने ग्रासले होते, त्यांना क्लब कंटाळवाणा वाटू लागला



अनुक्रमणिका

होता. १९६०च्या दशकात **बेटी फ्रेडीनने** मांडलेलीच ही व्यथा होती. १९८० च्या दशकातही या पदवीधर स्त्रिया आर्थिक परावलंबित्व हा आपला हक्क समजत होत्या. आपल्या आजुबाजूला घटस्फोटित स्त्रियांची अनेक उदाहरणे दिसत होती. परंतु 'घटस्फोट इतरांचा होतो, आपला नाही' अशा भ्रमात त्या राहात होत्या.

१९८०त स्वत:च्या पायावर उभे राहण्यास भावनिक दृष्ट्या असमर्थ असलेल्या विधवा, घटस्फोटित, परित्यक्ता स्त्रियांची संख्या २५ दशलक्ष एवढी होती. का?

स्त्रीच्या आयुष्यातील प्रत्येक टप्प्यावर तिला एकतऱ्हेच्या भयाने ग्रासले आहे. पूर्वीपासूनच्या आपल्या सामाजिक घडणीने स्त्रीच्या मनात एक भयगंड निर्माण करूनच ठेवला आहे. स्त्रीला स्वतंत्र व्हायचे असेल तर प्रथम भयमुक्त झाले पाहिजे.

स्त्रीच्या अंतर्मनात दडपला गेलेला भयगंड प्रत्यक्ष वर्तनात वेगवेगळी रूपे धारण करतो. **अलेक्झांड्रा सायमंड** यांनी अशा वर्तनाची काही उदाहरणे दिली आहेत. जिल या स्त्रीने नवऱ्याच्या उज्ज्वल कारकीर्दीसाठी. आपली कारकीर्द मिटून टाकली. हळूहळू तो तिला गृहित धरू लागला. मग मध्येच आपण काहीतरी केले पाहिजे असे तिला वाटू लागले. तेही नवऱ्यानेच आपल्याला सुचवावे ही तिची अपेक्षा. या अवस्थेतून स्वत:ला सावरण्यासाठी तिने मानसोपचारकाची मदत घेतली. आता मानसोपचारकाने आईसारखी आपली काळजी घ्यावी असे तिला वाटू लागले. ती संतापू लागली. आपल्याला स्वत:ला तर काहीतरी हवे आहे परंतु ते दुसऱ्याने आपल्याला मिळवून द्यायला हवे अशी तिची सूप्त इच्छा राही. नवऱ्याकडून ती पित्याच्या प्रेमाची अपेक्षा करी. पुढे परिणाम? घटस्फोट. अशा भयगंडाने पछाडलेल्या स्त्रिया इतक्या आगतिक होतात की आपले स्वत:चे आयुष्यही त्या वेडेवाकडे भिरकावून देतात. दुसऱ्याने काही सांगितलेले त्यांना पटत नाही, आणि स्वत:ला स्वत:च्या आयुष्याची दिशा तर ठरवता येत नाही. कुठलाही बदल पेलण्याचीही त्यांची तयारी नसते.

काही स्त्रियांमध्ये या भयाची तीव्र प्रतिक्रिया म्हणून प्रतिभयगंड निर्माण होतो. याचा अर्थ असा की, 'मला कुणाची गरज नाही, माझी मी समर्थ आहे' अशा स्वत:विषयीच्या अतिरिक्त आत्मविश्वासातून त्या हुकूमशाही प्रवृत्तीच्या बनतात. आपण इतरांपेक्षा श्रेष्ठ आहोत असे दाखवण्याची त्यांना सतत गरज भासते. व्यक्तिगणिक त्यांच्या वर्तनाचे नमुने अर्थातच वेगवेगळे दिसतात.

काहीजणी आपल्या प्रियकरा/नवऱ्याबद्दल सतत तक्रार करत राहतात. काहीजणी विवाहानंतरच्या नव्या नव्हाळीनंतर एकदम नकारात्मक वृत्तीच्या आणि थंड बनतात. स्वत: त्या मनातून भयग्रस्त असतात. परंतु नवऱ्यावर चुका आरोपित करत राहतात. आपले काय चुकतेय ते अशावेळी नवऱ्याच्या लक्षातही येत नाही. आपल्या बायकोला स्वातंत्र्य हवे आहे की तिला आधाराची गरज आहे तेच त्याला कळत नाही कारण तिच्या वागण्यामधून त्याला



अनुक्रमणिका

संमिश्र संदेश मिळत राहतात. मग एकतर तो तिच्याकडे दुर्लक्ष करत राहतो किंवा तिचे समाधान करावे म्हणून हतबल होत जातो.

आपल्या आयुष्याचा ताबा आपणच घेतला पाहिजे हे या स्त्रियांच्या लक्षात येत नाही

सिंड्रेलाच्या मिथकात रमून आपली स्वत:ची ओळख हरवून बसलेल्या स्त्रियांसाठी संस्था चालवणाऱ्या **मिस् स्मिथ** यांनी लेखिकेला सांगितले की, अशा स्त्रिया आत्महत्येचे प्रयत्नही करतात. पुरुष नेहमीच आपल्याबरोबर राहणार आहे हे त्यांनी इतके गृहित धरलेले असते की एकट्या पडल्यावर त्या विलक्षण नकारात्मक बनतात. आपण कुरुप आहोत, म्हाताऱ्या आहोत, निरुपयोगी झालोत असे विचार त्या करत राहतात. त्यांना काही कामासाठी बाहेर पाठवायचे तर ते टाळण्यासाठी त्या अनेक सबबी सांगत राहतात; इतका त्यांना स्वत:वरचा विश्वास उडालेला असतो. आपला प्रियकर गमावलेल्या एका स्त्रीचे उद्‌गार याबाबत प्रातिनिधिक आहेत. ती म्हणते, ''मला वाटायला लागले की मी अस्तित्वातच नाही.''

**सिंड्रेला गंडातून** निर्माण झालेले स्त्रीमनातील भय स्त्रीला मानसिकदृष्ट्या इतके पंगू करून टाकते की नोकरी व्यवसायात वावरताना पुरुषांच्या जगातील स्पर्धा त्यांना मानवत नाही, म्हणून त्या तिचा निषेध करतात. आपल्याला शक्य न होणारी गोष्ट पुरुष करून दाखवतात म्हणून त्यांना त्यांचा हेवा वाटतो. उदा. वाटाघाटी करणे. आपल्या स्वत:च्या प्रकल्पांमध्येही पुढाकार घ्यायला त्या बिचकतात.

पुरुषांपेक्षा स्त्रियांमध्ये मानसिक अस्वस्थता अधिक असते. एखाद्या व्यवसायात शिरण्यासाठी चाचणी आवश्यक असली, कारकीर्द बदलायची असली किंवा एकदम वरच्या दर्जावरचे काम करण्याची वेळ आली की त्या बिचकतात. सार्वजनिक ठिकाणी बोलणे, सहज संवाद साधणे त्यांना अवघड वाटते. पुष्कळदा आपल्याला काय सांगायचे होते तेच त्या विसरून जातात. त्यांना योग्य शब्द सापडत नाहीत, त्या लाजतात, त त प प करू लागतात. त्यांचा आवाज आत ओढला जातो. तेवढ्यात कुणीतरी जर मतभेद व्यक्त केला तर आपला मुद्दा सुसंगतपणे मांडताना त्या एकाएकी अडखळतात. मतभेद व्यक्त करणारा पुरुष असला म्हणजे तर त्या क्षुब्धच होतात, कधी कधी त्यांना रडू कोसळते. आपले ज्ञान, आपला अधिकार त्या क्षणात विसरून जातात.

आपल्याशी मतभेद व्यक्त करणाऱ्यापासून आपण फुटून निघू, आपण चुकलो तर कुणीतरी आपल्यावर टीका करेल असे त्यांना भय वाटत असते. एखाद्याला आपण 'नाही' कसे म्हणायचे? काही लबाडी किंवा कावेबाजपणा न करता आपल्या गरजा स्वच्छपणे आणि प्रत्यक्षपणे कशा मांडायच्या? अशी नाना तऱ्हेची भीती त्यांच्या मनात असते. याचे मुख्य कारण म्हणजे आपल्याला काय हवे ते स्पष्टपणे सांगणे स्त्रीसुलभ नाही, तर गोड गोड बोलणे, पुरुषाला आकर्षित करून घेणे हेच स्त्रीसुलभ आहे असे स्त्रीला शिकवले गेलेले असते.



अनुक्रमणिका

**डॉ. अलेक्झांड्रा सायमंड** ह्या 'अमेरिकन ॲकॅडमी ऑफ सायको ॲनॅलिसिस'च्या संचालक "आपल्याला कुणाचे सहाय्य मिळत नाही म्हणून भय वाटते' अशी तक्रार घेऊन त्यांच्याकडे अनेक उच्चपदस्थ स्त्रिया येत. एकदा स्त्रियांच्या एका सभेत त्यांनी सांगितले, "तुमच्यासारख्या उच्चपदस्थ स्त्रीच्या हातून एखादी चूक घडली म्हणून वरिष्ठ जर आपल्याला रागावला तर त्यात रडण्यासारखे काही नाही. एखाद्या मुख्य संपादक स्त्रीची एखादी योजना अकारण नाकारली जात असेल तर तिने गोड अन् मोहक पद्धतीने वागणे योग्य नाही किंवा एखाद्या प्राध्यापिकेच्या हातून माहितीपत्रक व्यवस्थित केले गेले नाही तर आता प्राचार्य काय म्हणतील म्हणून तिने मनातल्या मनात कुढत राहण्यातही अर्थ नाही."

जोवर स्त्री 'बाबांची छकुली' ही आपली ओळख पुसत नाही तोवर आपल्या कामासबंधी आपल्या सहकाऱ्यांशी बोलताना ती खूप गोंधळाचे संदेश देत राहाते.

वॉलस्ट्रिट जर्नलचे ब्रोकर एक अर्थविषयक वार्ताहर आणि जाहिरात व्यवस्थापक यांनी स्त्रियांच्या बोलण्यासंबंधीची काही निरीक्षणे एकदा लेखिकेजवळ मांडली; ती अतिशय बोलकी आहेत. एकजण म्हणाला, "माझ्याकडे मुलाखतीसाठी आलेल्या स्त्रीने नखे रंगवण्यापासून भडक मेकअप केला होता. डुलणारी कर्णफुले घातली होती. बोलताना ती वेगवेगळ्या शैलीत बोलत होती. कधी ती अतिशय गंभीरपणे आणि आत्मविश्वासाने काही बोले तर दुसऱ्याच क्षणी बालिशपणे हसत मान वेळावे. तिची शब्दांची फेक अतिशय सावकाश होती आणि आपण कशा तऱ्हेने शब्द उच्चारतोय याविषयी ती अत्यंत जागरूक होती. आपल्या वाक्याचा शेवट, मी इतरही अनेक स्त्रियांबाबत पाहिलेय तसे, ती अगदी मृदुपणे शब्द उच्चार करत होती. दुसरा म्हणाला, "होय. आपले म्हणणं मांडता मांडता त्या अचानक घुमजाव केल्याप्रमाणे थांबतात. त्यांचे मान हलवणं म्हणजे तुम्ही त्यांच्याशी सहमत होताय की नाही हे अजमावण्यासाठी असतं. त्या एखाद्याला धाडकन् 'तुला काही कळतंय की नाही?' असं स्पष्ट विचारणार नाहीत. त्यांच्या बोलण्यात ठाशीवपणा नसतो. 'आपल्याला काय हवंय ते स्पष्ट-सरळ शब्दांत सांगणे, ज्यावर आपला विश्वास आहे ते दुसऱ्याच्या गळी उतरवणे त्यांना जमत नाही.

**फेलिस चेस्लर** या मनोविश्लेषकाच्या मते स्त्रिया असे मुद्दाम वागतात. कारण नेहमी मागच्या असनावर बसणेच त्यांना सुखाचे वाटत असते. घरी-दारी त्यांची देहबोलीच अशी असते की पुरुषाला 'तू श्रेष्ठ' असे दाखवून देत आपण असहाय्य आहोत हे भासवून द्यायचे.

भय आणि असुरक्षितता या मनोगंडांमुळे स्त्रीच्या भाषेत कोणती वैशिष्ट्ये दिसतात याची नोंद एक भाषातज्ज्ञ **रॉबीन लॅकॉफ** यांनी केली आहे. उदा.

- सुंदर, भयंकर, उदात्त यासारखी पोकळ विशेषणे त्या वापरतात; वास्तविक त्यामुळे त्यांच्या बोलण्याचा टोकदार असा परिणाम होत नाही आणि त्यांच्या बोलण्याकडे कुणी गंभीरपणे लक्ष देत नाही.



अनुक्रमणिका

• एखाद्या निष्कर्षात्मक विधानानंतर त्या पुन्हा गोंधळलेले विधान करतात. उदा. "आज फार ग़रम आहे, तुम्हाला नाही वाटत?"

• 'मला वाटतं', 'बहुधा', 'असावं' अशा शब्दांचा त्या फार वापर करतात त्यामुळे त्यांच्या बोलण्यातील विश्वासार्हता कमी होते.

• फारच शुद्ध, औपचारिक भाषेचा, मृदु भाषेचा त्या वापर करतात. बोलीचा वापर टाळतात. त्यामुळे त्यांचे बोलणे सहज वाटत नाही.

अशा भाषिक वैशिष्ट्यांचे मानसशास्त्रीय विश्लेषण करून **सॅली जिनेट** यांनी या भाषेला 'पराभूततेचा जाहीर उच्चार' करणारी भाषा असा शब्दप्रयोग रुढ केला.

अलिकडच्या काळात 'स्त्रीसुलभ' काय मानावे व काय मानू नये याविषयीचा पेच निर्माण झाला आहे. आजच्या स्त्रिया 'स्त्रीसुलभता' ही आईच्या प्रतिमेशी संबद्ध करतात आणि म्हणून आपण स्वत: त्यापासून दूर जाऊ पाहतात; आणि अधिकच गोंधळतात.

एखाद्या आईने अन्याय मुकाट्याने सोसलेला असतो. ती एकीकडे मुलीला सांगत असते, "तू माझ्यासारखी सहन करू नकोस." पण मुलगी वेगळं वागू लागली की ती घावरते, चिडचिडते.

**अलेक्झांड्रा सायमंड** म्हणतात, "अशी चिडचिडी आई-मुलगी या नात्यातून मुलीमध्ये खालील तीनापैकी एक गुणधर्म निर्माण होण्याची शक्यता असते.

(१) काही स्त्रिया सतत कामात गुंतलेल्या असतात. इतरांना खूप काही देत असतात पण आपण मात्र आतून सतत बारिकशा निराशेने ग्रासलेल्या असतात. त्यांना कधी कसला उत्साह वाटत नाही.

(२) काहींनी आईच्या मार्गाकडे पूर्ण पाठ फिरवलेली असते. पण त्या आपल्या स्त्रीसुलभ आत्मभानाविषयी असुरक्षितता अनुभवत असतात. पारंपरिक मूल्ये आपल्याकडून काय अपेक्षा करताहेत? ते नाकारायचे तर आपण पुरुषी ठरू की काय? हे भय त्यांच्या मनात असते.

(३) आपण खूप स्वतंत्र, स्वावलंबी आहोत असं भासवत स्वत:ची फसवणूक करून घेणारा स्त्रियांचा एक वर्ग असतो. त्या पूर्ण वेळ नोकरी करतील, कुटुंबाची काळजी घेतील, तयार अन्न वापरणार नाहीत. स्वत: पूर्ण स्वयंपाक करतील. घरी, नोकरीच्या ठिकाणी आपण 'सुपरवुमन' आहोत असं दाखवत राहतील पण कदाचित नवरा परगावी गेला तर रात्री त्यांना झोप लागणार नाही अन् त्या रडत राहतील.

आपल्या समस्या सोडविण्यासाठी सध्या स्त्रिया बाह्यत: वेगवेगळ्या गोष्टी करू पाहताना दिसतात. लग्न करणे, अविवाहित राहणे, नोकऱ्या बदलणे, जागा बदलणे, कामगार



अनुक्रमणिका

संघटनेत युनियनमध्ये काम करणे, स्त्री-हक्कांच्या संघटनेत काम करणे इ. इ. परंतु जोपर्यंत परतंत्रतेच्या समस्येने तिला पंगू केले आहे तोवर 'योग्य' नवरा, 'योग्य' नोकरी, 'योग्य' जीवनशैली लाभूनही तिचे आयुष्य बदलणार नाही. बाह्य गोष्टीत गुंतल्याने कदाचित तिचे व्यक्तिगत एकाकीपण थोडेसे कमी होईल पण अंतर्मनातील ज्या वृत्तीमुळे ती गोंधळली आहे, आत्मघातकी बनली आहे ती त्या बाह्य गोष्टींमुळे कमी होणार नाही.

म्हणून आपल्या अंतर्मनात काय चालले आहे याला तिने आधी सामोरे गेले पाहिजे आणि आपल्या आयुष्यावर कोणत्या पातळीपर्यंत भीतीचे साम्राज्य आहे ते प्रथम तिने ओळखायला शिकले पाहिजे. अन् भयमुक्त झाले पाहिजे.

भित्रेपणा हा पूर्वीपासून स्त्रीचा स्वभावगुण मानला गेला आहे. उंदराची भीती, काळोखाची भीती, एकटं राहण्याची भीती. अशा गोष्टींची भीती पुरुषांना वाटत नाही, स्त्रीला मात्र या गोष्टींची भीती वाटणे स्वाभाविक आहे असा सामान्यत: समज असतो. मात्र आज मानसशास्त्रज्ञ व समाजशास्त्रज्ञांचे असे म्हणणे आहे की, विनाकारण भय वाटणे ही गोष्ट काही स्त्रीबाबत स्वाभाविक नाही. हा एक तऱ्हेचा गंड (Phobia) आहे.

**डॉ. व्हिव्हियन गोल्ड** या एक मानसशास्त्रज्ञ. त्यांच्याकडे स्त्रिया किती तऱ्हेच्या भयाची तक्रार घेऊन येतात? 'घराबाहेर पडण्याची भीती वाटते', 'कुणामध्ये भावनिक गुंतवणूक होण्याची भीती वाटते', 'दोघांमधल्या नात्यात पुढाकार घेण्याची भीती वाटते.' इ. **डॉ. गोल्ड** यांचे म्हणणे असे आहे की,-अशा स्त्रियांवर उपचार चालू केल्यावर कधी कधी वर्ष उलटले तरी त्यांचा भयगंड बाहेर येत नाही. आपल्याला वैवाहिक जीवनात कसा त्रास होतोय किंवा आपण कशात करियर करावे ते कसे कळत नाही; अशासारख्या विषयावर त्या बोलत राहतात. पण नंतर लक्षात येतं की 'एकटं' होण्याच्या कल्पनेने त्या भयंकर घाबरलेल्या आहेत.

मुलं झाल्यानंतर वाचन सोडून देणं हा या भयगंडाचा एक दृश्य परिणाम आहे. 'वाचायला वेळ मिळत नाही.' अशी त्यांची सबब असते. परंतु खरे तर आपण वाचनात रमलो तर नवरा-मुलं यांच्यापासून तुटून जाऊ असं त्यांना भय असतं. भयगंडानं ग्रासलेल्या स्त्रिया खूपदा स्वत:हून इतरांमध्ये मिसळायचेही नाकारतात.

**रुथ मोल्टन** या मानसोपचारिकेने म्हटलंय की, एकटेपणाला घाबरणाऱ्या स्त्रियांना घरात पुरुष असण्याची आत्यंतिक गरज वाटते. कदाचित त्यापायीच त्या घटस्फोट ओढवून घेतात.

**रुथ मोल्टन** यांनी ज्या कॅरोलिनवर उपचार केले तिची हकिकत स्त्रीच्या अंतर्मनात खोल दडलेला भयगंड तिचे आयुष्य कसे उद्ध्वस्त करतो हे स्पष्ट करणारी आहे.

कॅरोलिन ही मुलायम आवाजाची देणगी लाभलेली एक गायिका, 'सांता फे ऑपेरा कंपनी'ने ह्या मुलीला आपल्या संस्थेत सहभागी होण्याविषयी विचारणा केली. या कंपनीतील



अनुक्रमणिका

ती सर्वोत्तम आणि वयाने सर्वात लहान गायिका होती. तिचा आवाज, तिची शिस्त, तिची पक्वता, सगळ्यांना आश्चर्यचकित करणारी होती. पण वर्षाच्या आतच न्यूयॉर्कला एका कार्यक्रमाला ती गेली असताना ती हेलमट अँडरसनच्या प्रेमात पडली. हेलमट तेव्हा चोविशीचा होता आणि त्याने नुकतीच पी. एच्. डी. पूर्ण केलेली होती. त्याला घर सांभाळणाऱ्या बायकोची गरज होती. त्याने तिला लग्नाबद्दल विचारले आणि तिने होकार दिला .... फारसा विचार न करता होकार दिला. लग्न झाले, आणि वर्षाच्या आत ती आई झाली. पाठोपाठ दुसरे मूल; 'मुलं मोठी झाल्यावर आपण आपलं गाणं पुन्हा सुरू करू.' असं त्यावेळी तिला वाटलं. पत्नी-आई या भूमिकात ती त्यावेळी मनापासून रमली. तोवर इकडे हेलमटने विद्यापीठात नोकरी घेतली. तो आपल्या अभ्यासिकेत अधिक वेळ घालवू लागला. "बाबा कामात आहेत" म्हणत ती एकटीनेच मुलांचे संगोपन करत राहिली. केव्हातरी तिच्या लक्षात आले की, आपण घर सांभाळायचे पण एकदा अभ्यासिकेतून हेलमट बाहेर पडला की सगळे घर त्याचेच असे. घरातल्या कुत्र्यापासून अपार्टमेंटच्या करारपत्रापर्यंत सर्व काही त्याचे. तो 'आहेरे' वाला तर ती 'नाहीरे' पक्षातली बनत असे. एरवी मात्र एक मूल आजारी आहे, दुसऱ्याला शाळेत सोडायचे आहे तर तो मुळीच मदत करीत नसे. तिने मूल सांभाळायला बाई ठेवल्यावर मात्र 'खर्च वाढला' म्हणून त्याची आरडाओरड सुरु झाली. यातच आठ वर्षे निघून गेली. कॅरोलिनच्या कल्पनेतला ऑपेरा आता खूपच दूर गेला होता. ती आता गायिका उरली नव्हती. तिची प्रकृतीही बरी राहीना. तिची व्यथा तिच्या आईलाही कळेना. तिलाही ती नीट सांगता येईना. तिला इतके कळले की आता आपण ना पूर्वीसारख्या स्वप्नाळू, निरागस मुलीप्रमाणे उरलोय ना समंजस, प्रौढ बाईप्रमाणे झालोय. कधी कधी ती डॉक्टर होण्याचे स्वप्न पाहू लागली. जेव्हा त्यांचे सर्वात लहान मूल शाळेत जाऊ लागले तेव्हा ती नवऱ्याला म्हणाली, "मला काहीतरी करावेसे वाटतेय." यावर त्याची प्रतिक्रिया होती, "देवा, खरंच कृपा करून तू काहीतर करायला लाग. तू मला वेड लावशील नाहीतर." नवऱ्याच्या या उद्‌गारांनी ती व्यथित झाली. जणू त्याने आपल्याला सोडून दिले आहे असे तिला वाटू लागले; त्याला आपली काळजीच नाही, तिला जाणवले. तिला आपण काहीतरी करावे असे वाटत होते पण आपल्याला 'ते' भाग पडू नये असेही तिला वाटत होते. आपले आयुष्य आपल्या हाती घ्यावे असे तिला वाटत नव्हते. तोवर हेलमट त्याच्या क्षेत्रात चांगलाच नावारूपाला आला होता. कॅरोलिन मात्र स्वत:ची नवी जीवनशैली घडवण्याऐवजी हेलमटच्या दडपणाखाली, आपले संसाराचे अंदाजपत्रक अधिकाधिक चांगल्या पद्धतीने सांभाळण्यासाठी कसरत करत होती. त्याला आपल्या मित्रांच्या बायकांच्या तुलनेने ती बावळट वाटू लागली. तो बऱ्याच वेळा बाहेरच राहू लागला. त्यांचा संसार नावापुरताच उरला.

लग्नाला अकरा वर्षे झाल्यावर, वयाच्या वत्तिसाव्या वर्षी तिला विलक्षण थकवा जाणवू लागला, आपण निरुपयोगी झालोय असे वाटू लागले. तिला रडण्याचे झटके येऊ लागले. तिला निद्रानाश जडला, ती दिवास्वप्नात रमू लागली. तिला हिंसाचार आणि मरणाच्या कल्पना छळू लागल्या. तिने घरातून बाहेर पडून नोकरी शोधावी म्हणून हेलमट तिच्यावर दबाव आणायला लागला. तिला त्याचा राग येऊ लागला, पण तो व्यक्त करण्याचे धैर्य नव्हते. तो तिला घराबाहेरच्या जगात ढकलू पाहात होता पण तिच्या मनाची तयारी होत नव्हती.

अखेर हेलमटने कॅरोलिनपासून विभक्त व्हायचे ठरवले तेव्हा ती चाळिशीला पोहोचली होती पण अद्याप ती काही शिकली नव्हती. या घटस्फोटाने ती पुरती उद्ध्वस्त झाली. आपल्या स्वत:च्या आयुष्याचे तुकडे गोळा करायला आणि ज्याच्या त्याच्या आयुष्याची जबाबदारी ज्याला त्यालाच घ्यावी लागते हे कळायला तिला खूप काळ लागला.

कुणीतरी आपल्याला आधार देणारच आहे, तो आपला जन्मसिद्ध हक्क आहे असं स्त्रिया समजतातच कशा?

अलिकडे मानसशास्त्रीय संशोधनाने असे सिद्ध केलय की, आपणच मुलगा आणि मुलगी यांना वेगवेगळ्या तऱ्हेने वाढवतो. वास्तविक वयाच्या पाचव्या वर्षापर्यंत मुलगा-मुलगी यांच्या वर्तनात काही भेद नसतो. परंतु या वयाच्या मुलींची आपण अधिक काळजी घेऊ लागतो. आणि त्या बदल्यात त्यांच्याकडून अपेक्षा करू लागतो. 'चांगले' वागण्याची. 'चांगले' म्हणजे काय? तर शारीरिक नाजुकपणा किंवा भित्रेपणा, दुसऱ्याची मदत घेणे म्हणजे चांगले. आणि या उलट मुलाचे कौतुक मात्र त्याचा स्वावलंबीपणा, त्याचा शूरवीरपणा याबाबत केले जाते.

मुलगे स्वतंत्र कसे होत जातात आणि मुलींबाबत तसे का घडत नाही याचा अभ्यास करताना **बार्डविक व डॉव्हन** यांनी ताण-तणावाच्या (Stress) सकारात्मक परिणामाविषयी एक सिद्धांत विकसित केला आहे. त्यांच्या म्हणण्याप्रमाणे वयाच्या दुसऱ्या वर्षापासून मुलगे तणावाला सामोरे जायला शिकतात. या वयात मुले चावायला शिकतात. मारामाऱ्या करायला लागतात, हस्तमैथून करू लागतात, तेव्हा अर्थातच मोठ्या माणसांकडून ते रागावून घेतात, फटके खातात. या बंधनांचा अनुभव घेताना, मोठ्यांची मान्यता मिळवताना त्यांना एकीकडे ताण-तणावात सामोरे जावे लागते. हळूहळू ते बाहेरच्या जगाच्या मान्यतेच्या सवयी ते सोडून देतात, आपल्याला कशामुळे बरे वाटतेय याचा ते विचार करायला लागतात. बहुधा सहाव्या वर्षापर्यंत पुष्कळ मुलगे ही महत्त्वाची पायरी पार करतात. मुलींच्या बाबतीत ही पायरी खूपच लांबते. **जेरॉम कागान** आणि **एच्. ए. मॉस** यांच्या मते स्त्रिया प्रौढावस्थेपर्यंत सहनशीलता आणि परावलंबित्व यांचेच धडे घेत राहतात. मुलगी आपल्या क्षमतेचा वापर प्रचलित



अनुक्रमणिका

व्यवस्थेपासून वेगळे होण्यासाठी करत नाहीत. एखाद्या गोष्टीत तज्ज्ञता मिळवायला त्या झटतात त्यासुद्धा आपल्या आनंदासाठी नाही तर लोकांनी आपल्याला चांगले म्हणावे म्हणून.

**बार्डेविक** आणि **डॉव्हन** यांचे म्हणणे असे आहे की, मुलींचे वागणे सहसा प्रौढांना सुखवणारे असते. चावणे, बोचकारणे, हस्तमैथून इ. गोष्टी त्या सहसा करत नाहीत. गोड बोलणे, वागणे, हुषार असणे असे त्यांचे वागणे असते. त्यामुळे प्रौढही त्यांच्यावर फार बंधने घालत नाहीत. त्यांची अपेक्षा एवढीच असते की **मुलींनी स्वतंत्र होऊ नये.**

मुलगा-मुलगी यांना तान्हेपणापासून आई-वडिलांकडून मिळणारा प्रतिसाद वेगवेगळा असतो. तान्ही मुलगी रडायला लागली तर ती घाबरलीय अन् तान्हा मुलगा रडायला लागला तर तो संतापलाय असे मोठी माणसे स्वतःच ठरवतात. रांगायला किंवा चालायला लागलेला मुलगा पडला तर 'असू दे, मोठ्ठा झाला. शिकला की नाही?' अशी प्रतिक्रिया असते आणि मुलगी पडली तर 'ओ ओ ओ ..... लागलं ग माझ्या सोनीला' असे आई म्हणते. मुलीला धोका पत्करायला शिकवलेच जात नाही. म्हणून काम किंवा प्राणी काय, त्यांचे भय घालवण्यासाठी त्यांना पुन्हा पुन्हा घाबरवणाऱ्या परिस्थितीत ढकलणे आणि सोडवणे हीच योग्य पद्धत असल्याचे बार्कले. मार्टिन यांनी सांगितले आहे. मुलांना जर भीतीला तोंड द्यायला शिकवलेच नाही तर भीती आयुष्यभर त्यांचा पाठपुरावा करत राहाते; आणि या भीतीचे काय करायचे, ती कशी टाळायची याचा विचार करण्यातच त्यांची शक्ती खर्च होते; आणि त्यांच्यात आत्मविश्वासच निर्माण होऊ शकत नाही. एक अभ्यास असे सांगतो की, स्मार्ट म्हटल्या जाणाऱ्या मुलींबाबतही आत्मविश्वासाची समस्या असते.

स्वतःमध्ये असलेल्या क्षमतांची मुलीला अनेकदा जाणीव नसते. असाही एका अभ्यासाचा निष्कर्ष आहे की, एखादी मुलगी बौद्धिक क्षेत्रात जितकी बुद्धिमान तितकी बौद्धिक क्षेत्रात यशस्वी होण्याची तिची अपेक्षा कमी असते. उलट मठ्ठ मुली, आत्मविश्वास असला तर स्वतःविषयी जास्त अपेक्षा मनात बाळगताना दिसतात. ज्या मुलींमध्ये आत्मविश्वास आहे, ज्या वृत्तीने स्वतंत्र आहेत, ज्यांची स्पर्धेत उतरायची तयारी आहे, ज्यांच्यात वरचढपणा करण्याची सत्ता गाजवण्याची वृत्ती आहे, अशा मुलींचा बुध्यांक सहाव्या वर्षानंतर अधिक वाढतो व रुढार्थाने ज्यांना स्त्रीसुलभ म्हटले जाते, तशा त्या दिसत नाहीत" असे **मॅक्वाबी** या मानसशास्त्रज्ञाने म्हटले आहे.

प्रौढावस्थेत ज्या स्त्रियांच्या विविध मानसिक समस्या निर्माण झाल्या आहेत अशा रुग्णांचा बालपणीचा इतिहास जाणून घेतल्यावर **डॉ. मूलटन** यांच्या असे लक्षात आले की, बालवयात त्यांची अतिरिक्त काळजी घेतली जात होती आणि त्यांच्यावर अनेक बंधने घातली जात होती. अशा मुली सतत आईवडिलांच्या आधारावर राहात होत्या. स्वतःचे प्रश्न सोडवण्यासाठी त्यांच्या तोंडाकडे पाहात होत्या. आपल्या भोवतालच्या सामाजिक

पर्यावरणाशी आपल्याला जुळवून घेता येत नाही याचीही त्यांना जाणीव नव्हती. आवश्यकता असो की नसो, घाईघाईने मुलींना पालकांनी सतत मदत केल्यामुळे आपल्यामधील क्षमतांचा वापर करायला, आपल्या हातून एकदा चूक झाली तर स्वत:ला सुधारून घ्यायला त्या शिकत नाहीत. नकार, वैफल्य पचवण्याची त्यांच्यात ताकद येत नाही.

दक्षिण कॅरोलिनाच्या **मार्टिन सेलिग्मन** यांनी 'शिकून घेतलेली हतबलता' (learned helplessness) अशी एक नवी संज्ञा विकसित केली आहे. जेव्हा आपल्या भोवतालच्या परिस्थितीचा आपल्यावर काहीच परिणाम होत नाही असे कुठल्याही प्राण्याच्या (मनुष्यप्राणीही त्यात आला), लक्षात येते तेव्हा तो प्राणी नवीन काही शिकणे सोडून देतो. मी 'अ' गोष्ट केली की मला 'ब' गोष्ट मिळेल हे मुलीला शिकवले जात नाही, त्यामुळे कठीण परिस्थिती किंवा चांगली संधी दोन्ही गोष्टींकडे मुली नशीब, दैव या दृष्टीने बघतात.

घरीच नव्हे, शाळेत देखील मुलींना मिळणारी वागणूक यापेक्षा वेगळी नसते. मुलग्यांनी व्रात्यपणा केला की शिक्षक त्यांना रागावतात आणि शैक्षणिक यशाबद्दल त्यांना शाबासकी देतात. मुलींनी तक्रार केली, समोरासमोर रूजुवात केली की त्यांना रागावले जाते आणि ती नीटनेटकी राहिली, तिने शिक्षकांचे ऐकले, मैत्रिणींना ती आवडली की तिला शाबासकी मिळते. त्यामुळे इतरांना आपण आवडायला पाहिजे असे ती वागू लागते. आयुष्य चांगले म्हणजे सोपे आहे असे तिला वाटू लागते.

विकासाच्या मानसशास्त्रात संकटप्रसंग (Crisis) या संज्ञेकडे सकारात्मक दृष्टीने पाहिले जाते. जेव्हा आपण अगदी तुटून जावे असा आणीबाणीचा प्रसंग एखाद्याच्या आयुष्यात उद्भवतो त्याच वेळी व्यक्तीला स्वत:च्या सामर्थ्याची जाणीव होते व आपल्या सामर्थ्यानिशी व्यक्ती जेव्हा अशा संकटप्रसंगाचा सामना करते तेव्हा व्यक्ती मानसिक दृष्ट्या सुदृढ होते, प्रगल्भ होते. **बार्डविक** आणि **डॉव्हन** यांच्यामते मुला-मुलींच्या आयुष्यात असा तणाव प्रसंग प्रथम किशोरवयात येतो.

अमेरिकेच्या समाजात किशोरवयीन मुलीकडून एक वेगळीच अपेक्षा केली जाते. पंधराव्या वर्षापर्यंत मुलीने तरुण मुलाला आकर्षित करायला शिकले पाहिजे, तिला त्याच्याबरोबर मैत्री करता आली पाहिजे असे तिला सतत सुचवले जाते. म्हणून या वयात मुलग्यांशी स्पर्धा करण्याऐवजी त्याला खूष करण्याच्या युक्त्या आत्मसात करायला तिला शिकवले जाते. बाराव्या-तेराव्या वर्षापर्यंत मुक्त, स्वतंत्र असणाऱ्या मुलीच्या मनात गोंधळ निर्माण होऊ लागतो. तिचे अग्रक्रम बदलू लागतात. स्वत:च्या क्षमता समजून घेण्यासाठी स्वत:ची ओळख करून घेण्याआधी पुरुषाशी जवळीक ही गोष्ट महत्त्वाची होऊन बसते आत्मनिर्भर होण्याच्या वयात ती परावलंबित्वाचे धडे घेऊ लागते. त्यामुळे तिच्या आयुष्यात दुसरा आणीबाणीचा क्षण येईपर्यंत तिला परावलंबित्वाचीच सवय लागलेली असते.

स्त्रीमनातील आईच्या प्रतिमेविषयीही किती संदिग्धता असते ते लक्षात आले की आश्चर्य वाटते. आपल्या जडण-घडणीच्या काळात आईचे आपल्यावर काय संस्कार होतात याचा मागोवा घेण्याचा **रुथ मोल्टन** यांनी प्रयत्न केला. आपल्याकडे उपचारार्थ आलेल्या अनेक स्त्रियांना त्यांनी बालपणात आईविषयी त्यांना काय वाटत होते याविषयी विचारणा केली; त्यातल्या बहुसंख्य स्त्रिया अपराधीपणे म्हणत, "मला आईबद्दल नाही सांगता येणार. इतकं काहीतरी ते धूसर आहे की, मला नाही पकडता येणार !", "माझे वडीलच माझे आयुष्य घडवत होते .... माझी आई तेव्हा कुठे होती? ती वडिलांनाच सर्व गोष्टी हाती घेऊ देत होती का? तिला आमची पर्वा नव्हती का की ती दुबळी होती?", "आई म्हणजे नुसता निरर्थक ठिपका", "आधी माझ वडिल येतात. आईला ओळख असते त्यांच्यामुळे. ती चांगली वागली की ते तिच्यावर प्रेम करायचे, तिच्यासाठी भेटी आणायचे, तिची काळजी घ्यायचे. ती घराची राणी होती. ती घर चालवायची, पण ते तिची काळजी घ्यायचे", "ती स्मार्ट होती का? कोण जाणे. कदाचित पूर्वी असेल. पण नंतर तिने विचार करणेच सोडून दिले होते", "आई असायची सुद्धा आणि आई नसायची सुद्धा."

आई अशी धूसर राहण्याचे एक कारण म्हणजे तिच्या नवऱ्याच्या दमदार, आवेगी व्यक्तिमत्त्वाची तिला दहशत वाटत असली पाहिजे. मोठी भांडणे किंवा सत्तेसाठी संघर्ष असे गुण या स्त्रियांनी आईच्या नात्यात पाहिलेले नसतात. त्यामुळे अशा कुटुंबात वाढलेल्या मुलींच्या मनात नकळत आपणही. अशा निरुपयोगी आहोत अशी भावना वाढीस लागते. त्याला मानसशास्त्रज्ञ 'स्त्रीत्वाचा गाभा' म्हणतात.

एका अधिकारपदावरील स्त्रीने सांगितले की, माझ्यात कधी स्त्रीसुलभ भावना निर्माण झाल्या नाहीत याबद्दल मला अपराध्यासारखे वाटायचे, माझे वडिल मला ताठ उभे राहावे, ऊंच टाचेचे बूट वापरावे. 'लेडी' सारखे वागावे असे शिकवत पण मला तसे वागायचे नव्हते. कारण माझी आई 'लेडी' होती. तिने कधी प्रश्न विचारले नाहीत की कधी काही जाणून घेण्याचा प्रयत्न केला नाही.

एकूण, वडिल क्रियाशील, आई निष्क्रीय, वडिल खंबीर, आई आगतिक, परावलंबी असे चित्र मुलींच्या मनात निर्माण होते.

अनेकदा मुलगी व पिता यांच्यात एक विशिष्ट तऱ्हेचे बंध असतात. ते मैत्रीच्या स्वरूपाचे असतात. पण ते कुठवर? तिला आपल्यापेक्षा अधिक समजू लागले की त्यांना भय वाटते. जोवर ती त्यांच्या मनाप्रमाणे वागत असते तोवर ठीक असते; परंतु तिने मतभेद व्यक्त केले की प्रश्न सुरू होतात. 'तुझ्याच भल्यासाठी' असा त्यांचा सूर असतो, ते अशा तऱ्हेने वागू लागतात की आपण काहीतरी चूक करतोय असे तिला वाटू लागते

एका मुलीला संगीतात आपली कारकीर्द करायची होती, एकीला कवयित्री व्हायचे होते; परंतु त्यांच्या वडिलांनी विरोध केला. एका मुलीला पदवीनंतर कायद्याचे शिक्षण घेण्याची

इच्छा होती तर वडिलांना तिचे लग्न करायचे होते. या काळात ती मानसिकदृष्ट्या इतकी खचली की तिला मानसोपचाराची गरज लागली. पुढे तिला युरोपमध्ये शिक्षणासाठी शिष्यवृत्ती मिळाली तर वडिलांचा आग्रह होता की तिने तियल्या राज्यातल्या विद्यापीठातूनच अभ्यासक्रम पूर्ण करावा. त्यावेळी मात्र तिने स्वत:च्याच मनासारखा निर्णय घेतला. वडिलांच्या मृत्यूनंतर तिच्या मनात आले की, ज्या क्षणी मी वडिलांची आज्ञा मोडली त्या क्षणीच मी वडिलांना गमावून बसले होते.

काही वेळा वडिल मुलीशी एक तऱ्हेची स्पर्धा करत असतात. जे आपल्याला जमले नाही ते कार्यक्षेत्र मुलीने निवडलेले त्यांना रुचत नाही. मग ते कार्यक्षेत्र योग्य कसे नाही हे ते तिच्या मनावर ठसवत राहतात.

मुली कितीही मोठ्या झाल्या तरी त्यांनी आपले ऐकले पाहिजे असा काही वडिलांचा अट्टाहास असतो. एका प्रथितयश प्रकाशन संस्थेत बरीच वर्षे काम केल्यानंतर मेरेडिथ या महिलेची वयाच्या एकोणचाळीसाव्या वर्षी नोकरी गेली. तेव्हा ती अठरा वर्षांची असावी अशा पद्धतीने वडिल तिच्याशी वागू लागले. आपला सल्ला तिने मानला तर आपण तिला मदत करू असे त्यांच्या बोलण्यातून ध्वनित होऊ लागले. शेवटी वडिलांचे ऐकायचे की आपल्या मनाचा कौल घ्यायचा याबाबत संघर्ष उभा ठाकला. आयुष्यात प्रथमच तिने स्वत:चा कौल स्वीकारण्याचा निर्णय घेतला. तिने स्वत: संपादनाची काही कामे घ्यायला सुरुवात केली; एक छोटेसे घर भाड्याने घेतले. हळूहळू तिला आर्थिक व व्यावसायिक स्थैर्य लागू लागले. आता तिला एखादे नवे क्षेत्र निवडण्याइतका आत्मविश्वास आला आणि आपल्यामधील क्षमतांची जाणीवही झाली. अनेक वर्षे मानसोपचार क्षेत्रात काम करणाऱ्या **डॉ. मूल्टोन** यांनी अशा अनेक स्त्रियांच्या हकिकतींची नोंद केली आहे.

आई-वडिल-मुलगी ही नाती मोठी गुंतागुंतीची व विचित्र असतात असे **डॉ. मूल्टोन** म्हणतात. अत्यंत उज्ज्वल व्यावसायिक कारकीर्द असलेल्या एका स्त्रीला आपल्या परावलंबी आईच्या मागण्यांमुळे कित्येक वर्षे कसा मानसिक संघर्ष करावा लागला याची हकिकत डॉ. मूल्टोन यांनी दिली आहे. या स्त्रीने तशाही स्थितीत शिक्षण पूर्ण करून डॉक्टरेटची पदवी प्राप्त केली. पुढे तिने विवाह केला. तिला मुले झाली. तिने कुठेतरी अर्धवेळ काम करायला सुरुवात केली, हळूहळू घर-नोकरी दोहोंचा ती मेळ घालू लागली. तरी आई सतत नापसंती व्यक्त करत राही. 'बायकांची खरी जागा घरातच असते. तू नोकरी करतेस खरी पण मुलांना काही भयंकर झालं तर ... इ. इ.'' दुसऱ्या एका स्त्रीचे उदाहरण असे आहे की, तिची आई तिला प्रत्यक्ष काही बोलायची नाही पण वडिलांचे इतके डोके खायची की ते ह्या स्त्रीला म्हणायचे, ''तू घरी बसलीस तर मी तुला पोसतो.''

एकीचा अनुभव असा की, ''माझ्या लहानपणापासून मी पाहात आलेय की, घरात आईला काही मान नसे. घरात वृत्तपत्र आले तर ते आधी वडिलांच्या हाती जाई. वडिल

त्यासंबंधी माझ्याशी बोलत. अन् आई आपली भांडी धुणे, ओव्हनमधुन बिस्किटे काढणे अशी कामे करत असे.''

जिथे आई अशी दबलेल्या वातावरणात राहात असे तिथे मुलीने बाह्य जगात वावरायला आई तिलाही नकारच देत असे. कदाचित तिला मुलीला मिळणाऱ्या संधीबाबत हेवाही वाटत असावा. मुलीने 'अती' पुढे जाऊ नये म्हणून वडिलांकरवी ती मुलीवर बंधने घालीत असे.

१९७० च्या दशकात मानसोपचारतज्ज्ञ, मनोविश्लेषक आणि समाजशास्त्रज्ञ यांनी स्त्रीमनाविषयीच्या संशोधनात मोठीच झेप घेतली व स्त्रीत्वाचे मानस-समाजवैज्ञानिक चित्र उभे करणारे अनेक अभ्यास सादर केले. उदा. एक अभ्यास सांगतो की स्त्रिया एखाद्या स्त्रीचे नेतृत्व स्वीकारायला मनापासून तयार नसतात. दुसऱ्या अभ्यासाचा निष्कर्ष असा आहे की, पुरुषापेक्षा स्त्रीला स्पर्धा अधिक अवघड असते. स्पर्धात्मक परिस्थिती निर्माण झाली की तिचा आत्मविश्वास डळमळतो. तिला सकारात्मक प्रतिसाद मिळाला तर तिचा आत्मविश्वास वाढतो पण शाब्दिक पाठिंबा जरी काढून घेतला तरी सोंगट्यांच्या पटावरील पहिल्या घरात जाऊन बसावे तशी तिची अवस्था होते.

एखादी अनपेक्षित, तातडीची परिस्थिती उद्‌भवली तर स्त्रिया पटकन निर्णय घेऊन टाकणार नाहीत. आपण योग्य मार्गाने चालले आहोत की नाही याचाच विचार करत बसतील. अनेक स्त्रियांनी आपल्या मन:स्थितीची नोंद करताना म्हटले आहे की, गोष्ट घडून गेली, एखाद्या निर्णयानंतर काळ उलटला तरी 'त्या' वेळी आपल्याला परिस्थितीशी जुळते घेता आले असते का? अशा विचाराने आपण अस्वस्थ होतो.

आणखी एका अभ्यासाने काढलेला निष्कर्ष धक्कादायक वाटेल. स्त्रियांना एखाद्या गोष्टीत यश मिळाले तरी आपल्या यशाचे मानसिक फायदे सहसा स्त्रियांना उठवता येत नाहीत; त्यामुळे एकामागून एक यशाच्या पायऱ्या त्या क्वचितच चढतात. स्त्रियांना आतून एक तुटलेपण सतत पोखरत असते. त्यामुळे मिळालेल्या यशात त्या निखळपणे स्वत:ला मिसळून टाकू शकत नाहीत. उदाहरणार्थ एखाद्या स्त्रीने गणितातला एखादा अत्यंत अवघड प्रश्न सोडवला आणि या यशाचे श्रेय कशाला द्यायचे म्हणून समजा तिच्यापुढे चार पर्याय आले - (१) माझ्यात तेवढी क्षमता नक्कीच होती. (२) मी खूप प्रयत्न केला. (३) प्रश्न तसा सोपाच होता. (४) मला नशीब अनुकूल होते. तर 'श्रेय देण्याच्या सिद्धांता'नुसार स्त्रिया आपल्या यशाचे श्रेय स्वत:कडे घेण्याऐवजी एखाद्या बाह्य घटकाला देतात. अन् त्यात 'नशीब' हा घटक त्यांच्या आवडीचा असतो.

यशाचे स्वत:चे श्रेय नाकारणाऱ्या स्त्रिया आपल्या अपयशाला मात्र स्वत:लाच जबाबदार धरण्याची संधी शोधत असतात. पुरुष आपल्या अपयशासाठी बाह्य कारणे शोधत असतात.



अनुक्रमणिका

कुणावरतरी, कशावरतरी दोषारोप करत असतात. स्त्रियांचे असे नसते. जणू काही आपण समाजाच्या दारापुढची पायपुसणी म्हणूनच जन्माला आलो आहोत असे गृहित धरून त्या सगळे दोष स्वत:चे शोषून घेतात. काही बायका असे समर्थन करतात की परोपकार बुद्धी ठेवून आपण स्वत:वर दोष ओढवून घेतला. पण तसे नसते. जो खराखुरा अपराधी असतो त्याच्याशी समोरासमोर रुजुवात घालायला त्या घाबरत असतात.

ज्या तऱ्हेने स्त्रियांना घडवले जाते, त्यामुळे त्यांच्यात कुठल्याही तऱ्हेचा धोका पत्करण्याचे धाडस येत नाही, अशी परिस्थिती आलीच तर त्या तिथून शक्यतो दूर पळतात. कुठल्याही तऱ्हेच्या चाचण्या, नवे वातावरण, नवी नोकरी, बदली त्या टाळतात कारण अशा नव्या परिस्थितीत आपल्याकडून काही चूक झाली तर कुणीतरी आपल्याला बोलेल, शिक्षा करेल असे त्यांना भय वाटते. कुटुंबातदेखील एखादा निर्णय घेण्याची जबाबदारी त्या आपल्या जोडीदारावर टाकतात.

याहून धक्कादायक निर्णय असा आहे की, पुरुषांच्या तुलनेत स्त्रिया आपल्यातील अव्यक्त बौद्धिक क्षमतांचा वापर कमी प्रमाणात करतात. बौद्धिक कार्याविषयीचा लिंगाधिष्ठित अभ्यास करताना स्टॅन्फोर्ड विद्यापीठात **डॉ. एलेनॉर मॅकोबी** यांनी असा निष्कर्ष काढला आहे की, प्रौढावस्थेतील स्त्री-पुरुषांची तुलना केली तर एकाच बौद्धिक क्षमतेचे पुरुष वाङ्मयनिर्मिती, कलानिर्मिती किंवा वैज्ञानिक क्षेत्रातील प्रकल्प या बाबतीत स्त्रियांपेक्षा अधिक भरघोस अशी कामगिरी करतात. आणि 'एकूण बुद्धिमत्तेबाबत प्रौढावस्थेत स्त्रियांचा स्कोअर कमी कमी होत जातो', या मागचे वास्तव असे आहे की शिक्षण संपल्यावर आपल्या बुद्धीचा वापर करणे त्या कमी कमी करत जातात. दुसऱ्या एका अभ्यासाने असे म्हटले आहे की, व्यक्तिमत्व जितके परावलंबी असेल तितके ते बौद्धिक क्षमतांना दुबळे करीत जाते.

स्त्रिया जेव्हा इतरांच्याबरोबर काम करत असतात तेव्हा नेमके काय घडते या विषयी काही वर्षांपूर्वी एक अभ्यास केला गेला होता. त्यातून एक मजेशीर निष्कर्ष हाती आला, तो असा की, एखादीच्या कामातील भागीदाराने जेवढे यश संपादन केले असेल त्याच्या व्यस्त प्रमाणात तिच्या आत्मविश्वासाची पातळी असते.

काही संपादन करण्याच्या मार्गातील स्त्रियांच्या मुख्य अडचणी म्हणजे आत्मविश्वास आणि स्वत:ला ओळखता येणे ह्या अगदी प्राथमिक गोष्टी होत. आत्मविश्वास नसला की स्त्रियांत द्वेष करण्याची वृत्ती वाढते. त्यामुळे पुरुष किती 'नशीबवान' आणि आपण किती 'कमनशिबी' असे सोपे विश्लेषण स्त्रियांकडून केले जाते. आजच्या जगात पुरुषांशी तुलना अटळ आहे. **क्लारा थॉम्पसन** यांनी वैफल्यग्रस्त झालेल्या एका स्त्री-वकीलावर उपचार केले. तिची हकिकत जाणून घेतांना आज बौद्धिक क्षेत्रात पुरुषांच्या बरोबरीने वावरताना आत्मविश्वास नसलेल्या स्त्रीची मानसिकता कशी असते याविषयी त्यांनी काही निरीक्षणे नोंदवली आहेत. "आपल्याला मुद्दामच दुय्यम दर्जाची वागणूक दिली जाते आहे, कायद्याचा



अनुक्रमणिका

अभ्यास करताना माझा नेहमी पहिल्या पाचात नंबर असे, आता आपल्याला जे स्थान मिळतेय ते काही योग्य नव्हे' असे वारंवार म्हणणाऱ्या या स्त्रीला सारखे वाटत राही की तिच्या पुरुष सहकाऱ्यांना जे यश मिळतेय ते प्रयत्नांशिवाय मिळतेय. तिच्या मनात एकाच वेळी या पुरुष सहकाऱ्यांबद्दल स्पर्धेची भावनाही असायची आणि द्वेषाची भावनाही असायची. जणू काही 'त्यां'च्या जवळ असं काहीतरी आहे की, त्याचा उपयोग ते यश मिळवण्यासाठी करतात. आपल्यातील आत्मविश्वास आणि आत्मभानाचा अभाव लपवण्यासाठी स्त्रिया अशी समर्थने करीत राहतात.

प्रत्येक बाबतीत दुसऱ्याच्या तोंडाकडे पाहण्याची स्त्रियांची प्रवृत्ती झाली आहे. याच दृष्टीने, मदतीच्या अपेक्षेने त्या मित्र-मैत्रिणी, नवरा, मुले यांच्या नात्याकडे पाहतात. फार फार वर्षांपूर्वीपासून हेच नैसर्गिक आहे असे आपल्याला सांगितले गेलेय आणि त्यामुळे आपण पांगळ्या झालेल्या आहोत हे आपण लक्षातच घेत नाही.

कुटुंब जीवनात स्त्रिया अनेकदा स्वत:च्या इच्छा-आकांक्षांना दडपून ठेवून जगत राहतात, याचे वर्णन बहुधा 'स्त्रीने कुटुंबासाठी त्याग करणे' अशा पद्धतीने केले जाते. परंतु हा त्याग डोळस नसतो; असे लेखिकेचे म्हणणे आहे. या आंधळ्या त्यागामागची कारणमीमांसा शोधण्याचा तिने प्रयत्न केला आहे.

एका 'अ' स्त्रीची ही कहाणी. १९६७च्या उन्हाळ्यात या गोष्टीची सुरुवात होते, ज्यावेळी 'अ'च्या लग्नाला पाच वर्षे झाली आहेत. नवऱ्याला The Atlantic Monthly या मासिकासाठी एक महत्त्वाचा प्रकल्प करायला मिळालाय; याचा 'अ' ला आनंद झालाय. तो ऑफिस कामानंतर संशोधन करणे, तुकड्या तुकड्यांनी काही भाग लिहून काढणे यात गुंतलाय. 'अ'ने उत्साहाने आपणहून त्यांच्या लेखनिकाचे आणि संपादकाचे काम स्वीकारलेय. तो ऑफिसमधून यायच्यावेळी ती त्याच्यासाठी संध्याकाळचे जेवण तयार ठेवते. मग चार वर्षांखालच्या आपल्या तिन्ही मुलांना घेऊन बगीचात जाते. ती अंधार पडेपर्यंत. घरी परतल्यावर मुलांना आंघोळी घालून, भरवून साडे आठपर्यंत झोपवते. आणि मग जेवणाच्या खोलीत बसून, मधल्या काळात नवऱ्याने जे लिहूनं काढलेय ते संपादित करत बसते. आता वास्तविक तिने घरगुती जीवनाबद्दल थोडे थोडे लिहायला सुरुवात केलेली असते. पण नवऱ्याचे हे काम तिला फार विस्मयकारक वाटते. नवऱ्याच्या काही कल्पना तिला धूसर वाटतात आणि त्या अधिक स्पष्ट होणं आवश्यक आहे असंही तिला वाटतं पण आपल्याला कुठे या विषयातलं कळतंय? यासाठी निदान पदवीधर असायला हवं, हुषारी हवा, नाहीतर पुरुष असायला हवं, तरच या गुंतागुंतीच्या गोष्टी समजतील असं ती स्वत:ला बजावते.

तिला असं वाटतं कारण, आता तिचं वय एकोणतीस असतं आणि तरी वृत्तपत्र वाचण्याची तिला सवय लागलेली नसते. त्यातल्या आर्थिक-राजकीय गोष्टींचा आपल्या आयुष्याशी संबंध आहे असे तिला वाटत नसते. कोण देश चालवतंय? कसा चालवतंय?



अनुक्रमणिका

का चालवतंय? पैसा येतो कुठून? तो वापरला कसा जातो? याच्याशी तीन छोट्या मुलांच्या आईला काय करायचंय? असा तिचा दृष्टीकोन असतो. याच काळात स्त्रीवादी चळवळींना नुकतेच मूळ धरलेले असते स्त्रियांनी अधिक जबाबदारी पेलण्याची गरज आहे. या मुद्यावर त्यात भर दिलेला नसतो. उलट, स्त्रियांना परंपरेने नाकारलेले व्यवसाय, पुरुषांबरोबरीने मेहनताना, निर्णयाचा हक्क या गोष्टी त्यांना द्याव्यात असे ह्या चळवळी सुचवत असतात. गंमत अशी की, जेव्हा बायका अधिकाधिक गोष्टींची अपेक्षा करायला लागल्या तेव्हा त्या अधिक गोष्टी इतरांनी (विशेषत: पुरुषांनी) द्याव्यात अशी त्या मागणी करू लागल्या. स्त्रियांना स्वातंत्र्य हवे होते पण जबाबदारीचा विचार नव्हता.

हे खरे आहे की समाजाने बाल संगोपनाचे कार्य स्त्रीच्य गळ्यात बांधून तिला बंदिस्त केले होते. परंतु 'अ' म्हणते, "आमच्या संसाराला पैसा पुरत नव्हता पण आपणहून त्यासाठी जबाबदारी उचलायची माझी तयारी नव्हती. मी घरातल्या घरातच अधिकाधिक कष्ट करत गुलाम होणे पत्करत होते. पण आम्ही स्वत:ला समकालीन, विचार करणारे असे म्हणवून घेत होतो तरी मी पैसा मिळवला पाहिजे असे आम्हा दोघांच्याही मनात येत नव्हते. तशी मी काही गरोदरपणाला घावरणारी किंवा कुणी घाबरवले तर वेशुद्ध पडणारी अशी भित्री बाई नव्हते. उलट विवाहानंतर मी अधिक सामर्थ्यशाली झाले होते. तीन लहान मुले, घर, स्वयंपाक, कपडे धुणे-इस्त्री करणे. आणि सिनेटर्सच्या ऑफिसना फोन करणे या सगळ्या गोष्टी सांभाळण्याइतकी ऊर्जा माझ्यात होती. माझ्यातल्या सूप्त सामर्थ्याच्या बळावर मी नवऱ्याला आधार देत होते.

तो संध्याकाळचा त्याच्या प्रकल्पाचे काम करीत असे आणि खरे तर त्याला अंतर्मनात भयाने पछाडलेले होते. आपला प्रकल्पात अपयशी ठरणार नाही ना याचे भय, सिनेटर्स आणि काँग्रेसमन यांच्याकडे मुलाखती मागण्याचे भय (कारण कदाचित ते नाही म्हणतील), नव्या आणि अधिक आव्हानात्मक पातळीवर काम सुरू करण्याचे भय (कारण त्यामुळे आपल्या क्षमतांचा कस लागेल आणि त्याला एखाद्यावेळी आपण संपून जाऊ) तेव्हा अशा काही गोष्टींना मी कधी सामोरी गेलेले नव्हते. मला त्याची भीती अवास्तव वाटायची. आणि तो हा प्रकल्प निश्चितच करू शकेल याबद्दल मला विश्वास होता. या सगळ्यातून मी माझे दुपारचे फोन्स करण्याचे वेळापत्रक बसवले होते.

मी सिनेटर्सच्या सचीवांना फोन करायचे, "माझा नवरा ॲटलांटिक मंथलीत खाद्यपदार्थाच्या किंमतीवर काम करतोय." मी अतिशय शांतपणे, दृढपणे बोलायचे. वृत्तपत्रांची ताकद मला माहिती होती. (सिनेटर्सचे दरवाजे लगेचच उघडले जायचे), हे काही माझे सामर्थ्य नव्हते, माझ्या नवऱ्याचे होते. माझ्या नवऱ्याच्या वतीने मी काम करतेय म्हणून मला स्वत:ला अगदी सामर्थ्यशाली आणि छान वाटायचे. माझी स्वत:ची प्रतिमा, व्यक्तिगत

बुद्धिमत्ता झाकलेलीच होती. योजना आखणे, तपशील ठरवणे, त्यांची अंमलबजावणी करणे आणि आपल्या वरिष्ठाला जे हवेय ते नीटपणे पुरवणे या दृष्टीने मी एक वरच्या दर्जाची सचीव होऊ शकले असते.

पण स्वतंत्र न राहता तुमचे आयुष्य तुम्ही दुसऱ्याला देऊन टाकले की तुम्हाला कधी कधी नैराश्य येते. अशा खूप वेळा यायच्या. माझा नवरा अनेकदा निराश व्हायचा अन् नैराश्य बुडवण्यासाठी पीत राहायचा. अशा वेळी मलाही विलक्षण आगतिक वाटायला लागायचे. घायाळ झाल्यासारखं वाटायचं, आपण किती परावलंबी आहोत, आपण काहीच करू शकत नाही असं मनात यायचं. सकाळच्या वेळी मन इतकं व्याकुळ व्हायचं की, आपल्या जगण्यात काही अर्थ नाही असा विचार करता करता, आपला विवाह अयशस्वी झालाय असंही वाटायला लागायचं. दुपारनंतर आम्ही एकमेकांची क्षमा मागायचो, आपण बदलायला हवे म्हणून शपथा घ्यायचो आणि शेवटी एकमेकांना क्षमा करायचो.

प्रौढ होऊनदेखील नऊ वर्षांचे वैवाहिक जीवन मी एखाद्या लहान मुलीप्रमाणे जगत होते. मी सगळी सगळी घरकामे करत होते आणि माझ्या तुरुंगाच्या भिंती अधिक पक्क्या करण्यातच माझे प्रयत्न वाया जात होते.''

ही आधुनिक स्त्रीची प्रातिनिधिक कहाणी आहे. स्त्रियांची विवाहाविषयीची पारंपरिक दृष्टी वर्षानुवर्षात बदललेली नाही हे यावरून लक्षात येते.

**डॉ. अँथनी पायट्रोपिंटो** आणि **जॅक्लिन सिमॅन्युअर** यांनी Husbands and wives नावाचे एक पुस्तक लिहिले आहे. त्यांचे म्हणणे असे की, अजूनही स्त्रियांना विवाह म्हणजे आपल्याला सुरक्षित ठेवणारी गढी वाटते. लग्न करताना त्या एखाद्या राजपुत्राची अपेक्षा करत असतात; तो येईल आणि आपली जबाबदारी घेईल. चैतन्यदायी सहजीवन त्यांच्या दृष्टीने दुय्यम असते. स्त्रियांची शैक्षणिक गुणवत्ता आणि त्यांचे प्रेम, विवाहविषयक विचार यात तसा काही संबंध दिसत नाही. एका पदव्युत्तर पदवी घेतलेल्या स्त्रीने या पुस्तकाच्या लेखिकेला सांगितले, ''मी अमुक माणसाशी लग्न केले. कारण मी त्याच्या आयुष्याच्या केंद्रस्थानी होते. तो नेहमीपेक्षा वेगळ्या मार्गाने जाऊन मला आनंदी ठेवायला झटत होता. मला वाटले होतं की, तो मला आर्थिक सुरक्षा देईल.'' सर्वेक्षणातून 'स्त्रियांना नवऱ्याकडून असलेली आर्थिक सुरक्षेची अपेक्षा' हा मुद्दा बराच वरचढ ठरला. त्या खालोखालची स्त्रियांची दुसरी इच्छा म्हणजे भावनिक दृष्ट्या परस्परांत पूर्ण गुंतून जाण्याची असते.

Medical / Mrs नावाचे एक मासिक आहे. या मासिकातर्फे एक नमुनेदार पाहणी केली गेली. ज्यांनी आर्थिक सुरक्षिततेच्या कारणासाठी नवरा, म्हणून मुद्दाम डॉक्टरची निवड केली होती. अशा डॉक्टरांच्या बायकांचे हे सर्वेक्षण होते. आपल्या हजारो वर्गणीदार स्त्रियांना त्यांनी एकच प्रश्न विचारला होता, ''तुम्ही ज्याची अपेक्षा केली होतीत आणि समाजाने तुम्हाला जे देण्याचे वचन दिले होते ते नेमके हेच आहे का?'' एकीची तक्रार होती की, ''वास्तविक

इतर बायकांपेक्षा डॉक्टराच्या बायकोच्या जास्त अपेक्षा असतात पण तिला तेवढा भावनिक आधार किंवा सकारात्मक प्रतिसाद मिळत नाही. आमच्या नवऱ्यावर आम्हाला छोट्याशा कामासाठीसुद्धा अवलंबून राहता येत नाही." आणखी एकीने निराशेने म्हटले होते की, "बाबा रे, तू जो जास्तीचा वेळ बाहेर देतोस त्यामुळे तुझा पैसा किंवा प्रतिष्ठा वाढणार नसून तुला कुटुंबातून वजा करतोय तो पैसा आणि मलाही माझ्या आयुष्यासाठी वेळ उरत नाही, कारण तीन मुलांना सांभाळत घर मलाच चालवावे लागतेय." दुसऱ्या एकीने म्हटले, "दु:खाची गोष्ट अशी की, त्याच्यापासून वेगळे, स्वतंत्र असे माझे स्वत:चे आयुष्य सुरू करणे मला भाग पडले." हे जे 'भाग पडणे' होते, ही खरी तर दोघातल्या नात्याची चिकित्सा होती.

या स्त्रियांना मिळणाऱ्या आर्थिक सुरक्षेच्या व्यस्त प्रमाणात त्यांना भावनिक सुरक्षितता मिळत होती. या पाहणीतून असे लक्षात आले की, त्याला जो आधार मिळत होता, जो प्रतिसाद मिळत होता, जे मैत्रीचे कौटुंबिक आयुष्य मिळत होते. त्या मोबदल्यात तो तेवढे काही देत नव्हता.

बऱ्याच जणींचे म्हणणे असे होते की, तो आपल्यासारखा उत्साही नाही, त्याला मर्यादा आहेत. त्याला स्वत:च्या अस्तित्वा पलिकडच्या बाह्य जगात रस नाही. तो खरोखर काही करत नाही. (स्वत:ला नवऱ्याशिवाय स्वतंत्र अस्तित्व नसलेल्या स्त्रियांना, अशक्य नसले तरी हे स्वीकारणे अवघड जात होते की, आपल्यापेक्षा वेगळे असे जे त्याचे अस्तित्व आहे ते तो मजेत व्यतीत करतोय)

"तुमच्या नवऱ्याला जो परमेश्वरसदृश मान्यता मिळतेय तिचा तुम्हाला हेवा वाटतो का?" ह्या प्रश्नाला ४८ टक्के स्त्रियांनी जोरात 'हो' असे उत्तर दिले होते. एकीचे उद्गार असे आहेत, "माझा नवरा हॉस्पिटलमध्ये परमेश्वर असू दे आणि त्याचा शब्द म्हणजे कायदा असू दे, पण कुटुंबातल्या निरोगी नात्यांमधल्या अपेक्षा वेगळ्या असतात हे त्याला कळत नाही ही खरी समस्या आहे. तो मला आणि मुलांना सारख्या आज्ञा करत असतो, आम्हाला ते आवडत नाही. तो न्यूरोसर्जन आहे आणि ऑपरेशनच्यावेळी त्याच्यावर ताण असतो हे मी समजू शकते. पण आता माझे वय ३६ आहे, आम्हाला ११ आणि १२ वर्षे वयाची मुले आहेत आणि एकूणच या सगळ्या चाकोरीला मी अतिशय कंटाळलेय. मला जोवर नवा मार्ग सापडत नाहीए तोवर मी त्याच्याकडे दुर्लक्षच करायचे ठरवलेय."

तिचे उद्गार कसे अंत:करण पिळवटून आलेले वाटतात. 'सुरक्षितता' म्हणजे तिला केवळ आर्थिक सुरक्षितता नको होती तर त्याने आपल्या स्त्रीला आंजारून गोंजारून घ्यावे ही तिची अपेक्षा होती. त्याच्या वर्चस्ववादी वागण्याच्या पाठीमागे नक्कीच, आपण आपल्या बायकोला पोसतोय ही भावना अंतर्मनात खोल दडलेली असली पाहिजे. ती जो जो त्याच्याकडे "तू घराकडे दुर्लक्ष करतोस" म्हणून तक्रार करत राही तो तिला टाळण्यासाठी

हा हॉस्पिटलमध्ये जास्त वेळ काढी. आपलं वागणं, अगदी आपली अहंमन्यता सुद्धा त्याला योग्यच वाटे. आपल्या बालिशपणे वागणाऱ्या बायकोपासून स्वत:ला दूर ठेवण्याचा त्याचा प्रयत्न असे. ती जितका आग्रह धरी की त्याने आपले ऐकावे, घरी राहावे तितका तो चिडत असे. आणि ती तर त्याच्याशिवाय कुठेही जात नसे. परिणामी तिचे नैराश्य आणि 'आपले आयुष्य नव्याने सुरु करण्याचा प्रयत्न.'

'Togetherness' ही पन्नाशीच्या दशकातील आदर्श विवाहाचे वर्णन करणारी एक कल्पना होती. दोघांचे इतके जवळिकीचे नाते असावे की दोघांनी मिळून मते बनवावीत, स्वप्ने रंगवावीत, कल्पना कराव्यात; असे सगळे अनुभव दोघांनी वाटून घ्यावेत. साठीमध्ये त्या कल्पनेला जणू काही सुरुंग लागला. एकमेकांवर इतकं अवलंबून राहाणं विकृत असल्याचं मानलं जाऊ लागलं. यामुळे स्त्री किंवा पुरुष स्वतंत्रपणे वाढू शकत नाही, विकसू शकत नाही, बदलू शकत नाही, अशी भूमिका स्त्रियांच्या मासिकांनी घेतली. परंतु प्रत्यक्षात स्त्रियांना togetherness (एकत्रितपणा) या रेशमी कोषातून बाहेर पडण्याची इच्छा नव्हती. उलट असे चित्र दिसते की, समाजाने मान्यता दिलेल्या स्वायत्ततेपासून दूर जाणे टाळण्यासाठी बऱ्याच स्त्रियांना विवाह ही संधी वाटते. बाह्यत: त्या मुक्त आहेत असे वाटू देत परंतु आतून जे भय स्त्रिया अनुभवताहेत त्यामुळे हातात हात घालून उद्याच्या सोनेरी क्षितिजाकडे जाणाऱ्या, एकमेकांत मिसळून गेलेल्या पन्नाशीतल्या जोडप्याच्या चित्राकडेच त्यांचे मन ओढ घेते,

मानसशास्त्र ज्याला seperation-individuation असे म्हणतात असा हा प्रश्न आहे. याचा अर्थ असा की, स्त्री असो वा पुरुष असा, ही व्यक्ती मुळात 'एकटी' राहू शकते का? म्हणजे स्वत: खंबीरपणे जगणे, आपल्या स्वत:च्या कल्पना स्वत: विकसित करणे, आयुष्याकडे पाहण्याचा आपला स्वतंत्र दृष्टिकोण घडवणे हे तिला जमते का? नाहीतर त्या अभावी अनेक लग्ने धोक्यात येऊ शकतात.

Togetherness प्रमाणे मानसशास्त्रात आणखी एक संज्ञा वैवाहिक जीवनासंदर्भात योजली जाते, ती म्हणजे Fusion (परस्परांत मिसळून जाणे) पतीला किंवा पत्नीला एकटे असण्यात किंवा विभक्त होण्यात भय वाटते. अशा वेळी आपली व्यक्तिगत ओळख परस्परांत मिसळून टाकण्याचा ते प्रयत्न करतात. "मला त्याचे मन वाचता येते", "प्रत्येक बाबतीत आमची मते अगदी सारखी असतात", "आम्हाला एकमेकांच्या भावना जाणता येतात." अशी त्यांची वाक्ये असतात, मात्र त्यातून परस्परांविषयीचा जिव्हाळा व्यक्त होण्याऐवजी "आपण एकटे पडलो तर?" हे भय असते.

एक दुसऱ्यात मिसळून जाण्याची जी गरज आहे तिचे मूळ बालवयात असते. लहान मूल एकीकडे स्वत:च्या अस्तित्वाची ओळख पटवून घ्यायला उत्सुक असते व दुसरीकडे आईपासून दूर होण्याचे त्याला / तिला भय वाटते; मुलाच्या विकासाच्या पहिल्या टप्प्यावर



अनुक्रमणिका

ते ही fusion ची (मिसळण) अवस्था अनुभवत असते. येल विद्यापीठातील **ज्रोन वेक्सलर व जॉन स्टिडल्** या 'मानसोपचारक समाजविज्ञान' शिकविणाऱ्यांनी वैवाहिक जीवनात मिसळणं पद्धतीचे नाते अपेक्षिणाऱ्या स्त्री पुरुषांच्या मानसिकतेचे नाते बालवयातील विकासाच्या पहिल्या टप्प्याशी जोडले आहे. ही मिसळून जाण्याची धडपड म्हणजे एकटे राहणे, स्वतंत्र राहणे, वेगळे राहणे याला दिलेला नकार असतो.

अशी वर्षानुवर्षे एकमेकात मिसळून जगण्याप्रमाणे जगणारे पती-पत्नी हे मानसशास्त्रीय दृष्ट्या या विकासाच्या पहिल्या टप्प्याच्या पातळीवरच घट्ट रुजले जातात. त्यांचे वर्णन **वेक्सलर व स्टिडल** यांनी 'नकली, फिकट नृत्यातील बंदिस्त झालेल्या राखाडी आकृती' असे केले आहे.

जोडपी अशी कशी जगतात?

स्वत:चे रक्षण करण्यासाठी त्यांनी आखलेली ती समीकरणे असतात. पुरुष हे बंध तयार करायला काही अंशी जबाबदार निश्चितच असतात, परंतु स्त्रियांचे तोल सावरण्यासाठी चाललेले प्रयत्न मोठे चातुर्याचे असतात. उदा. त्या कुटुंबाला अशी शिस्त लावतात की, सकाळी सर्वांनी केव्हा उठायचे, केव्हा झोपायचे, जेवायला केव्हा बसायचे इ. बद्दल त्यांच्या परीने, योग्य निर्णय घेऊन त्याच आखणी करतात, थोडक्यात हे त्यांना 'आपल्या पद्धतीने' चालायला हवे असते. नवरा कामानिमित्त बाहेरगावी गेला तरी सतत फोनवर संपर्कात राहतो. अशा वेळी स्त्रिया, मुले, नातेवाईक, काही निवडक मित्रमंडळी यांना गोळा करून 'कौटुंबिक जीवन' संरचित करण्याचा प्रयत्न करतात. एखादी स्त्री सतत कुटुंबातल्या व्यक्तींवर टीका करून त्यांना आपल्या बोटावर नाचवत राहते; तर 'आपल्याशिवाय नवऱ्याचे अजिबात चालत नाही' म्हणून एखादी त्याच्या सर्व गोष्टी (बूट-मोजे काढणे, हातरुमाल-किल्ली देणे इ. पासून) करत राहते. हा आंधळा त्याग म्हणजे स्वत:ला फसवणे होय.

या संदर्भात **मॅडेलिन बोरोफ** हिची हकिकत ऐकण्याजोगी आहे. वयाच्या अठराव्या वर्षी तिचे मॅनीशी लग्न झाले आणि एखाद्या कुत्र्याने मालकाच्यामागे चालू लागावे तसे तिचे आयुष्य त्याच्यामागे मार्ग आक्रमू लागले. आपण कसे जगणार आहोत याचा तिने विचारच केला नव्हता; जणू तो तिचा प्रश्न नव्हताच. जोवर मॅनी झोपडीत राहात होता तोवर ती झोपडीत राहिली. त्याने स्वत:चे घर घ्यायचे ठरवले. पण तो कर्जाचे हप्ते कुठून भरणार याची तिला काही कल्पना नव्हती, ते जाणून घेण्याचा प्रयत्न न करताच तिने त्याच्या कल्पनेला पाठिंबा दिला. जेव्हा त्याला लेखक बनण्याची संधी आली तेव्हा आपली चार मुले सांभाळत त्याचे स्वप्न पुरे करायला तिने मदत केली. त्याच्या नोकरीशिवाय चार-आठ महिने राहाणे शक्य होते पण नंतर त्यांच्या घराचे अंदाजपत्रक कोसळले. त्याने जाहिरात क्षेत्रात काम करून पाहिले पण त्यात तो विफल झाला आणि तो मद्याच्या आहारी गेला. त्याला

आयुष्यभर फक्त लेखन करायचे होते. उत्पन्नाचे दुसरे साधन आपल्या हाती नाही हे माहित असूनही मॅंडेलिन त्याला पाठिंबा देत राहिली. एकदा एका जागी घर घेण्यासाठी समाजकल्याण विभागाकडून कर्ज घेतले असतांना त्याचे हप्तेही न फेडता नवऱ्याच्या सांगण्यावरून तिने दुसऱ्या जागी घर घेण्यासाठी स्वत:च्या नावे पुन्हा समाजकल्याण खात्याकडे कर्ज मागितले. वास्तविक ती हा मोठाच धोका पत्करत होती; परंतु तिच्या अंतर्मनात असलेल्या एकटेपणाच्या भयाने तिला इतके ग्रासले होते आणि स्वत:ला ओळखण्याचाही ती प्रयत्न करत नव्हती. या भयापोटीच ती नवरा करत असलेल्या समाजकल्याण खात्याच्या फसवणुकीत सामील झाली. अखेर तिलाही नवऱ्याबरोबर तुरुंगाची हवा खावी लागली.

तोवर वैवाहिक जीवनाची बावीस वर्षे पूर्ण झाली होती. यानंतर ती जागी झाली. तिने मुक्त व्हायचे ठरवले. चाळीसाव्या वर्षी तिने रात्रशाळेत नाव घातले, नोकरी शोधली. इ. इ. परावलंबी व्यक्तिमत्त्वाचा हा एक नमुना आहे.

लग्नाच्या वेळी बोहल्यावर उभे राहताना मुलीच्या मनात कल्पना असते की, नवरा हा प्राणी आपल्याला पोसणार आहे, आपली काळजी घेणार आहे, आपल्याला सर्व बाबतीत प्रोत्साहन देणार आहे. नंतर मात्र तिच्या लक्षात येते की ही अपेक्षा बालिश आहे.

'आदर्श स्त्री'च्या कल्पनेचा मुलींच्या मनावर इतका पगडा असतो की विवाहानंतर स्वत:च्या जबाबदाऱ्या, स्वत:चा विकास यापेक्षा इतरांना खूष करणे हे त्या आपले ध्येय मानतात. विवाहानंतर स्त्रीचाही विकास झाला पाहिजे. परंतु कित्येकदा असेही चित्र दिसते, की विवाहापूर्वी स्वतंत्रपणे वावरणाऱ्या मुली विवाहानंतर पंधरा-वीस वर्षातच परावलंबी होतात. **जेसी बेरनार्ड** या एक समाजशास्त्रज्ञ. त्यांनी एका महिलेची हकिकत सांगितली आहे ती अशी, लग्नाआधी स्वत:ची पर्यटनसंस्था चालवणारी एक स्त्री पंचावन्नाव्या वर्षी विधवा झाली तेव्हा ती इतकी गोंधळून गेली की पासपोर्ट कसा काढायचा, त्यासाठी काय करावे लागेल हेही ती विसरून गेली.

'आदर्श स्त्री' म्हणजे नवऱ्यावर अवलंबून असलेली स्त्री, हे समीकरण मनात बिंबलेल्या स्त्रिया वेगवेगळ्याप्रकारे आपल्या इच्छांचा तोल सावरण्याचा प्रयत्न करतात. कधी त्या आपल्या नवऱ्याची 'तो फारच मोठा आहे, श्रेष्ठ आहे' अशी प्रतिमा उभी करतात, कधी 'मला बाई अमक्या तमक्यातलं अजिबात काही समजत नाही' असं म्हणत आपल्या आवडी-निवडी, गरजा आणि बुद्धीदेखील बंद करून टाकतात, तर कधी या उलटची एक युक्ती म्हणजे, 'माझा नवरा म्हणजे एक लहान मूल आहे' अशी त्या बतावणी करत राहतात. **बॅरी थॉर्न** या समाजशास्त्रज्ञ स्त्रीने एक मजेशीर अनुभव सांगितला आहे. ''ॲस्ट्रोफिजिक्स मधले सगळे उच्चपदस्थ एकदा सहकुटुंब एका पार्टीला जमले होते.



अनुक्रमणिका

हॉलमध्ये एका कोपऱ्यात बसून त्यांच्या कृष्ण विवराबद्दल चर्चा चालल्या होत्या, आणि त्याच वेळी हॉलच्या दुसऱ्या कोपऱ्यात बसून त्यांच्या बायका 'आपला नवरा म्हणजे एक लहान मूलच आहे' हे एकमेकींना अहमहामिकेने सांगत होत्या. जेव्हा स्त्रिया असे बोलत असतात तेव्हा त्याचा अर्थ असतो, त्या दु:खी आहेत. त्यांना आपल्या स्वत:च्या आयुष्याचे काय करावे ते कळत नाही, म्हणून त्या अशा तक्रारी करत राहतात.

खूपदा आपल्या नवऱ्याची अगदी लहान सहान कामे करण्याच्या त्यांच्या धडपडीमागे त्याने दुबळे राहावे, आपल्यावर अवलंबून राहावे, आपल्याला सोडू नये ह्या सूप्त इच्छेतून केलेली भावनिक गुंतवणूक असते. परंतु सुरक्षितता हे वास्तव असते की मिथक? सतत नवऱ्यात गुंतलेले राहिल्याने खरोखर सुरक्षितता मिळते का? हे प्रश्न खरे तर स्त्रीने स्वत:ला विचारायला हवेत.

समाजशास्त्रज्ञांचे म्हणणे आहे की, विवाहानंतर पुरुष त्यांची जीवनशैली, विचारपद्धती क्वचितच बदलतात. आपण एकटे होतो ते आता दुकटे झाले या पलिकडे त्यांच्यात काही बदल होत नाही. स्त्रीचे असे होत नाही. स्त्रीने बदलले पाहिजे अशी समाजाची अपेक्षा असते. तिने अधिक मृदु व्हावे, 'तो' व 'मी' याच्यातली रेषा पुसून टाकावी, त्याच्यात आपले आयुष्य विरघळवून टाकावे अशी अपेक्षा तिच्याकडून केली जाते तेव्हा ती क्वचितच या व्यवस्थेपुढे प्रश्नचिन्ह उभे करते. पत्नी म्हणून झीज सोसता सोसता तिच्या व्यक्तीमत्वाला एक वेगळाच आकार येत जातो आणि तो नवऱ्याच्या इच्छा, गरजा, मागण्या यांच्याशी जुळवून घेत आलेला असतो.

याचे एक कारण असते की त्यांना स्वत:ला कुठला आधार नसतो. विवाहापूर्वी त्यांनी मिळवलेली कौशल्ये, सरावाअभावी गंजून गेलेली असतात. मुले लहान असताना सहा-सात वर्षे विराम घेऊन पुन्हा कारकीर्द सुरू करणे हे विलक्षण त्रासाचे असते. अशा वेळी नव्या प्रशिक्षणाची गरज असते, तुम्ही वर्तमान जगात कुठे आहात याचे पुनर्मूल्यांकन करण्याची गरज असते. विवाहाच्या वेळी असणाऱ्या तुम्ही या क्षणी त्याच राहिलेल्या नसता. विवाहापूर्वी एखाद्या गोष्टीची जबाबदारी आपली स्वत:ची आहे याची जाणीव असते, विवाहानंतर स्त्री नकळत ही जबाबदारी नवऱ्याची आहे असे मानायला लागते आणि त्याने ती नाकारली तर 'हे काही बरं नव्हे' असे तिला वाटू लागते.

परावलंबित्वामुळे वास्तविक आत्मविश्वास कमी होत जातो आणि मग स्त्रिया स्वत:चाच रागराग करायला लागतात.

लिंगाधारित एका अभ्यासाने असे सिद्ध केले आहे की, पुरुषांपेक्षा स्त्रिया अधिक नकारात्मक विचार करतात, वैवाहिक जीवनात एखादी समस्या नवऱ्याच्या वागण्यामुळे निर्माण झालेली असली तरी बायकोला वाटते, आपलेच काहीतरी चुकलेय, स्वत:वर विश्वास नसण्याचाच हा परिणाम आहे.



अनुक्रमणिका

तिशीच्या वयातील घटस्फोटित मुली जेव्हा दुसरे लग्न करतात त्यावेळचे त्यांचे अनुभव ऐकण्याजोगे असतात. दोन्ही लग्नांच्या मधल्या काळातही त्या आत्मनिर्भर होऊ शकलेल्या नसतात. एकीने म्हटले, "पहिले लग्न मोडले तेव्हा आपण जणू नरकाच्या वाटेवर येऊन पडल्या आहोत आणि आता दुसरा येईल तो आपला उद्धार करणार आहे अशी माझी भावना होती." दुसरी म्हणाली, "दुसऱ्या लग्नानंतर एक दिवस असा उगवतो की तुमच्या लक्षात येते, मी खरीखुरी समाधानी नाही, पण तोवर वय वाढलेले असते, आता पुन्हा विभक्त होणे, घटस्फोट घेणे अवघड असते. तिसरीचे म्हणणे आहे, "तुम्हाला पशूचा स्वभाव बदलता येणे शक्य नसते. प्रथम वाटते की आपण त्याला बदलू शकू. पण नंतर वाटायला लागते की आता त्याला स्वीकारणे एवढेच शिल्लक राहिलेय." एका पदव्युत्तर पदवीपर्यंतचे शिक्षण घेतलेल्या स्त्रीची कबुली आहे, "आजवर मी पगार मिळवला नव्हता, स्वत:ला त्यासाठी प्रशिक्षित केले नव्हते, आपल्या स्वत:ला आणि कुटुंबाला आपण आधार देऊ शकतो असा विचारही माझ्या मनात आला नव्हता आणि त्या दिशेने विचार करणे सुद्धा खरोखर कठीण वाटत होते."

ज्या स्त्रिया विवाहजीवनाबद्दल तक्रार करत नाहीत त्यांना तक्रार करण्याजोगे काही नसते किंवा त्या फार खंबीर असतात असेच काही नाही. पण तक्रार करणे म्हणजे पुन्हा आपला स्वत:चाच संताप आणि नको त्या भावनांचा पुन्हा पुन्हा अनुभव घेणे हे त्या समजून असतात, पण असे असणे धोक्याचेच असते. ज्या स्त्रिया म्हणतात की, माझे नवऱ्यावर खूप प्रेम आहे त्यातल्या कितीतरी जणींचे प्रेम म्हणजे एकटीने आयुष्य जगण्याचे भय असते.

स्त्रीचे हे परावलंबित्व तिला गुलामगिरीकडे घेऊन जाते. ज्याच्यावर आपण अवलंबून आहोत तो आपला अपमान करतोय, आपले शोषण करतोय असे तिला वाटू लागते. अशा वेळी स्वत:मध्ये डोकावून पाहाणे अशक्य नसले तरी अवघड असते.

पती-पत्नी नात्यातील समस्यांसाठी त्यांच्यावर उपचार करणाऱ्या **मार्शिया गोल्डस्टेन** यांनी एका जोडण्याची कहाणी सांगितली आहे. "अ ही एका चुणचुणीत, मित्र-मैत्रिणींची आवड असणारी शाळेच्य प्रशासनात लक्ष घालणारी शिक्षिका. ती 'आ' या कलावंताच्या प्रेमात पडली. हा व्यापारी कलांमध्ये कारकीर्द करू पाहणारा 'आ' मुळातच निराशावृत्ती होता. त्याला प्रोत्साहित करण्यासाठी 'अ' त्याच्या स्टुडिओत जाऊ लागली; कदाचित त्याला कशाचीतरी गरज लागेल म्हणून त्याच्या अवतीभवती राहू लागली. तर तिचे त्याच्या भावेतालचे अस्तित्व त्याला घुसमटवणारे वाटू लागले. ते दोघे म्हणजे 'नकली, फिकट नृत्यातील दोन राखाडी आकृत्या' झाले.

ह्या परस्परांवरील भावनिक दडपणाचे पर्यवसान एकमेकांवर संतापण्यात होऊ लागले. त्याला स्वत:चा असा 'अवकाश' हवा असायचा की जेथे तो एकांतात, मुक्तपणे,

उत्स्फूर्तपणे आपले आपले काम करील. खरे तर आतून त्यालाही एकटेपणाचे भय वाटतच होते. पण त्याचा दोष तो 'अ' ला देत राहिला होता.

तो तिला टाळू लागला की ती भयभित होत असे. 'आ' एकटा स्टुडिओत थांबू लागला की ती विलक्षण अस्वस्थ होई.

ते दोघे जेव्हा आपली समस्या घेऊन **मार्शिया गोल्डस्टेन** यांच्याकडे आले तेव्हा त्यांनी दोघांना तीन महिने विभक्त राहून पाहायला सांगितले. पहिल्या महिन्यात परस्परांशी एकनिष्ठ राहायचे आणि स्वत:च्या वैयक्तिक विकासावर लक्ष केंद्रित करायचे. दुसऱ्या महिन्यात त्यांनी एखादा / एखादी जोडीदार मिळवायला हरकत नाही, य नव्या नात्याचा अनुभवही त्यांना घ्यावा. तिसऱ्या महिन्यात पुन्हा त्यांनी परस्परांशी एकनिष्ठ राहावे व या काळात परस्परांच्या नात्याचा पुनर्विचार करावा, आपल्या नात्यात काय आहे, काय नाही हे शोधावे.

तीन महिने झाल्यानंतर दोघांना स्वतंत्रपणे बोलावून त्यांच्या भेटी घेतल्या. 'अ' ने पहिल्या भेटीत तिच्या उपचारिकेला सांगितले की, "सगळे नीट व्हायला वेळ लागेल याची मला कल्पना आहे. परंतु माझे खरोखर त्याच्यावर प्रेम आहे आणि मला माहित आहे की त्याचेही माझ्यावर प्रेम आहे. आणि तो जर आपल्याला एक संधी देत असला तर आपणही प्रयत्न करू. वगैरे "ती बरीच तर्कशुद्ध, समतोल बोलत होती पण त्याआडून ती त्याच्याशिवाय राहू शकत नाही हेच व्यक्त होत होते. या मधल्या काळात तिला नोकरी मिळाली होती. तिने पूर्वीच्या मैत्रिणी-मित्र यांच्याशी संपर्क साधला होता. वैवाहिक जीवनाच्या काळात हे संपर्क तुटल्यातच जमा होते, पण आता त्यांच्याशी चांगला संवाद जुळला होता. त्यांच्याबरोबर ती छोट्या सहलींनाही जाऊन आली होती.

'आ' ने उपचारिकेजवळ आपला घटस्फोटाचा निर्णय जाहीरही केला होता. परंतु 'अ' मात्र या निर्णयाला येत नव्हती. याचे कारण अजूनही ती त्याच्यावर निर्भर होती हे नव्हते तर परंपरेने तिला ज्या पद्धतीने घडवले होते त्या जुन्या कल्पनांमुळे तिला तसे वाटत होते. वास्तविक तिच्या नव्या आयुष्याशी ते सुसंगत नव्हते. म्हणून **मार्सियाने** तिला विचारले, "हे नाते टिकून राहावे म्हणून काहीही किंमत द्यायची तुझी तयारी आहे का?" यावर तिने काही क्षण विचार केला आणि मग ती उत्तरली, "नाही. जर त्याने माझ्यावर संतापणे, मला दोष देणे चालूच ठेवले आणि त्याची कला फुलत नाही म्हणून त्याचे खापर तो माझ्यावर फोडत राहिला, माझ्याबरोबर राहातोय म्हणजे माझ्यावर उपकार करतोय अशी त्याची भावना असली तर मला हे नाते नकोय." नंतर त्यांनी परस्परांपासून दूर जाण्याचा निर्णय घेतला. एवढेच नाही तर यानंतर ती मोकळेपणाने समाजात मिसळू लागली, आणि माझे आयुष्य मलाच घडवायचे आहे अशा निर्णयाप्रत आली. ती आत्मनिर्भर झाली आणि म्हणून मुक्त झाली.

**लिंगभावाची अकारण भीती**

स्त्रीवादाच्या उदयानंतर स्त्रीमनाचा अभ्यास सुरू झाला. **डॉ. हॉर्नर** यांनी मिशिगन विद्यापीठात 'यशाबाबतची स्त्रीची मानसिकता काय आहे हे जाणून घेण्यासाठी एक प्रकल्प हाती घेतला. यासाठी त्यांनी ९० स्त्रिया व ८८ पुरुष यांची चाचणी केली. तेव्हा आजवर कुणी कल्पनाही केली नसेल असा निष्कर्ष त्यांच्या हाती आला. यश मिळण्याची केवळ शक्यता निर्माण झाली तरी स्त्री स्वत:ला अशी काही आवळून घेते की यश मिळविण्याच्या तिच्या इच्छाशक्तीलाच ती बंदिस्त करून टाकते. या अद्‌भुत प्रकाराला त्यांनी **'यशाचे भय'** अशी संज्ञा दिली.

पुरुषांपेक्षा स्त्रियांना यशाचे भय अधिक वाटते, त्या नर्व्हस होतात. यशासाठी जी किंमत मोजावी लागते त्यामुळे त्यांना असुरक्षित तर वाटतेच पण यशासाठी प्रयत्न करताना त्यांची काळजी वाढत जाते. **डॉ. हॉर्नर** म्हणतात की, ज्या स्त्रियांमध्ये यश मिळविण्याची क्षमता अधिक असते आणि ज्यांना यश मिळविण्याची महत्त्वाकांक्षा असते त्यांना यशाच्या भयाचा त्रास अधिक होतो.

कदाचित शिक्षण क्षेत्रात या निरीक्षणांबद्दल दुमत व्यक्त होत असले परंतु माध्यमांच्या क्षेत्रात स्त्रियांचे यशाविषयीचे भय प्रकर्षाने जाणवते. स्त्री स्वत:च स्वत:च्या अपयशाची धनी का होते? पुरुषाबद्दलची भावना, प्रेम, भावनिक सुरक्षितता, अशा सगळ्या गोष्टींचे जे एकत्रित गाठोडे 'स्त्रीसुलभ' म्हणून मानले गेले आहे त्याचा तर तिच्या यशाच्या वाटेत अडसर निर्माण होत नसेल?

स्त्रीच्या या विलक्षण, ओळखू न येणाऱ्या भयाचा शोध घेण्यासाठी डॉ. हॉर्नर यांनी जे तंत्र योजले त्याला 'कथापूर्तीचे तंत्र' म्हटले जाते. (Projective story completion). या तंत्राच्या सहाय्याने त्यांना विद्यार्थ्यांच्या अबोध मनात खोलपर्यंत डोकावता आले; विद्यार्थ्यांना काय वाटते, किंवा आपल्या भावनांविषयी ते काय विचार करतात किंवा त्यांच्या भावना काय असू शकतील हे जाणण्याचा त्यांचा प्रयत्न होता. त्यांनी विद्यार्थी / विद्यार्थिनींना सूचक असे एक विधान देऊन गोष्ट लिहायला सांगितली. ते विधान असे होते - (पुरुषांसाठी - जॉन, स्त्रियांसाठी ॲनी) - "पहिल्या सत्राच्या अखेरच्या परीक्षेत, वैद्यकीय अभ्यासवर्गात जॉन / ॲनी वर्गात सर्वप्रथम आला / आली. नंतर विद्यार्थ्यांनी लिहिलेल्या गोष्टींचे विश्लेषण केले गेले. त्यांनी लिहिलेल्या गोष्टींमध्ये त्यांचे दृष्टीकोन, त्यांच्या अपेक्षा सूप्त रूपात होत्या.

पुरुष विद्यार्थ्यांना या घटनेतून उद्याच्या उज्ज्वल कारकीर्दीच्या शक्यता विशेषत्वाने दिसल्या तर विद्यार्थिनींना या घटनेने काळजीने पोखरायला सुरुवात केली.



अनुक्रमणिका

नव्वद टक्के मुलग्यांना 'यश मिळणे' ही सहज स्वाभाविक गोष्ट तर वाटलीच परंतु मुलींवर प्रभाव टाकायला एक जास्तीच्या गुणाचा मुद्दा वाटला. पासष्ट टक्के मुलींना यशाची कल्पना अस्वस्थ व भयभीत करणारी वाटली. डॉ. हॉर्नर यांच्या मते यामागचे प्रमुख कारण म्हणजे आपले व्यावसायिक यश आपल्या जोडीदाराबरोबरच्या संबंधात धोकादायक ठरू शकेल असे स्त्रियांना वाटते. निष्प्रेम जगण्यापेक्षा यशाकडे पाठ फिरवणे त्या पसंत करतात.

मिशिगन विद्यापीठातील विद्यार्थिनींनी लिहिलेले ही कथानके बोलकी आहेत.

(१) ॲनी आपल्या पहिल्या नंबरवरून लगेच मागे झाली. आपला मित्र कार्ल याला ती अभ्यासात मदत करू लागली. लवकरच मेडिकल कॉलेज सोडून तिने कार्लशी विवाह केला; अन् मुलांच्या संगोपनात ती रमून गेली.

(२) एखाद्या स्त्रीने इतके बुद्धिमान आणि महत्त्वाकांक्षी असावे का? ॲनीला दुर्दैवान नक्की ठरवता येईना; की आपल्याला खरेच डॉक्टर व्हायचे आहे की नाही? ती अस्वस्थ होऊन विचार करू लागली की आपण खरोखर 'नॉर्मल' आहोत ना? शेवटी तिने ठरवले की मेडिकल कोर्स सोडून द्यावा आणि ज्याने आपले जीवन अधिक अर्थपूर्ण होईल असे काही अभ्यासक्रम निवडावेत.

(३) ॲनीने जेव्हा आपल्याला वाटलेले आश्चर्य आणि आनंद जाहीरपणे व्यक्त करायला प्रारंभ केला तेव्हा तिच्या सहाध्यायांना तिच्या या वागण्याचा अगदी तिटकारा आला. त्यांनी तिच्यावर हल्ला करून तिला बदडायला सुरुवात केली. त्यांनी तिला जगणे अशक्य करून टाकले. (४) ॲनी म्हणजे मुरुमाने भरलेल्या चेहऱ्याचा पुस्तकातला किडा. ती जेव्हा नोटीसबोर्डकडे धावली आणि आपण पहिल्या आलोय हे तिला कळले तेव्हा वर्गातल्या इतरांचे 'यात काय नवीन आहे?' सारखे शेरे तिच्या कानी आले. तिला त्याचे तीव्र दु:ख झाले.

या प्रतिक्रियांमधून स्त्रीची पारंपरिक प्रतिमा जशी व्यक्त झाली आहे त्याचप्रमाणे एकूण समाजाकडून होणाऱ्या विरोधाचेही भय व्यक्त झाले आहे.

'विवाहाचे भवितव्य' या पुस्तकाची लेखिका **जेसी बेर्नार्ड** म्हणते की, बहुतेक पुरुषांना आपल्या बायकोने लठ्ठ पगार देणाऱ्या, वरिष्ठ पातळीवरील नोकऱ्या करणे नको असते. **डॉ. हॉर्नर** यांच्या म्हणण्यानुसार ही प्रवृत्ती मध्यमवर्गीय व उच्च मध्यमवर्गीय पुरुषांमध्ये अधिक आहे. आर्थिकदृष्ट्या कनिष्ठ वर्गातून आलेल्या मुलींनी आपल्या आया वडिलांपेक्षा अधिक शिकलेल्या असल्याचा, अधिक कमावत्या असल्याचा अनुभव घेतला आहे. अशा मुलींच्या मनात यश व स्त्रीसुलभता यात संघर्ष दिसत नाही.

पुढच्या एका अभ्यासातून 'वर्ग आणि स्त्रीमनातील संघर्ष' याचे नाते **हॉर्नर** यांनी अधिक स्पष्ट केले. गोरी स्त्री व काळा पुरुष हे जोडपे व काळी स्त्री-गोरा पुरुष, हे जोडपे यांचा

वरील संदर्भात तुलनात्मक अभ्यास केला असताना पहिली जोडपी दुसऱ्या तऱ्हेच्या जोडप्यांपेक्षा यशाबाबत अधिक उत्सुक दिसली. (म्हणजे बायकोच्या यशाबाबत नवऱ्याच्या मनात गंड नव्हता की बायकोच्या मनात भय नव्हते) फक्त १० टक्के गोऱ्या पुरुषांना आणि फवत २९ टक्के काळ्या स्त्रियांना यशाचे भय वाटत होते.

यशाच्या भयाचा परिणाम प्रत्यक्ष यश संपादनावर होतो का? आधीच्याच महाविद्यालयीन विद्यार्थ्यांची चाचणी घेतल्यावर असा परिणाम निश्चितच होतो अशा निष्कर्षाला **हॉर्नर** आल्या. त्यांनी ती प्रक्रिया पुढीलप्रमाणे स्पष्ट केली आहे.

नकारात्मक परिणामाचे भय ——> यशाचे भय ——> कमी यश.

एकदा स्त्रीच्या मनात यशाचे भय निर्माण झाले की, थंडीमध्ये पारा जसा मागे सरकत जावा त्याप्रमाणे त्यांची यशसंपादनाची इच्छा मागे खेचली जाते. त्या यश टाळू लागतात. जरी त्यांची क्षमता मोठी असली तरी, यशाचे भय ज्यांच्या मनात आहे अशा स्त्रिया कमी आव्हानात्मक, ज्यांना पारंपरिक पद्धतीने 'स्त्रीसुलभ' म्हटले जातील असे व्यवसाय- गृहिणी, आई, परिचारिका, शिक्षिका - स्वीकारतात. जणू काही या आव्हानात्मक कारकीर्द टाळल्यामुळे आपण अजूनही बाईपण टाकलेले नाही हे सिद्ध करता येतो.

व्यक्तिगत पातळीवर, एकेका स्त्रीपुरता विचार करताना यश टाळणे हे उघडपणे आत्मघातकी वाटतही नाही. परंतु एकंदरित स्त्रीजातीचा विचार करताना 'यशाचे भय' ही घटना दुर्लक्षित करण्याजोगी नाही. स्वत:ला कमी लेखणे, आपल्या क्षमतेपेक्षा एक पायरी मागे राहाणे. पण प्रेमात धोका न पत्करणे हे का घडते? लिंगभावाच्या अकारण भीतीमुळे. एखादी गोष्ट करून पाहण्याऐवजी ती टाळण्याकडे स्त्रियांचा कल अधिक दिसतो. 'स्त्रीत्व' म्हणजे काय? 'स्त्री सुलभता' कशाला म्हणायचे? याविषयी आधुनिक स्त्रीच्या मनात निर्माण झालेल्या गोंधळाचा हा परिपाक आहे.

स्वत:ला नाकारण्याचा हा खेळ दु:खद आहे. एखादी ज्युली डॉक्टर व्हायचे म्हणून महाविद्यालयात प्रवेश घेते. पण नंतर तिला मित्र भेटतो अन् ती निर्णय बदलते 'एज्युकेशन'चे काही क्रेडिट्स मिळवून ती थांबते. तिचे आईवडिल याबद्दल तिचे कौतुक करतात, हा निर्णय शहाणपणाचा असल्याचा निर्वाळा देतात. तिचा मित्रही तिला म्हणतो की, "बरं झालं, मुलं मोठी झाल्यावर तुला शिक्षकीपेशाकडे केव्हाही वळता येईल." आपल्या क्षमतांपासून मागे फिरून स्त्रिया स्वत:ला ज्युलीप्रमाणे तोकड्या करून घेतात.

**डॉ. हॉर्नर** यांचे पहिल्या अभ्यासाचे निष्कर्ष इ. स. १९६८ मध्ये प्रसिद्ध झाले. ते इ. स. १९६४ मध्ये केलेल्या पाहाणीवर आधारलेले होते. दरम्यान स्त्रीस्वातंत्र्याच्या चळवळीने जोर धरला. स्त्रीवरील सांस्कृतिक दडपणे दूर केली पाहिजेत असा विचार मांडला जाऊ लागला. **डॉ. हॉर्नर** यांचा अभ्यास सुरुच होता. नंतर त्यांनी साठीच्या दशकाच्या अखेरीसच्या व



अनुक्रमणिका

सत्तरीच्या दशकातील सुरुवातीच्या 'मुक्त' (liberated) तरुण स्त्रियांना अभ्यासविषय केले. तेव्हा माध्यमांनी निर्माण केलेल्या स्त्रीप्रतिमेला छेद देणारे चित्र समोर आले. **डॉ. हॉर्नर** यांनी आपल्या अहवालात म्हटले की, "१९७०मध्ये गोऱ्या स्त्रियांनी यशाविषयी व्यक्त केलेल्या नकारात्मक दृष्टिकोनात पूर्वीपेक्षा वाढ झाली आहे. १९६४च्या पाहणीत तो ६५टक्के होता तर १९७० च्या पाहणीत तो ८८.२टक्के इतका आढळला.'

महत्त्वाकांक्षी किंवा बुद्धिमान असलेल्या मुलींनीही यशापासून दूर राहावे म्हणून त्यांना नाना तऱ्हेची प्रलोभने समाजाकडून दाखवली जातात आणि मग त्याही लिंगभावाला घाबरून (gender panic) आपली बुद्धिमत्ता, आपली महत्वाकांक्षा दडपून टाकतात. आपण स्त्री झालं पाहिजे म्हणून त्या झटत राहतात. (They try to make themselves woman, with a capital w) यशस्वी स्त्री ही 'दुसऱ्याच्या' घरातील मुलगी असावी अशी समाजाची इच्छा असते. परंतु ज्या स्त्रिया आपल्यातील क्षमता दडपून टाकतात त्यांच्या वाट्याला चिडखोरपणा, कडवटपणा, गोंधळेपणा येतो. आपल्या क्षमता दडपल्या जाणे ही आपला समस्या आहे हे त्यांच्या लक्षात येत नाही, आणि त्या नवऱ्यावर चिडू लागतात, मैत्रिणींचा द्वेष करू लागतात. एकीने कबुली दिली की लग्नानंतर अभिनयाच्या क्षेत्रापासून तिला दूर जायला लागल्यामुळे ती वेड्यासारखी आपल्या मैत्रिणींशी नको त्या बाबतीत तुलना करू लागली. उदा. अमकीला मूल नाही ती किती सुखी आहे, तमकीने आपली शरीरयष्टी कशी पातळ ठेवलीय आणि ती किती चांगले कपडे वापरू शकतेय इ. इ.

स्त्रियांच्या वर्तणुकीच्या अशा अनेक नमुन्यांचे निरीक्षण करून डॉ. हॉर्नर नमूद करतात की, सगळ्यात वाईट गोष्ट म्हणजे gender panic आपल्या आयुष्यावर अधिराज्य गाजवतेय याची त्यांना कल्पनाच नसते.

ॲड्रेन होल्झर आणि सल्का ब्लिस या दोन अमेरिकन स्त्रियांच्या कथा हेच सांगताहेत.

ॲड्रेन एक बुद्धिमान, उत्साही स्त्री, विवाहापूर्वी छोट्या मोठ्या नोकऱ्या करत असलेली. विवाहानंतर मुले झाली; मुले मोठी झाली मग चौतिशीच्या वयात ती नोकरीला लागली. तोवर जग बदलले होते. सामान्यत: इतर स्त्रियांबाबत घडते तेच तिच्याबाबतही घडले होते, म्हणजे चौतिशीच्या वयात तिची वाढ मात्र विशीतल्या मुलीइतकीच झाली होती. वयाच्या चाळीशीपर्यंतही ती मनाने फार वाढली नाहीच.

घरी नवरा, मुले. ती नोकरीवर निघाली की मुले 'बाय' म्हणत तिला निरोप देणारी. पण नोकरीतही तिचे मन रमेना. नोकरी, त्या बरोबर येणाऱ्या पार्ट्या ..... सगळेच तिला कंटाळवाणे वाटू लागले.

आत्तापर्यंत 'मी काय करतेय? का करतेय?" असे प्रश्न तिने टाळलेच होते. पण आता मात्र 'हे नाही, तर दुसरे काय?' हा प्रश्न तिला छळू लगला. मनात एक भय असे, 'मी



अनुक्रमणिका

एकटी राहिले तर?' त्यातच तिच्या एका मैत्रिणीच्या नवऱ्याला त्रेचाळिसाव्या वर्षी हृदयविकाराचा झटका आल्याचे तिने ऐकले. त्यामुळे ती अधिकच हबकली. 'आजपासून पाच वर्षानंतर मी काय करत असेन? दहा वर्षानंतर? ... दहा वर्षानंतर मी असेन का? नवऱ्याला काही झाले तर?' असे नाना विचार डोक्यात येऊ लागले. कशातच रस वाटेना झाला.

जेव्हा ती समूपदेशकाकडे गेली आणि समूपदेशकाने तिला बोलते केले तेव्हा लक्षात आले की आजच्या तिच्या स्थितीचे मूळ तिच्या भूतकाळात आहे.

तिला मुळात परदेशी सेवेत (foreign services) मध्ये जायची इच्छा होती. पण तिच्या मित्राने तिची थट्टा केली; म्हणाला, "तू मला धरून राहा, मग तुला हेर होण्याची गरजच उरणार नाही. तिनेही आपली इच्छा पूर्ण करण्याचा प्रयत्न केला नाही. किंबहुना त्यानंतर ती आणि तिचा मित्र पुन्हा या विषयावर बोललेही नाहीत. तो फिल्म इन्स्टिट्यूटला गेला; त्याच्यापाठी तीही न्यूयॉर्कला गेली. काही काळ दोघे संपर्कात होते. नंतर भेटी थांबल्या. दरम्यान हिच्या आयुष्यात गॅरी आला. तो म्हणाला, "तुला हवं ते तू कर. मी आपल्या दोघांसाठी भरपूर पैसे कमाविन." मग तिनं स्वत:च्या आयुष्याचा विचार करणंच सोडून दिलं.

ती एक पत्नी झाली. वाढणारी, विकसणारी मानवप्राणी उरली नाही. अशा वागण्यामुळे जे नुकसान होते ते तत्क्षणी लक्षात येत नाही. अँडेनचे तसेच झाले. तिच्यासाठी आयुष्य इतके सहज, सोपे झाले की माणसाला अस्तित्वासाठीसुद्धा काहीएक संघर्ष लागतो हे तिला उमगलेच नाही. नंतरही तिला वाटत राहणारी काळजी (मी एकटी राहिले तर? आजपासून दहा वर्षांनी काय होईल?) ही तिचे आयुष्याविषयीचे आकलन कसे धूसर आहे तेच व्यक्त करते.

आणि ही दुसरी एकजण - सलका, सलका ब्लिस ती लेखिकेला भेटली ऑकलंडच्या एका displaced home maker's च्या संस्थेत. (मुद्दाम हे शब्द तसेच ठेवलेत. याचे मराठीकरण करताना काय होईल? विस्थापित गृहिणींची संस्था? स्त्रियांचा अनाथाश्रम? परित्यक्ता गृहिणींची संस्था? ..... अ. नाथ, परित्यक्ता या शब्दांतून स्त्रीचे वस्तुपण अधिक अधोरेखित होते) मलका अत्यंत निराश मन:स्थितीत होती. "ह्या मुलांची काळजी घेण्यापलिकडे काय करावं तेच कळत नाही. आता माझा टायपिंगचा स्पीड मिनिटाला तीस शब्द इतकाही राहिला नाही." तो हताशपणे म्हणाली.

शाळेत असताना सलकाचा बुध्यांक १३५ होता; म्हणजे ती एक बुद्धिमान मुलगी होती. ती गणितात अत्यंत हुषार होती. तिला पुढे शास्त्रज्ञ व्हायचे होते. "पण मुली कुठे शास्त्रज्ञ होतात का?" भाऊ चिडवायचा. 'मला केमिस्ट व्हायला आवडेल म्हटलं की, मी उगाचच काहीतरी बोलतेय असे आईला वाटायचे" ती सांगते.

तिने जेमतेम ज्युनियर कॉलेजची दोन वर्षे केली आणि मग तिचे लग्न झाले. काळाने तिच्या महत्त्वाकांक्षा गुंडाळून टाकल्या. पूर्वीची सडपातळ, चुणचुणीत सलका बाळंतपणानंतर वरीच लठ्ठ झाली. आपल्या देहाचा आकार कमी करण्यासाठी तिने काही काळ प्रयत्न केले पण मुळात चिकाटी नसल्याने इतर अनेक गोष्टींप्रमाणे तेही सोडून दिले. घरातल्या वस्तू अस्ताव्यस्त पडू लागल्या. एक दिवस डिक, तिचा नवरा घर सोडून गेला; तिला वाटल डिकने तिच्या लठ्ठपणाकडे पाहून तिला सोडले. पण तिच्याशी बोलल्यानंतर हाती लागलेले सत्य वेगळेच होते.

डिकला मॉलेक्यूलर बायॉलॉजीत डॉक्टरेट मिळाली तेव्हापासून त्याचे एक पाऊल घराबाहेर असायचे. वास्तविक त्याला ही पदवी सलकाने मिळवून दिली असेंच म्हटले पाहिजे; कारण त्याला या विद्यापीठातून त्या विद्यापीठात फिरायला लागायचे तेव्हा नोकरी करून तिनेच त्याला आधार दिला. सेक्रेटरी म्हणून पूर्णवेळ नोकरी करून शिवाय आठवड्याखेरीज ती त्याचे टायपिंग करून देत असे. डिक प्रस्थापित होईपर्यंत तिने मूलही होऊ दिले नाही.

त्याला पदवी मिळाली, लगेच कॅलिफोर्नियात एका तंत्रसंस्थेत चांगली नोकरी मिळाली, तशी तो तिला म्हणाला, "आता तू तुझी नोकरी सोड." तीही नोकरी सोडून त्याच्याबरोबर गेली. आता तो त्याची लॅब, विद्यार्थी, प्रयोग यात रमला. तिलाही हायसे वाटले.

आता ती शोभेची झाडे लावायला आणि मूल होऊ द्यायला मोकळी झाली. एक वर्ष असंच गेलं. १९६५ मध्ये तिच्या पहिल्या मुलीचा जन्म झाला. आता तिचं आणि मुलीचं विश्व वेगळं झालं, त्यात डिक बहुधा नसायचाच. तसं ते तिघांचं कुटुंब होतं. अनेकदा त्याच्या विभागाच्या पार्ट्यांना ती जायची; पण ती तिथे रमत नसे. तिला आपल्या आपल्या घरकुलात अधिक बरे वाटे. तिला आणखी मुलं झाली. १९७० ती कशी दिसू लागली? लेखिकेने दिलेली उपमा अशी- like those stufted cotton piglets attached to the big mama pig with metal grip fasteners. अर्थात सलका त्यात समाधानी होती. स्वत:चे कपडे स्वत: शिवत होती. आपल्या लांबलचक रेशमी केसांची निगा राखत होती, मुलांना काखोटीला मारून बाजार, सिनेमा अशी कुठेही फिरत होती. डिक बरोबर नसायचाच, नसला तर नसला; तिला विशेष काही वाटत नसे. शास्त्रज्ञ आपल्या कामात गुंतलेलेच असणार, स्वाभाविक आहे, ती म्हणे.

१९७० च्या दशकाच्या प्रारंभी डिकच्या आयुष्यात काही गोष्टी वेगाने घडल्या. तो आणि त्याचे सह. संशोधक यांनी एक मोठा प्रकल्प हाती घेतला. त्यात ते इतके गुंतले की, रात्र रात्र तो अनेकदा प्रयोगशाळेतच राहू लागला. तिथेच थोडा वेळ झोप घ्यायची, पुन्हा काम करायचे. सलकाची त्याची क्वचितच शांतपणे भेट होत असे. सलकाला त्याचा चेहरा

टवटवीत पण डोळे मात्र ढगाळलेले दिसले. जणू बाह्य जगानं आपल्या विश्वात ढवळाढवळ करू नये म्हणून पांघरलेल्या बुरख्याप्रमाणे.

डिक आपल्यातच गुंग होता. एक दिवस नवाच उगवला. एका मोठ्या अधिकृत संस्थेने जेनेटिक इंजिनियरिंगमध्ये पैसाच पैसा ओतला. त्या रात्री डिक म्हणाला, "शक्ती अवस्थांतराचा हा त्राता ठरणार आहे." (It will be the savior of the energy crisis), खरे तर हा संपूर्ण भविष्यकाळाचाच त्राता आहे. त्याच्या बोलण्यातील 'त्राता' हा शब्द तिच्या मनात रुतला.

तो हे बोलला त्याच्या दुसऱ्या दिवशी पहाटेच तोच घर सोडून गेला. तिच्या मनात आले, "तो स्वत:ला त्राता समजत होता काय?"

तो गेल्यानंतर ती त्याच्या वागण्याचे विश्लेषण करू लागली. भावनिक असमाधान अलिप्तता या गोष्टी पूर्वीच सुरु झाल्या होत्या; आता हे लक्षात आलं तेव्हा खूप उशीर झाला होता. डिक आता नवे जग, नवी नोकरी, नवा पैसा, नवे आयुष्य, कदाचित नवी स्त्री शोधायला निघाला होता.

तिला स्वत:ला परित्यक्ता म्हणवून घ्यायलाही लाज वाटत होती. डोळे पुसत ती सांगत होती, "जसे त्याला यश मिळाले त्या क्षणी त्याने तीन मुलांना, मला सोडले. घराचे हप्ते भरायला पैसे नाहीत याचाही विचार केला नाही."

समूपदेशनानंतर सलकाला काही वेगळ्या पद्धतीने विचार करणे शक्य झाले. आपले आयुष्य घडवायला केवळ आपला नवराच कारणीभूत होता असे नाही, आपलीही काही विशिष्ट भूमिका असायला हवी होती. आपण काही शिकायचे म्हटले असते तर आपले आई-वडिल, मित्र-मैत्रिणी यांनी आपल्याला आधार दिला असता, आपल्या हुषारीची ते नेहमी आठवण करून द्यायचे हे तिने कबुल केले. आपणच आपल्यातल्या क्षमता वाढवल्या नाहीत. नोकरी सोडून घरी बसल्याने स्वातंत्र्य गेले. ज्यामुळे विकास होत असतो, अशी काही आव्हाने उरली नाहीत. दहा वर्षांनंतर आपल्या या जगण्याची किंमत चुकवण्याची तिच्यावर वेळ आली.

लेखिका, म्हणते, "आता ती कदाचित लवकरच टायपिंगचा पूर्वीचा वेग आत्मसात करील पण आत्मविश्वास आणि सामर्थ्य मिळवायला तिला वेळच लागेल. कदाचित अमेरिकेच्या दुसऱ्या टोकाची ॲड्रेन तिला भेटली तर सलका तिला इशारा देईल," तुझं आयुष्य तू घडवत राहा. कमीत कमी धोका असलेला रस्ता खरं तर अगदी सुरक्षित नसतो. फक्त तो तसा वाटतो. इतकंच."



अनुक्रमणिका

स्त्रिया नेहमी 'आई'चे जग आणि 'वडिलांचे' जग या दोहोंच्या परीघावर गोंधळून उभ्या असलेल्या दिसतात. आपल्या आवडीची कारकीर्द सुरु करताना त्या स्वत:ला झोकूनही देऊ शकत नाहीत आणि स्वत:ला त्यापासून मागेही खेचू शकत नाहीत. आपली भूमिका निवडताना त्यांना खूप अडथळे जाणवतात. 'निवड' करणे चा अर्थ मुक्तपणे व जाणीवपूर्वक एखादी कृती करणे. त्या कृतीचे काही परिणाम असू शकतील हे ओळखणे व कुठलेही परिणाम स्वीकारण्यास तयार राहणे.

आपल्या नव्या निवडीतून कोणते धुमारे फुटतील याची स्त्रियांना जाणीव नसते. त्या बिचकतात. आपल्या जुन्या सवयींचा त्याग करून पूर्णपणे नव्या स्पर्धात्मक जगात उतरणे त्यांना शक्य होत नाही. जुन्या सवयीत सुगंधी द्रव्ये, पावडरी इथपासून तर पुरुषाने आपल्यासाठी मोटरचे दार उघडून देणे, आपली सिगारेट पेटवून देणे इथपर्यंत अनेक गोष्टी येतात. कुणाला वाटेल, यात काय विघडले? प्रत्यक्षात या कृती धोकादायक नाहीत परंतु 'पुरुषाने आपली काळजी करणं किती सुखदायक आहे' ही त्यामागची भावना धोकादायक आहे.

या लहान लहान गोष्टींमधून कुणीतरी, विशेषत: पुरुषांनी आपले लाड करणे, आपल्याला हवे असते, असे त्या दाखवून देत असतात. मी पुरुषांना आवडते आणि त्याचवेळी मी यशस्वीही आहे असा त्यांचा समज असतो. पण त्या स्वत:ला फसवत असतात. कुणीतरी आपली काळजीही घ्यायची आणि आपण स्वतंत्रही राहायचे या दोन्ही गोष्टी एकाच वेळी करणे म्हणजे ब्रेक्सवर पाय ठेवून त्याच क्षणी गाडी सुरु करण्यासारखे आहे. जर आपल्याला आपले इप्सित साध्य करायचे असेल तर आवश्यक तेथे आपण वाद घातला पाहिजे, आक्रमक झाले पाहिजे.

परंतु स्त्रियांना सहसा भाष्यात्मक किंवा दुसऱ्याचा अवमान करणारी विधाने करायला आवडत नाही; आपण एकाकी पडण्याचे त्यांना भय वाटते. या भीतीमुळेच व्यवसायात पुढे जाण्यासाठी आवश्यक असलेली कुशलता आणि तंत्र विकसित करणे त्यांना जमत नाही. मिशिगन विद्यापीठातील **लुई हॉफ्फमन** यांचे निरीक्षण असे आहे की, एखादा मुद्दा ठासून मांडणे, एखाद्या वादविवादात जिंकणे, स्पर्धेत दुसऱ्याचा पराभव करणे, हाताशी असलेले जबाबदारीचे काम करत असताना संबंधित व्यक्ती आपल्याला बाजूला सारत असल्यास तसे होऊ न देणे, इतरांशी चांगला संवाद निर्माण करणे या बाबतीत स्त्रिया कितीही बुद्धिमान असल्या तरी त्यांना अडथळे येतात.

स्त्रिया एकाच वेळी स्वत:ला पुढेही ढकलत असतात आणि मागेही खेचत असतात. याचे मुख्य कारण म्हणजे आपले संपूर्ण काम प्रतिक्रियात्मक आहे असे त्यांना वाटते. पुरुष जेव्हा परवानगी देतात तेव्हा त्या काम करतात, नको तेव्हा त्या घरी बसतात. सध्याच्या



अनुक्रमणिका

समाजाच्या आर्थिक गरजांपोटी पुरुषांनी स्त्रियांच्या नोकरीला परवानगी दिली. काही स्त्रियांच्या हे लक्षात आलेय की, नोकरी करण्याचे आणि बायकोही राहण्याचे हे नवे स्वातंत्र्य स्त्रियांना 'आतून' मिळालेले नाही तर बाहेरून लादले गेलेय. एका शालेय शिक्षिकेने तक्रार केले की, माझ्या पगारामुळे आम्ही आठवड्यातून एकदा बाहेर हॉटेलात जेवायला जाऊ शकतो म्हणून माझा नवरा सध्या खूष आहे; पूर्वी माझ्या नोकरीमुळे घर आणि मुलांकडे दुर्लक्ष होते म्हणून तो कुरकूर करायचा. एकदा आर्थिक स्थिती बदलली की त्याचा दृष्टिकोन नक्कीच बदलेल."

नक्कीच. कारण दुसऱ्या महायुद्धानंतर स्त्रियांनी कारखाने चालवण्याची गरज उरली नाही तेव्हा त्यांना पुन्हा चुलीकडे धाडले गेले आणि आम्ही गेलो. आणि या अनुभवातून आपण काहीच शिकलो नाही.

स्त्रिया या प्रतिक्रियात्मक असतात; त्यांना त्यांची अशी वैचारिक बैठक नसते. 'त्याला' काय हवे आहे, 'तो' कशासाठी परवानगी देईल यावर स्त्रियांचे प्राथमिक निर्णय अवलंबून असतात; याचे कारण म्हणजे त्या पुरुषाकडे आपला रक्षणकर्ता म्हणून पाहात असतात.

स्त्रीचा विवाह मोडतो तेव्हा काय होते? तिला मुलांच्या, आर्थिक जबाबदाऱ्या पेलाव्या लागतात आणि ती स्वत:च स्वत:चा मार्ग शोधायला लागते. हे तिचे वर्तनही प्रतिक्रियात्मकच असते. त्याच स्त्रीचा पुन्हा विवाह झाला की लगेच चित्र बदलते. ती पुन्हा चार भिंतीत जाते.

"तू माझी या जगात काळजी घे आणि मी तुझी घरात काळजी घेईन" असा एक करार उलगडला जातो.

दीर्घकाळ एकट्या राहिलेल्या एका स्त्रीने विवाहानंतरचा आपला अनुभव सांगितला, "आपला जगण्यातला अवकाश दोघांत वाटला गेल्याबरोबर माझे काम थोडे कमी महत्त्वाचे झाले, त्याचे थोडे अधिक महत्त्वाचे. सहा महिन्यानंतर मी 'त्याच्या' आणि 'आमच्या' भविष्याचा विचार करू लागले, कसा कोण जाणे 'माझा' भविष्यकाळ त्या चित्रातून आपोआप वगळला गेला." स्त्री-पुरुष जोवर शेजारी शेजारी राहात असतात तोवर दोघांच्या दोन भिन्न कारकीर्दी असतात. पण ते एकत्र राहायला लागले की लागलीच त्यात श्रेष्ठ-कनिष्ठता येते.

एकदा पुरुष आयुष्यात आला की स्त्री स्वत:च्या श्रद्धांवर विश्वास ठेवणे थांबवते. एका तरुण स्त्री रुग्णाने **डॉ. मोल्टन** यांना सांगितले की, "मला जे महत्वाचे वाटतेय त्याला महत्त्व देण्यासाठी मला पुरुष हवा होता."

स्वत:च्याही नकळत स्त्री, आई-वडिलांच्या काळात जी रचना होती तीच पुन्हा संरचित करू लागते. **सिलिया गिलबर्ट** या लेखिकेने एकदा म्हटले, "मी स्वत: आईसारखी नाही

म्हणून मी बाबांसारख्या नसणाऱ्या माणसाशी लग्न केले. पण लग्नानंतर आमच्यात आणि आई-बाबांच्यात विलक्षण साम्य दिसू लागले. आपण आईचे नमुनारूप आईचा आदर्श नाकारत असलो तरी आपल्याही नकळत आपल्या आजूबाजूच्या बायकांकडून आपण स्त्रीसुलभतेचे धडे घेत असतो हेच खरे.' आपण काय करायला हवे हे तिला उपजतच कळत असते. मानसोपचारतज्ज्ञ **डॉ. रॉबर्ट सेंडबर्ग** म्हणतात. 'लहान मुलीच्या मनात एक तऱ्हेचा नैतिक संघर्ष निर्माण होत असतो. आपली आई, आजी, आत्या-मावशा-काक्या-माम्या यांना ती घरगुती कामात गढून गेलेल्या बघते आणि बाहेरच्या जगात कार्यरत असलेल्या बायकांचा तिटकारा केला जातोय हेही ती बघते; त्यामुळे आपल्या आजुबाजूच्या स्त्रियांपेक्षा वेगळं जगणं हे अनैसर्गिक, अनैतिक आहे की काय असे तिला वाटू लागते.

आईने आपल्या नमुना रूपातून आखून दिलेल्या मार्गापेक्षा वेगळ्या, भलत्याच मार्गाने जाणाऱ्या स्त्रीची काय अवस्था होते? स्वतंत्र, स्वत:चा मार्ग चोखाळताना एखाद्या लहान मुलाच्या अंत:करणात असते तसे भय तिच्या मनात असते. "मी स्वतंत्र मार्गाने गेले तर काहीतरी वाईट घडणार नाही ना?" आपण आईचा मार्ग नाकारलाय, आता आयुष्यात आपल्याला समाधान मिळणार की नाही?तिला जर योग्य असा आदर्श लाभला नाही तर ती खोल अशा मानसिक विवंचनेत कोड्यात सापडते. तिला ना आपल्या आईसारखे व्हायचे असते, ना बाबासारखे. मग तिने कोणासारखे व्हावे?" हा लिंगभावाधारित आत्मशोधाचा पेच म्हणजे लिंगभावाधारित भयाचा अर्क आहे.

**डॉ. हॉर्नर** यांच्या अभ्यासातून असे लक्षात येते की, लिंगभावाधारित भय या समस्येचे एक उत्तर म्हणजे स्त्रीने आपली महत्त्वाकांक्षा मिटून टाकणे. दुसरे म्हणजे आपली नवी, जबाबदारीची कारकीर्द सांभाळत असतानाच आपल्या परंपरागत स्त्रीभूमिकेला लोंबकळत राहण्याचा प्रयत्न करणे. घर - कारकीर्द अशा दोन्ही भूमिका निभावण्याच्या प्रयत्नांचा नकारात्मक परिणाम म्हणजे थकवा, काळजी, खूप काम पडते म्हणून येणारा चिडखोरपणा. अलिकडच्या स्त्रियांच्या या वर्तनाची चर्चा माध्यमांमधून नेहमी होते; परंतु या वर्तनामागील कारणांची सखोल चर्चा होत नाही. **नाताली गिट्टेलसन** यांनी 'नॅशनल कमिशन ऑन वर्किंग वुइमेन' च्या वतीने एक पाहणी केली. पैसा मिळवणे व घर सांभाळणे या दुहेरी ओझ्याखाली दडपलेल्या स्त्रियांची हजारोंनी पत्रे आली. त्यातून त्या पत्रांना ओवणाऱ्या, न तुटलेल्या धाग्याप्रमाणे 'मी प्रचंड थकलेय' हे वाक्य होते. पगाराचा चेक, नवऱ्याचा बक्षिसाप्रमाणे वाटणारा प्रतिसाद याविषयी काही पत्रातून उल्लेख होते; नाही असे नाही पण घर-नोकरी सांभाळताना येणारा प्रचंड थकवा सगळ्या पत्रांतून जाणवत होता. या स्त्रियांनी घराबाहेर तर उडी घेतलेली असते पण त्यांचे घर काही सुटलेले नसते.

"माझी सर्व ऊर्जा विभागली जाते. पूर्ण दिवस बाहेर काम करायचे आणि संध्याकाळी अस्ताव्यस्त झालेले घर, मळके कपडे, स्वयंपाक ...... आठवड्याची सुट्टी कंटाळवाण्या घरकामातच संपते."

"वैवाहिक सुख ही आमची समस्या झालीय; कारण दहा तास घराबाहेरचे काम आणि संध्याकाळनंतर चार तास घरातले काम, मी नेहमीच दमलेली असते."

"मी 'त्या'च्यासाठी सोयीची आहे. अत्यंत गरजेचा असलेला आर्थिक बोजा मी उचलते, घराची, त्याच्या मुलांची काळजी घेते, त्याच्या आकर्षक मालमत्तेचा एक तुकडा आहे मी म्हणजे."

"पूर्वी नाही पण आता मला वाटतेय, मला मुलं भेटतच नाहीत."

"आहा ! मला जर फक्त एक तास, दिवसभरात, घरात एकटीला बसायला मिळालं तर .... अगदी एकटे ... बाजूला मुलं नकोत, नवरा नको, माझा कुत्रा नको, मांजर नको ... कुणी कुणी नको ... फक्त एकटीला स्वस्थ बसायला ..."

ह्या पत्रांमधल्या प्रतिक्रिया या स्त्रियांच्या मानसिक अवस्थेवर प्रकाश टाकणाऱ्या आहेत.

१९५० ते ६० च्या दशकात रशियन स्त्रियांना 'कामाचे घोडे' म्हणून अमेरिकन स्त्रिया हसत होत्या. (अर्थात् यामागे रशिया विरोध अधिक होता) पण १९७० नंतर अमेरिकन स्त्रीचीही तीच स्थिती झाली. आठवड्यात ती ८० ते १०० तास काम करते. अमेरिकन पुरुषाचे उत्पन्न कुटुंब चालवायला अपुरे पडू लागले तेव्हा अमेरिकन स्त्री नोकरी करू लागली. पण फारच थोड्या अमेरिकन नवऱ्यांना घरकामाची कल्पना असते' असे 'वॉल स्ट्रीट जर्नल' ने 'द न्यू वर्किंग वुमन' वर एक लेखमाला प्रकाशित केली, त्यात वरील भाष्य केले.

१९८० त तीन प्रमुख जाहिरात कंपन्यांनी अमेरिकन कुटुंबांची पाहाणी केली, त्यानुसार अमेरिकन पुरुषाला आपल्या बायकोने घराबाहेर आणि घरात असे दुहेरी काम करायला हवे असते. ७०टक्के पुरुष 'स्वयंपाक' ही स्त्रीची जबाबदारी मानतात तर ७८टक्के पुरुषांना बाथरूम घासणे हे बायकोचे काम वाटते. एका संस्थेने एक हजार पुरुषांच्या मुलाखती घेतल्या तेव्हा असा निष्कर्ष हाती आला की स्त्रीच्या नोकरी करण्यामुळे पुरुषाच्या परंपरागत घरच्या भूमिकेत कोणताही बदल झालेला नाही.

सहजासहजी विश्वास बसू नये इतक्या स्त्रिया प्रभावहीन का ठरतात? एकदा या प्रश्नाचा खोल विचार करू लागलो की आपल्या लक्षात येते की, हा प्रश्न स्त्रियांच्या गरजांशी जितका निगडित आहे तितकाच तो पुरुषांच्या गरजांशीही निगडित आहे.

एक राष्ट्रीय पाहणी केली गेली त्यात नोकरी करणाऱ्या स्त्रियांना विचारले गेले की, "तुम्हाला व्यक्तिगतरित्या कोणते काम अधिक समाधान देते? घरातले की घराबाहेरचे?" "घरकाम" हे मोठ्या प्रमाणात मिळालेले उत्तर होते.

"मला हे उत्तर फारच गोंधळात टाकणारे वाटले." एका मोठ्या प्रकाशन संस्थेच्या वरिष्ठ संपादकाने म्हटले; आणि याबावत आपल्या स्वत:च्या वायकोचा, एका यशस्वी, भरपूर पगार कमावणाऱ्या, व्यावसायिक स्त्रीचा दृष्टिकोनही असाच गोंधळवणारा आहे, तो समजून घेण्याचा मी प्रयत्न करतोय असे तो म्हणाला. झाले काय? आदल्याच रात्री, वायकोची आई त्यांच्याकडे जेवणासाठी आली होती. तिघांनी मिळून स्वयंपाक केला. जेवणानंतर जेव्हा ॲप्रन चढवून तो भांडी विसळायला उभा राहिला तेव्हा "नको नको, आम्ही करू." त्या म्हणू लागल्या." हे विचित्रच आहे. मी स्वयंपाकात मदत केलेली त्यांना चालली पण माझ्या या सहभागापेक्षा जास्तीची मदत त्यांना नको होती. त्या नर्व्हस झाल्या. त्यांनी भांडी विसळणं हे त्यांच्या कामाच्या वाट्यापेक्षा अधिक नव्हतं का?"

या गृहस्थांची बायको, वर म्हटल्याप्रमाणे एक यशस्वी व्यावसायिक स्त्री, स्त्रियांना मिळणाऱ्या विषम वागणुकीबद्दल मैत्रिणींमध्ये चर्चा करणारी ! तिला स्वत:ला वाटत असे की आपल्या कौटुंबिक व व्यावसायिक जीवनात बदल झाला पाहिजे; परंतु आपल्या घरकामांचा त्याग करणे तिला रुचत नाही. "जणू काही बशा आणि ताटल्या धुवून मी त्यांच्यापासून त्यांचे काहीतरी हिसकावून घेत होतो." तो गृहस्थ म्हणाला. आणि मग मिस्किलपणे म्हणाला, "तिची आई तिथे उपस्थित होती." आईच्या उपस्थितीत अनेक स्त्रियांना आपले स्वातंत्र्य अनुभवताना जड जाते.

स्त्री किती पैसा मिळवते याचा तिच्या घरकाम करण्याशी काही संबंध नसतो. **ज्युडिथ क्रांट्झ** ही 'स्क्रपल्स' आणि 'प्रिन्सेस डेझी' या सर्वाधिक खपाच्या कादंबऱ्यांची लेखिका. तिच्या 'प्रिन्सेस डेझी' या कादंबरीचा लिलाव झाला आणि ३.२ लाख डॉलर्स इतकी शेवटी बोली होती, म्हणजे इतर कुठल्याही कादंबरीपेक्षा १ लाख डॉलर्स जास्तीचे होते. ही बातमी जाहीर झाल्यावर 'द न्यूयॉर्क टाईम्स' चे वार्ताहर तिची मुलाखत घ्यायला गेले, "लिलाव चालू होता तेव्हा तू काय करत होतीस?" या प्रश्नावर ती उत्तरली, "आदल्या दिवशीच मी आणि माझा नवरा, आम्ही दोघे युरोपहून परतले होतो. मी कपड्यांना इस्त्री करत होते." तिच्या वाक्याची पहिल्या पानावर बातमी झाली, तेव्हा तिने खुलासा केला की, "छे छे ! लिलावाच्या काळात मनावर आलेला ताण सैल करण्यासाठी हा शारीरिक उपचार होता."

म्हणजे स्त्रिया 'घरकाम' का करतात याची ही एका परीने दोन भिन्न उत्तरे आहेत.

१९६० च्या दशकात, घरकाम करणारी स्त्री टॉयलेट धुवायचे काम अनिवार्य म्हणून

करायची पण वीस वर्षांनंतर पुरुषांच्या बरोबरीने बाहेर काम करण्याची, पैसा मिळवण्याची अपेक्षा करणारी स्त्री हेच काम, एक लहानसे घरगुती कर्मकांड म्हणून करतच राहाते तेव्हा आपण अजून 'स्त्रीपण' सोडलेले नाही असे ती कुठेतरी स्वत:ला बजावत असते.

एखादी सिंथिया सांगते की, नवऱ्याने कधी मुलांचे लंगोट बदलले नाहीत की आजारी मुलाला मांडीवर घेतले नाही. पण मी 'मुलांना वाढवण्यात तुझा कधीच सहभाग नव्हता' म्हणून त्याला बोल लावला नाही कारण तक्रारी, भांडणं मला टाळायची होती.

आणखी एक नमुना वेगळाच दिसतो. काहीजणींना घरकामात मदत मिळवणे आर्थिक दृष्ट्या परवडण्यासारखे असते पण त्या नाकारतात. कारण? मग उरलेल्या वेळाचे काय करायचे? नेहमीच्या गरजा भागल्या गेलेल्या असतात. स्त्रियांच्या इतर आकांक्षा पूर्ण होण्याइतकी आर्थिक सुबत्ता असते आणि आता जी स्वतंत्रता मिळणार असते, तिच्यात प्रवेश करण्याइतकं दुसरं काहीच भयानक नाही असं स्त्रियांना वाटत असतं, एखाद्या 'टाईम बॉम्ब' प्रमाणे ही मोकळिक त्यांना भयप्रद वाटते आणि त्या घरकामात स्वत:ला गुंतवून घेतात.

'स्त्रिया स्वत:ला घरकामात का गुंतवतात?' हा एक कोड्यात टाकणारा प्रश्न आहे. त्याचे एकच एक उत्तर नाही हे खरे. परंतु जितक्या खोलात या प्रश्नाचा विचार करायला जावे तितके स्त्रीच्या मानसिकतेचे पदर उकलत जातात.

एव्हलिन आणि रिचर्डस् या हुषार जोडप्याची ही गोष्ट आहे. या दोघांचा पुनर्विवाह झाला आहे. दोघेही इतरांपेक्षा अधिक पैसा कमावणारे आहेत. रिचर्डस् एका जाहिरात कंपनीत कलादिग्दर्शक आहे तर एव्हलिन मॉडेलिंग करते. ती नित्याचे घरकाम तर करतेच आणि आठवड्यातून ३-४ वेळा मॅनहॅटनला मॉडेलिंगसाठी जाते तेव्हा घर स्वच्छ करणे, लॉंड्री, बाजारहाट हे सगळे उरकून जाते. घरातील माणसांच्या वेळांच्या सोयीनुसार ती आपल्या मॉडेलिंगच्या वेळा ठरवते. मुलांना शाळेनंतरच्या छंदवर्गांना पोहोचवणे, सुटीतल्या वर्गांना नेणे-आणणे हे तिचचे काम.

दोघांच्या मते त्यांना मदतनीस ठेवणे परवडणारे नाही. रिचर्ड्स काय करतो?

तो तर खूपच व्यस्त असतो. त्याचे वेट लिफ्टिंगचे आणि स्कूबा डायव्हिंगचे वर्ग असतात. फोटोग्राफी असते. डार्करूममध्ये त्याला प्रिंट आऊट्स घ्यायचे असतात. त्याला संधी मिळाली की त्याची कारकीर्द बदलायची आहे. वयाच्या सेहेचाळीसाव्या वर्षी त्याच्या लक्षात आलेय की त्याचे खरे प्रेम फोटोग्राफीवर आहे. आणि आठवड्याचे चाळीस तास आपल्या आवडत्या गोष्टींऐवजी दुसरे काम करावे लागते तेव्हा त्याच्या मनात संघर्ष निर्माण होतो. घरकामाच्या क्षुद्र गोष्टींमध्ये आता आपल्या आयुष्यातील मोलाचा असलेला एखादा



अनुक्रमणिका

सेंकदही वाया घालवण्याची त्याची तयारी नाही. आपल्या ऊर्जेचा कणन्कण त्याला त्याच्या 'खऱ्या कामा'साठी, फोटोग्राफीसाठी उपयोगात आणायचा आहे.

दोन वर्षांपूर्वी रिचर्डसशी विवाह करून त्याच्या आयुष्यात आलेली एव्हलिन कधी कधी संतापते. रिचर्डस सगळं काम तिच्यावरच सोपवतो. यातनं मार्ग कसा काढावा तिला समजत नाही. या दोन वर्षातली प्रगती म्हणजे ती त्याला सलाड करायला शिकवू शकली आहे. म्हणून ती आजूबाजूला नसली तर तो फक्त लेट्यूसची दोन पाने स्वत:साठी चिरून घेतो. बाकी तो कुठलीही गोष्ट करत नाही; आणि त्याला दिसतही नाही की ती सतत घरकाम करत असते, निरोप देते-घेते, कामांचे नियोजन करते, बाजारहाट करते. घर स्वच्छ करते, त्याची मित्रमंडळी, कुटुंबीय यांचे आतिथ्य करते, त्याच्या पहिल्या लग्नाचा मुलगा घरी येईल तेव्हा त्याची काळजी घेते, स्वत:च्या (आधीच्या लग्नाच्या) मुलांना सांभाळावे... हे त्याच्या लक्षातच येत नाही.

जेव्हा ती या सगळ्या गोष्टींबद्दल कुरकुरते तेव्हा तो म्हणतो, "तुला हे सगळं करायची गरज नाही."

"असं कसं? कुणीतरी करायला तर हवंच ना !"

तो फक्त खांदे उडवतो. कशाला कुणी करायला हवं? त्याला आश्चर्यच वाटतं. ज्यांच्या घरगुती गरजा परस्पर पुऱ्या होत असतात त्यांना असंच आश्चर्य वाटत असतं. त्याला वाटतं. हा तिचा प्रश्न आहे, तो तिनेच सोडवला पाहिजे. (स्वाभाविकपणे, त्याला वाटतं, तिनं याबाबत तिची स्वत:ची एक भूमिका निश्चित केली पाहिजे; त्याला सारखं डिवचल्यावर त्यालाही राग येतो पण आपल्या या रागाच्या भावना तिच्यापुढे कशा स्पष्ट कराव्यात त्याला कळत नाही. मग तो या गोष्टींकडे दुर्लक्ष करतो.)

दोघांच्याही दृष्टीने आता वातावरण काही सुखद राहिलेले नाही. रिचर्डसला खरोखरच कळत नाहीय की त्याची बायको इतकी चिडकी आणि अस्थिर वृत्तीची का झालीय. एव्हलिनला वाटतंय. आपण का चिडतोय त्याची कारण अगदी स्पष्ट आहेत. पण कुठेतरी ती सुद्धा कमी पडतेय. घरकामाचा प्रश्न रिचर्डसकडून एकदाचा तडीस न्यायला, तिच्या नकळत तीच स्वत:ला अडवतेय. हे विचित्रच आहे. एरवी ती आपल्या आवडी-नावडी, आपला भय-राग....जवळ जवळ जे घडत त्याविषयी सगळं काही ती बरोबर दुसऱ्याला सांगू शकते. खरोखर. आपली काळजी घ्यायला ती पूर्ण समर्थ आहे पण आपल्याला आतून दुबळी करणारी ही कोंडी नीट समजून घेणे अन् त्यातून बाहेर पडणे काही तिला जमत नाहीय. का?

तिच्या दृष्टीने त्यात असं काहीतरी आहे की ते तिला घराशी बांधून ठेवतंय. रिचर्डस जसा फोटोग्राफीत बुडला आहे, तसं भान हरपून जाऊन करण्याजोगं तिच्या आयुष्यात काही नाहीय, घराबाहेर अशी कुठलीही दुसरी एखाद्या कामातली गुंतवणूक नाहीय. ती तिच्या नवऱ्याइतकाच पैसा मिळवते, परंतु तिला वाटते की रिचर्डसला एक सर्जनशील असे स्वतंत्र

जग आहे, आणि त्यामुळे आपण त्याच्यापासून दूर, एकट्या पडलो आहोत. तिला वाटतं, रिचर्डसची डार्क रूम म्हणजे त्याचे एक संकेतस्थान आहे. ती डार्क रूम तिला सवतीसारखी वाटते. तिला तिच्याबद्दल मत्सर वाटतो.

जेव्हा आपल्याला असुरक्षित वाटत असतं, आणि आपला आपल्यावर विश्वास नसतो तेव्हा मत्सर डोके वर काढत असतो. नवऱ्यावर तिचे प्रेम आहे आणि तो आपल्या कलेमध्ये असा हरवून गेलेला ती पाहाते तिला ती स्वतःच्या आयुष्यातलीच एक समस्या वाटते. आपल्या आयुष्याचं आता काय करायचं ते तिला कळत नाही. तिच्या बुद्धिमत्तेतील एक छोटासा भाग फक्त घरावाहेर ती उपयोगात आणत असते; उरलेली सगळी बुद्धिमत्ता घराशी निगडीत कामात वापरायला तिने स्वतःला शिकवलंय. एक काळ असा होता की सुगृहिणी असव्यात तिला आयुष्याचं सार्थक तरी वाटत होतं. मग आताच तिची लहर का बदलली? याचं एक कारण असं आहे की आता काळ बदललाय, स्त्रिच्या जगण्याची मूल्ये बदललीत.

दहा वर्षांपूर्वी, कुणीही हेवा करावा असं तिचं आयुष्य होतं. तिच्या कारकीर्दीभोवती प्रसिद्धीचं वलय होतं. तिला आर्थिक स्वातंत्र्य होतं. तिनं घरकाम आणि बाहेरचं काम यांचा छान मेळ घातला होता. सेलमधून गोळा केलेल्या वस्तूंनी तिनी घर सजवलं होतं. आपल्या मुलांचे वाढदिवस ती जोरदार साजरे करायची. अधूनमधून, सणासुदीच्या निमित्ताने २०-२५ माणसांना रात्री जेवायला बोलवायची.

पण आता सारेच बदललेय. आता काहीतरी आव्हानात्मक, तृप्त करणारं काम करण्याचं स्त्रीचं ध्येय आहे; एव्हलिनचंही. परिणामतः पूर्वीची बायको-आई-नोकरदार स्त्री अशी अनेकांगी भूमिका तिला समाधान देत नाही. पण तरी ती त्यांना लोंबकळून राहिली आहे कारण यापेक्षा नवे काहीतरी सुरू करण्याचे तिला भय वाटते. गोष्टी लिहायला शिकवण्याच्या वर्गाला जायचे इथपासून तर मेडिकल स्कूलला जायचे इथपर्यंत अनेक गोष्टींचा तिने मनातल्या मनात विचार केलाय पण प्रत्यक्षात जायची वेळ आली की ती कृती करत नाही. वास्तविक वयाच्या अठराव्या वर्षी तिने मॉडेलिंगच्या विश्वात पाऊल ठेवले तेव्हापासून त्यात अग्रभागी राहण्यासाठी आवश्यक त्या सगळ्या गोष्टी ती करत असे. आताच तिने हातातले दोर असे का सोडून द्यावेत? तिशी ओलांडलेल्या सगळ्याच स्त्रियांना असा पैसा मिळवता येत नाही; तो ती मिळवत होती.

तरी परंतु आतनं एक क्षीण आवाज नापसंती व्यक्त करत होता. तिला एक नवा रस्ता हवा होता. तिला आता फार काळ ह्या संघर्षाकर्ड दुर्लक्ष करून चालणार नव्हते. संताप, आकसखोरपणा, जखमी झाल्याची जाणीव, आपला कुणी गैरफायदा घेतोय ही जाणीव.... या वरवर दिसणाऱ्यां भावनांच्या आत हा संघर्ष अत्यंत त्रासदायक पद्धतीने उकळत होता, निकडीने उकळत होता. आणि या आंतरिक संघर्षाला बाह्यरूप देताना आपण जे करू शकत नाही असे तिला वाटत होते त्याला ती रिचर्डसला जबाबदार धरत होती. यासाठी वास्तविक तिनं काय करायला हवं होतं? खऱ्या अर्थानं घरावाहेर पडायला हवं होतं, काहीतरी

करायला हवं होतं, गावाकडचं घर विकायला हवं होतं, घरकामासाठी कुणाला तरी नेमायला हवं होतं किंवा आवश्यक असतील ते इतर बदल करायला हवे होते, त्यामुळे ती पुन्हा शिक्षण घेऊ शकली असती किंवा नवा व्यवसाय शोधू शकली असती आणि मनाने मुक्त होऊ शकली असती. नव्या उत्साहाने स्वत:चे मन टवटवीत करू शकली असती.

स्त्रियांना बाहेरची कारकीर्द असो की नसो त्या आपली गृहिणीची भूमिका सोडायला तयार नसतात; कारण अजूनही त्यांना वाटते की आपण नवऱ्यावर अवलंबून आहोत; नोकरी आहे ती सर्व व्यवस्थेत तोल राखण्यासाठी म्हणून पुरुषांपेक्षा त्या घरकामात अधिक गुंततात. ऑफिसमध्ये कितीही तास काम केले तरी घरातील सर्व गोष्टी साग्रसंगीत करतात.

आपल्यावर कुणीतरी प्रेम करते आहे. आपण कुणाला तरी हवे आहोत ही विवाहातून मिळणारी जाणीव; ज्या स्त्रीला आयुष्यात काहीतरी करायचे आहे तिच्यासाठी खरे तर वरदानाप्रमाणे आहे. परंतु स्त्री आतून सतत भयग्रस्त आहे. तिच्या अंतर्मनातच हे भय असल्यामुळे 'त्या'च्या कडून कुठल्याही तऱ्हेचा नकारात्मक ताण आला की ती भांवावून जाते. केवळ घरखर्चाला हातभार म्हणून नोकरीकडे न पाहाता जर ती आपल्या व्यक्तीगत विकासाचे साधन म्हणून त्याकडे पाहू लागली तर हा घरापासून अलिप्त होण्याचा, स्वत:ला ओळखण्याचा एक मार्ग असतो असे तिच्या लक्षात येईल.

स्त्रिया घर – नोकरीच्या दुप्पट ओझ्याखाली थकून जातात; कारण घरी राहणाऱ्या स्त्रीसारखी त्यांना घरकामातली सुरक्षिततताही हवी असते आणि बाहेरचे समाधान देणारे स्वतंत्र जग अनुभवण्याचीही इच्छा असते. या संघर्षातून लिंग घबराटीचा (Gender panic) जन्म होतो. मग स्त्रिया मिळतील त्या कमी दर्जाच्या नोकऱ्या स्वीकारतात आणि अधिकाधिक ओझ्याखाली दबतात.

आपल्यातल्या अनेकांनी आपल्या स्वत:च्या आयुष्याविषयी खराखरा निर्णय अजून घेतलेलाच नाही. आपल्याला कुणाचा तरी आधारही हवा आहे आणि स्वातंत्र्यही हवे आहे. या दोहोंत आपली शक्ती खर्च होतेय. पुरुष बदलायला तयार नाहीत असा आपण जाणीवपूर्वक आरोप करतो पण अबोध मनाच्या पातळीवर त्यांनी आहेत तसेच राहायला आपली हरकत नाहीय.

**मला मुक्त व्हायचंय !**

कॉलेट डाऊलिंग जेव्हा आपल्याच आयुष्यात डोकावून पाहाते तेव्हा तो सगळा काळ... कालचा असल्याप्रमाणे ती त्याच तीव्रतेने अनुभवते आणि वाचकांसाठी मांडते –

माझं लग्न संपलं होतं; आणि मी पुन्हा एकदा एकटी राहात होते. परस्परविरोधी भावनांच्या कल्लोळांनी अस्वस्थ होत होते. प्रचंड थकवा जाणवायचा. कधी अनावर रडू फुटायचे. झोप लागायची नाही. तरी नैराश्याच्या ह्या चिन्हांना उसळते चैतन्य आणि आनंदाच्या आवरणाखाली मी झाकून टाकायचे.

केव्हातरी 'त्यां'ना माझी ओळख पटेल असे वाटण्याचे क्षण मोठे सुखद असत. 'त्यां'ना



अनुक्रमणिका

मी सापडेन. 'त्यां'ना माझ्या अंतर्मनाची ओळख पटेल, माझी झाकलेली बुद्धिमत्ता 'त्यां'च्या लक्षात येईल आणि मग ते या मोठ्या चैतन्यहीन घरातून माझी सुटका करतील; अन् या सीमेपलिकडे अनोळखी भासणारे समाधानाचे जग माझी वाट पाहात असेल.

कधी कधी रात्री उशीरापर्यंत मी पीत राहायचे. फक्त एक रेशमी कडांची, पीस लावलेली मोठी हॅट घालायचे आणि आरशासमोर एकटीच नाचत राहायचे. हॅट कशासाठी? तर माझ्या शाळकरी, लाजाळू, अननुभवी, असुरक्षित अशा 'स्व'ला नाकारण्यासाठी.

त्या काळात माझा साधा व्हॅक्यूम क्लीनर मोडला तर मी तो दुरुस्तीला नेण्याऐवजी, सरळ केरसुणी वापरायला सुरुवात केली; वर मनातल्या मनात समर्थन केले, 'पूर्वीच्या बायका केरसुणीच वापरत. चांगली तर आहे. खरं तर छोट्या गोष्टींसाठी घराबाहेर न पडण्याइतकी मी घावरट झाले होते. माझी ओळख तयार व्हायला हवी असेल तर मी काहीतरी केले पाहिजे हेही माझ्या मनात येत नव्हते. मी स्वत: काय करू शकेन याचा मला अंदाजच येत नव्हता; फक्त तऱ्हेतऱ्हेच्या कल्पना सुचत. वयाच्या सत्ताविसाव्या वर्षी, तीन मुलांची आई झालेली मी सिंड्रेलाप्रमाणे उत्कंठेने वाट पाहात होते की, एखादी परी येईल नाहीतर एक राजपुत्र येईल आणि मला या अवस्थेतून बाहेर काढील.

एकदा अचानकच मला जणू साक्षात्कार झाला; की मी अशी व्यक्ती आहे की जिला सगळ्या गोष्टी फक्त हव्या आहेत. मला हवे, हवे, हवे...... हे हवे, ते हवे असेच माझे आतले रडणे आहे आणि जणू अजूनही मला काही मिळत नाहीए. जणू काही मी एखाद्या काचेच्या कपाटाच्या आत बंदिस्त आहे, तिथून मला बाहेरच्या गोष्टी दिसताहेत पण मला त्या मिळू शकत नाहीत.

मला हव्या होत्या त्या भौतिक वस्तू नव्हत्या, तर त्या भावनिक होत्या. त्यांना संख्यात्मक परिमाण काही नव्हते. किंबहुना ते क्षणात नाहीसे होणारे भास होते. मला काहीतरी करण्याचं आणि स्वत:चं अस्तित्व टिकवण्याचं स्वातंत्र्य हवं होतं, त्याची प्रतीकं म्हणून मला तीव्रतेनं वाटायचं की खूप खूप उजेड हवा, खूप मोकळी हवा हवी. मला वाटायचं समुद्रकिनारी महिनोमहिने राहावं, गावाकडे एखादं घर असावं इत्यादी.

मला स्वतंत्रही व्हायचं होतं आणि सुरक्षितताही हवी होती. या काळात मी उगाचच निरर्थक बडबड केली. मी नाचले, मी रडले. माझ्या पायाखालची वाळू हळूहळू सरकू लागली अन् हे बरेच झाले. नाहीतर आणखी काही वर्षांनी माझी मित्रमंडळी दूर गेली असती. लोक म्हणू लागले असते. "ही किती बदलली !" होय. मी एक वेगळीच व्यक्ती झाले असते.

प्राप्त परिस्थितीतून जात असताना, केव्हातरी एकदा परावलंबित्व की स्वातंत्र्य यातल्या संघर्षाची जाणीव होणेही आवश्यकच असते. पण ती जाणीव झाली म्हणून लगेच भीतीच्या बंदिस्त जागेतून एकदम स्वातंत्र्याच्या मोकळ्या मैदानात झेप घेता येईल की काय?

अंहं ! केवळ जाणीव होणे पुरेसे नाही. त्यासाठी गतिशील प्रयत्नांची आवश्यकता आहे. उपचारक याला Working through म्हणतात. म्हणजे या संघर्षातून बाहेर पडण्यासाठी

तुम्हाला मानसोपचार तज्ज्ञाकडे जाऊन नियमित उपचार घेण्याची गरज नसते. परंतु तुम्हाला त्यासाठी शिस्तबद्धपणे सतत प्रयत्न करावे लागतात. आपल्या अंतर्मनात एक झगडा चालू आहे याची केवळ अंधुक, सर्वसामान्य कल्पना असणं तुम्हाला या संघर्षातून मुक्त करू शकणार नाही. पण तुमचे प्रयत्न तुम्हाला नक्कीच मुक्त करतील. मात्र त्यासाठी जाणीवपूर्वक, सहेतुक प्रयत्न असले पाहिजेत, आपल्या अंतर्मनातील, एकात एक गुंतलेले संघर्षाचे धागे मोकळे करायला पाहिजेत.

स्वतंत्र होण्याची इच्छा आणि सुरक्षित जगणे यातील संघर्ष हा न उमगणारा आहे. कारण त्याचाही एक फायदा असा असतो की तो आपल्याला आपण आहोत तिथेच ठेवतो. त्याची स्थिती अशी असते की, आपल्याला स्वातंत्र्य हवे आहे हे मान्य करताना, आपल्याला प्राथमिक सुरक्षितता देणारे पारतंत्र्यही हवे असते पण हे आपण मान्य करत नाही. या दोन परस्परविरोधी इच्छांच्या ओढाताणीत आपण स्वर्गनरकाच्या सीमेवर राहातो. त्याचेही काही फायदे असतात. तिथे खूप उष्णता नसते आणि जीवघेणी थंडीही नसते. तिथे खूप थरारक काही नसते पण अगदी निर्जीवही काही नसे.

एवढे मात्र निश्चित की जर तुम्हाला पारतंत्र्य म्हणजे काय हे ओळखता येत नसेल तर तुम्ही स्वयंप्रयत्नाने परावलंबत्वातून मुक्त होऊ शकत नाही. संघर्षातून बाहेर पडण्याची पहिली पायरी म्हणजे, आपली परावलंबित्वाची प्रवृत्ती ओळखणे. तुम्ही जाणीवपूर्वक त्या स्वत:मधील प्रवृत्तीचा शोध घेतला पाहिजे.

मला ही परावलंबनाची जाणीव होण्यापूर्वी मी सतत तक्रार करत होते की, 'ते'... ते संपादक, ते प्रकाशक आम्हा लेखकांबरोबर योग्य तऱ्हेने वागत नाहीत, ते आम्हाला न्याय देत नाहीत. इतर सर्व सहकारी लेखकांच्या जोडीने आपण त्या संपादन-प्रकाशन व्यवस्थेचे बळी आहोत असे मी मानत होते. मी 'स्वत:चे' असे काही आदर्श ठरवून बसले होते आणि त्यांच्याशी तडजोड करण्याची माझी अजिबात तयारी नव्हती, मी प्रस्थापित व्यवस्थेलाच दोष देत होते आणि माझ्याच पद्धतीने, पूर्वीप्रमाणे माझे जगणे-वागणे चालू ठेवले होते. म्हणजे मी नव्या अनुभवांना, प्रयोगांना, नव्या संधीला घाबरतेय हे माझ्या लक्षातच येत नव्हते. मी फक्त तक्रारी करत राहिले आणि त्यापाठीमागे माझी खरी समस्या दडलेलीच राहिली.

माझ्या आंतरिक संघर्षाने खुरटवून टाकलेला कार्यालयीन काम हा काही माझ्या आयुष्याचा एकमेव भाग नव्हता. या काळात माझे प्रेमजीवनही भरकटले होते. मला प्रेमाची गरज होती आणि तरी ती गरज नाकारण्याची एक सबल इच्छा होती, आणि त्या दोहोंकडून मी जणू थपडा खात होते. रात्री 'आरशासमोर स्वत:च्या प्रतिबिंबावर प्रेम करणारी मी दिवसाच्या भक्क प्रकाशात स्वत:ला बजावत हो, "तू म्हातारी होत चालली आहेस. आता काही तू सुंदर दिसत नाहीएस."

त्यावेळी मी एका विवाहित पुरुषाच्या सहवासात आले. ते एका अर्थाने मर्यादित नाते होते. मला त्याचे आकर्षण वाटत होते पण मी त्याला धरून ठेवू शकत नव्हते. तो उथळ



अनुक्रमणिका

आहे, तो झोकून देऊन माझ्यावर प्रेम करू शकत नाही म्हणून मी त्याला दोष देत होते. खरे तर धैर्य माझ्याजवळ नव्हते. मी वर्षभर त्याच्यापासून एका अंतरावर राहात होते आणि स्वत: दु:खी होत होते.

एकूण कार्यालयीन जीवन आणि व्यक्तिगत जीवन या दोन्ही बाबतीत माझी कोंडी झाली होती.

बायका जेव्हा अशा दुभंगलेल्या मन:स्थितीत असतात तेव्हा त्यांच्या आयुष्यातील सगळी शक्ती या संघर्षातील एक बाजू दाबून टाकण्यात किंवा नाकारण्यात खर्च होते. **कॅरेन होर्ने** म्हणतात की, जो भाग आपण दाबून टाकण्याचा प्रयत्न करतो तो आपल्या आयुष्यात ढवळाढवळ करण्याइतपत, पुरेसा कार्यरत असतो. परंतु तो सकारात्मक असे काही करू देत नाही. त्यामुळे एरवी स्वत:ला घडविण्यासाठी, दुसऱ्याचे सहकार्य मिळवण्यासाठी किंवा माणसा-माणसात चांगले नातेसंबंध निर्माण करण्यासाठी जी शक्ती उपयोगी पडली असती ती नको तिथे खर्च होते. ह्या शक्तीपातामुळे कुठलाच नेमका निर्णय घेता येत नाही, एकतऱ्हेची निष्क्रियता येते. अशा स्त्रीच्या मनोवृत्ती हेलकावत राहतात. मी ही नोकरी स्वीकारू की ती स्वीकारू? मी घरी राहू की पुढचे शिक्षण चालू करू? अशा दोलायमान अवस्थेमुळे, घराच्या खिडक्या उघड्या असाव्यात आणि शेगडी पेटवून घरात ऊब निर्माण करण्याचा प्रयत्न करावा म्हणजे जसे घडेल तशी शक्ती वाया जाते.

एखादी लहान गोष्ट असो की मोठी, पण प्रत्येक गोष्ट या वृत्तीमुळे झाकोळूनच जाते. मग ध्येयशून्यता येते. वैफल्य ग्रासू लागते. चिडचीड होते. हे एकतऱ्हेचे मानसिक अपंगत्व असते; ते आपल्याला निष्प्रभ करते एखादा साधा अहवाल लिहायला. कपड्यांचे कपाट लावायला किंवा स्वयंपाकासाठी काय करायचे हे ठरवायला सुद्धा मग आपल्याला तासनतास लागतात. अशा दुभंगलेल्या स्त्रीला एखादे सहज सोपे काम करण्यासाठीही प्रयत्नांची शिकस्त करावी लागते. आपली अंतर्मनाची अवस्था आपण बाहेर लोकांशी कसे वागतो यातही प्रतिबिंबित होते. उदा. एखाद्या स्त्रीला अधिकार गाजवायचा असतो परंतु दुसऱ्याला दुखवायचेही नसते, अशावेळी तिचे वागणे द्विधा वृत्तीचे दिसते. एखादीला एखादी गोष्ट गरजेची म्हणून हवी असते पण ती हक्क म्हणून आपल्याला मिळावी असे तिला वाटते, मग तिच्या बोलण्यात अकारण करडेपणा आलेला दिसतो. जर एखादीला लैंगिक सुख तर हवे आहे परंतु आपल्या जोडीदाराला अतृप्त ठेवण्याची तिची आंतरिक इच्छा आहे; असे असेल तर आपली प्रवळ इच्छा पूर्ण करण्यात तिला अडचणी जाणवतात. अशा स्त्रिया मग नाना तऱ्हेच्या तक्रारी करत राहतात; उदा. पुरेशी झोपच मिळत नाही; प्रतिकारशक्तीच उरली नाहीए इ. इ. परंतु खरे कारण असते, त्यांच्या अंतर्मनात चाललेला संघर्ष हा संघर्ष त्यांना स्वस्थता देत नाही.

अशा जखमांवर फक्त मलमपट्टी करण्यापेक्षा अधिक काही करण्याची गरज असते. याचा अर्थ तुम्ही मुळापर्यंत गेले पाहिजे. तुमचे दृष्टिकोन. तुमचे हेतू, तुमच्या विचार करण्याच्या पद्धती या सगळ्या तुम्ही तपासायला हव्यात. तुमच्या उर्वरित व्यक्तीमत्त्वात थोडासा वेगळा वाटणारा एखादा जरी धागा आढळला तरी तुम्ही त्याचा पाठपुरावा केला पाहिजे. हा माझ्यामधला थोडासाच अंतर्विरोधाचा भाग आहे. हा म्हणजे मी नव्हे.'' असे म्हणू नका. तो म्हणजेच तुम्ही आहात. तुम्ही त्या धाग्याचा पाठपुरावा केलात आणि त्याचा अभ्यास केलात तर तो तुम्हाला, तुमच्यात खोलवर दडलेल्या संघर्षाच्या मुख्य कंदाकडे घेऊन जाईल.

उदाहरणार्थ तुमच्या लक्षात येईल की, दोन टोकांमध्ये तुम्ही सतत हिंदकळत आहात. पाहा तुम्ही स्वत:ला करडी शिस्त लावू बघत आहात आणि तुम्हीच स्वत:ला मोकळेही सोडताहात. तुम्ही ओळखू शकाल की तुम्ही दुसऱ्याला तुच्छ लेखताहात पण मनोमनी त्याचा मोठेपणा मान्य करताहात किंवा तुम्ही स्वत:ला मागे मागे ठेवू पाहाता. परंतु यशस्वीपणे स्पर्धा करण्याची तुमची वृत्ती तुम्हाला स्वस्थ वसू देत नाही अन् दुसऱ्यावर विजय मिळवण्याची तुमची गरज 'जिंकणं' हीच आवश्यक गरज म्हणून होऊन बसते. ह्याचेही निरीक्षण करा की, सगळे हक्क काहीशा धसमुसळेपणाने मिळवताना आपल्याला जगातील एकही हक्क मिळत नाही असे तुम्हाला कधी कधी वाटते ना?

लक्षात ठेवायचे ते असे की, हे आपल्या व्यक्तिमत्त्वाने हाणलेले टोले म्हणजे उगाचचे छोटेसे मतिभ्रंश नव्हेत, ते कदाचित तुमच्या व्यक्तिमत्त्वाचे मोठे दुभंगलेपण असेल. त्यांचे थंडपणे आणि वस्तुनिष्ठपणे निरीक्षण करा. आपण परिपूर्ण नाही, आपल्यात काहीतरी कमी आहे म्हणून स्वत:ची खरडपट्टी काढू नका आणि तेच तुम्हाला तुमच्या व्यक्तिमत्त्वातील अज्ञात पैलूंकडे घेऊन जातील. तुमच्यातील त्या अज्ञात भागाला सामोरे जा, त्याचा स्वीकार करा तुम्हाला शोध लागेल की, हा नवा, तुमच्याच व्यक्तिमत्त्वाचा अविभाज्य भाग हा दमदार असा तुमचाच 'स्व' आहे.

पुष्कळदा आपल्या भावना इतक्या दडपल्या जातात की, आपली आगतिकता, आपले वैफल्य फक्त स्वप्नांमधूनच व्यक्त होते.

**डॉ. अलेक्झांड्रा सायमंड** यांनी त्यांच्याकडे उपचारासाठी आलेल्या काही स्त्रीरूग्णांची सूचक स्वप्ने नोंदली आहेत.

एका पन्नाशीतल्या स्त्रीचा अठरा वर्षांचा संसार मोडला; विभक्तीच्या काळात वर्षभर ती निराश मन:स्थितीतून बाहेर पडण्याचा प्रयत्न करत होती अन् एका रात्री तिला एक स्वप्न पडले.

एका भल्यामोठ्या काचेच्या हौदात मी एखाद्या मृत व्यक्तीप्रमाणे तरंगतेय. मी बोलण्याचा प्रयत्न करतेय पण मला बोलता येत नाहीए. माझा नवरा हौदाच्या बाजूला उभा आहे आणि तो 'मेलेल्या' माझ्याशी बोलण्याचा प्रयत्न करतोय. 'जिवंत' असलेली मी हौदाबाहेर.

त्याच्यासमोर उभी आहे आणि ओरडून त्याला सांगतोय, "तिच्याशी बोलू नकोस. अरे, तुला दिसत नाही का, ती 'खरी मी' नाहीए. अरे, इकडे बघ. 'खरी मी' इथे आहे.'

हे स्वप्न पडलं आणि ती म्हणते की, नैराश्यातून बाहेर पडण्याचे सामर्थ्य त्याचवेळी माझ्यात आले. हे कशामुळे घडले असावे?

त्या स्वप्नाने एक कटू सत्य व्यक्त केले होते. तिचा नवरा कधीच तिच्या अपेक्षेप्रमाणे वागत नव्हता. दुसरी महत्त्वाची गोष्ट म्हणजे 'खरी मी' दडपून टाकण्याचा तिचा कायम प्रयत्न असे. हे त्या स्वप्नातून व्यक्त झालेले कारूण्य तिला जाणवले आणि मध्यरात्री उठून ती गदगदून रडू लागली. केवळ नवऱ्यापासूनच नव्हे तर ज्यांच्याशी जवळचे नाते निर्माण व्हावे असे तिला तीव्रतेने वाटायचे त्यांच्यापासूनही आपण 'खऱ्या मी' ला लपवत आलोय याची तिला जाणीव झाली.

**डॉ. सायमंड** यांच्याकडे उपचारार्थ आलेल्या दुसऱ्या एका **रुग्ण** स्त्रीला उपचार सुरू केल्यानंतर अल्पावधीतच एक स्वप्न पडले. ती स्त्री आपल्या अपार्टमेंटच्या बाहेर, रस्त्यावर, उंच अशी लटकली आहे. आपल्या अपार्टमेंटच्या खिडकीला बाहेरच्या बाजूने तिने बोटाच्या टोकांनी गच्च धरून ठेवले आहे; आणि मदतीसाठी ती हाका मारण्याचा प्रयत्न करते आहे, पण तिच्या तोंडून दबलेल्या, अस्फुट आवाजाखेरीज आवाज येत नाही आत तिचा नवरा खोलीत फेऱ्या मारतोय. पण त्याला तिच्या हाका मुळीच ऐकू येत नाहीएत.

ज्या स्त्रियांनी आपापल्या व्यवसायात आपली गुणवत्ता पूर्णपणे सिद्ध केलेली असते परंतु ज्यांना अंतर्मनातून सारखे असे वाटत असते की आपली काळजी दुसऱ्या कुणीतरी घ्यावी; व या आंतरिक गरजेमुळे त्या खोलवर कुठेतरी भयग्रस्त असतात; अशा संपूर्ण स्त्रीवर्गाचं प्रबळ चिन्ह म्हणून अशा स्वप्नांकडे पाहता येत असे **डॉ. सायमंड** यांचे प्रतिपादन आहे. स्वप्न हे सूचक असते. काहींच्या बाबतीत तर कुठेतरी, काहीतरी चुकतंय हे सुचविणारा 'स्वप्न' हा पहिला धागा असू शकतो.

जुने नमुने नाहीसे होताहेत आणि नवे बदल घडू लागले आहेत याची सूचना देखील स्वप्नातून मिळू शकते. एका इतिहासाच्या प्राध्यापिकेचे हे स्वप्न आहे. तिला तिच्या जगण्याचा निश्चित मार्ग सापडण्यात अडचणी येत होत्या. तिला एकदा स्वप्न पडले की ती मोटरकारमध्ये ड्रायव्हरच्या बाजूच्या जागेवर बसली आहे आणि ड्रायव्हरला काही सूचना देण्याचा प्रयत्न करते आहे. काही काळानंतर तिच्याच लक्षात आले की, आपल्या आयुष्यावर आपण अधिक ताबा ठेवला पाहिजे. काही महिन्यानंतर तिला पुन्हा एक स्वप्न पडले. ती ड्रायव्हरच्या शेजारच्या जागेवरच आहे. पण गाडी चालली आहे आणि भीतिदायक वाटेल अशी गोष्ट म्हणजे ड्रायव्हरची जागा रिकामीच होती.

असे स्वप्न अस्वस्थ करेल पण प्रस्तुत संदर्भात ते प्रगती सुचविणारेही आहे. ती एकटी, कुणाच्याही मदतीशिवाय गाडीतून सरळ जाऊ शकतेय. या पुढची पायरी ती स्वत: ड्रायव्हरच्या जागेवर बसण्याची असू शकेल.



अनुक्रमणिका

एखादे स्वप्न भविष्याचे आगमनसूचकही असू शकते. स्वप्नांचे वस्तुनिष्ठ निरीक्षणही स्वत:ला संघर्षातून बाहेर काढायला सहाय्यक ठरू शकते.

परावलंबित्वाच्या पिंजऱ्यातून जाणीवपूर्वक स्वत:ची सुटका करून घेणाऱ्या सिमॉन द बोवाचा अनुभव स्त्रियांना थरारक आणि मार्गदर्शक वाटेल.

इ. स. १९२९ मध्ये पॅरिसमध्ये बोवाची भेट जीन पॉल सार्त्रशी झाली. तिच्य उर्वरित सर्व आयुष्यात तिचा मित्र, सल्लागार- समुपदेशक आणि प्रियकर असे त्याचे स्थान राहिले. त्यांची भेट झाली तेव्हा दोघे विशीतले होते; तो तिच्यापेक्षा किंचित मोठा होता. ही भेट म्हणजे एका वेगळ्याच बौद्धिक प्रदेशात घेतलेली झेप होती. जवळ जवळ सगळा वेळ दोघे एकमेकांच्या सहवासात काढत, सारखीच पुस्तके वाचत त्यांचे मित्रमंडळही एकच असे, दोघांचे विचार इतके एकसारखे विकसित झालेले होते की आपल्या ज्या आठवणी तिने लिहिल्या आहेत त्यात ती 'आम्ही विचार केला', 'आमची कल्पना' असे शब्दप्रयोग करते.

सार्त्र अतिशय बुद्धिमान होता हे खरे आहे परंतु ही तेजस्वी, हुशार, गोड स्त्री त्याची जणू गुलाम झाली होती. त्या काळाविषयी ती लिहिते, "मी त्याच्यावर पूर्ण विश्वासले होते. प्रत्यक्ष परमेश्वर किंवा आईवडील यांच्यावर अवलंबून राहताना जसे पूर्ण सुरक्षित वाटायचे तसे त्याच्या सहवासात वाटे. माझ्या सर्व इच्छा पूर्ण झाल्या होत्या. वाटायचे, आणखी इच्छा करण्याजोगे आता काही उरले नाही..... फक्त ही अवस्था शाश्वत राहावी एवढाच वर हवा आहे." इतकी ती सार्त्रमय झाली होती. ही अवस्था एक-दीड वर्ष राहिली.

एकाएकी तिला शंका येऊ लागली की आपल्या 'स्व'मधले काहीतरी आपण हरवून बसतो आहोत. या भावनेचा तिच्यावर हळूहळू परिणाम होऊ लागला. तिच्या लेखनावरही तो दिसू लागला. जवळ जवळ दीड वर्ष ती या सूक्ष्म, आंतरिक संघर्षाला तोंड देत होती. ती म्हणते, "जरी जगातल्या उत्तम गोष्टींमागे मी उत्साहाने धावत होते तरी मला असं वाटायला लागलं होतं की या गोष्टी मला माझ्या उद्योगापासून दूर ठेवताहेत. आपण आत्म-विश्वासघात व आत्म-नाश यांच्या मार्गावरून जातो आहोत."पूर्वीची तिच्या अत्यंत आवडीची पुस्तके वाचताना तिचे मन एकाग्र होईना, त्यातून बौद्धिक समाधान मिळेना, नियतकालिकातले तिचे लिखाणही अधूनमधून केव्हातरी होऊ लागले. एखाद्या जाळ्यात अडकल्यासारखी तिची अवस्था झाली. "मला काहीच सोडवेना आणि कशाचीच निवड करता येईना." तिने एके ठिकाणी लिहिलेय. आणखी एके ठिकाणी ती लिहिते, "मला वाटू लागले, मी कोणीच नाही. 'मी' म्हणून मी अस्तित्वातच नाही. आता मी फक्त एक वांडगूळ आहे, वांडगूळ.

स्त्रीवादी विचारवंत सिमॉनकडे आधुनिक स्त्रीवादाचा पहिला आवाज म्हणून पाहतात तरी आपली या समस्येकडे पाहण्याची दृष्टी स्त्रीची असली तरी ही समस्या व्यक्तीची होती, ती तशीच सोडवण्याचा मी प्रयत्न केला असे ती म्हणते.

अचानकच परंतु विलक्षण निश्चयाने तिने एक निर्णय घेतला. शिक्षिकेची नोकरी स्वीकारून, सार्त्रपासून दूर जाण्यासाठी ती पॅरिस सोडून मार्सेलीला गेली. हा एकांतवासच

आपल्याला वळ देईल असा तिला विश्वास वाटत होता. आपल्या मानेवर बसलेले पारतंत्र्याचे भूत उतरविण्यासाठी तिने कठोर परिश्रम केले. आठवड्याचे दोन दिवस तिचे सुट्टीचे असत. या दोन दिवसात ती एकटीच फिरायला जाई, हे फिरणे म्हणजे सहज, आरामाचे फिरणे नसे. ती बास्केटमध्ये अन्न-पाणी भरून घेई आणि अनोळखी, अज्ञात ठिकाणी रस्ते-डोंगर शोधत हिंडत राही.

जशी तिची शक्ती आणि सहनशीलता वाढू लागली तसे तिचे चालणेही वाढू लागले. सुरुवातीला ती पाच-सहा तास चालत असे नंतर नंतर ती नऊ-दहा तास चालू लागली. प्रथम कुठे, कसे जायचे यासाठी ती लोकांची मदत घेत असे पुढे पुढे ती एकटीच मार्ग काढू लागली. खडकावर चढताना किंवा घसरत उतरताना ती जवळचे रस्ते शोधून काढू लागली. कारण प्रत्येक कृती ही एक कलाच असते असे तिला वाटू लागले.

त्या वर्षातले तीन प्रसंग तिच्या स्मरणात राहिले कारण त्या वेळी ती भयभीत झाली होती. एकदा एका एकाकी रस्त्यावरून चालताना तिच्यामागे एक कुत्रा लागला आणि जसजसा दिवस वर येत होता तसा तो तहानेने वेडा झाला; अखेरीस वाटेत एक ओहोळ लागला आणि त्यात त्या कुत्र्याने उडी घेतली. तेव्हा तिला हायसे वाटले.

एकदा एका ट्रक ड्रायव्हरकडे तिने लिफ्ट मागितली. वाटेत एकदम मुख्य रस्ता सोडून तो आडमार्गाकडे वळला, त्या पूर्ण परिसरात तो भाग एकांताचा होता. सर्व प्रकार तिच्या लक्षात आल्याक्षणी पटकन् मनाशी तिने एक युक्ती आखली. एका उतारावर ट्रकचा वेग कमी झाल्यावरोबर तिने ट्रकचा दरवाजा उघडला आणि चालत्या ट्रकमधून उडी मारण्याची धमकी दिली. वोवा लिहिते की, 'शरमून त्याने ट्रक थांबवला व मला उतरू दिले.'

तिसरा प्रसंग असा– एका दुपारी चालता चालता ती अशा जागी पोहोचली की, आता इथून परत फिरता येणार नाहीहे तिच्या लक्षात आले. ती तशीच चालत राहिली; तर पुढे खडकांची रांगच्या रांग लागली. ती लिहिते, "खडक ओलांडत मी पुढे जात राहिले तर एक वेळ अशी आली की मला मागे जाणे अशक्य झाले, पुढे तर खडकांच्या रांगांनी माझा रस्ता अडवलेला स्वत:च्याच पावलावर पाऊल रोवत मी पुढे व्हायला लागले आणि अशा जागी पोहोचले की मला पुढे उडी मारायचा धीर होईना. सगळीकडे नीरव शांतता, फक्त एखाद्या खडका आडून एखाद्या सापाची खुसफूस ऐकू येई. आजूबाजूला दुसरे चिटपाखरू नव्हते. समजा माझा पाय मोडला असता किंवा छोटा मुरगाळला असता तर माझे काय झाले असते? मी आरोळी मारली पण कुठूनही प्रतिसाद आला नाही. मी पंधरा मिनिटे तरी हाका घालत असेन. ती शांतता पाचावर धारण बसवणारी होती."

तिने स्वत:च अशी परिस्थिती निर्माण केली होती की आता जिवालाच धोका असताना तिला स्वस्थ राहून चालणार नव्हते. जे काही करायचे ते तिलाच करायला हवे होते. अखेर तिनेच धैर्य गोळा केले आणि शेवटी ती सुरक्षितपणे खाली आली.



अनुक्रमणिका

तिच्या मित्रमंडळींनी तिला ही साहसे थांबवण्याचा सल्ला दिला. पण स्वत:चाच शोध घेण्यासाठी तिने स्वीकारलेला हा ध्येयमार्ग होता. तिची ही भ्रमणे म्हणजे 'एक व्यक्ती म्हणून तिचा जो पुनर्जन्म झाला होता' त्याची पद्धत आणि प्रतीक ठरली. ती लिहिते, "सेंट व्हिक्टोरियाच्या शिखरावरील धुक्यातून मी एकटी फिरले. पिलाँ डी रोयच्या चिंचोळ्या पर्वतरांगातून एकटीने पावले टाकली, आणि खालच्या दरीतल्या धसमुसळ्या वाऱ्याला मी स्वत: अडवले, ल्यूवेरॉनच्या डोंगर घळीत मी एकटी हरवले. असे क्षण त्यांच्या ऊवेसह, कोवळिकीसह, बेफामपणासह माझे, फक्त माझेच होते."

१४ जुलैला, 'बॅस्टिल डे' ला ती पॅरिसला परत यायला निघाली, तेव्हा ती एक वेगळीच व्यक्ती बनलेली होती. तिने स्वत:च्या मित्र-मैत्रिणी जमवल्या होत्या आणि ती स्वत: माणसांना जोखू शकत होती. तिला एकांतातला आनंद कळला होता. तिने लिहिलेय, "या काळात मी फार कमी वाचन केले. आणि माझी कादंबरी तर कुचकामीच झाली. पण दुसऱ्या बाजूला स्वत: निवडलेल्या कामात मी जीव ओतला. नवा उत्साह मिळवून मी समृद्ध झाले. वेगळी, एकटी राहिले पण मी माझ्या मनाची शांती गमावली नव्हती. मला कळले होते की, मी माझ्या स्वत:वरच विश्वासू शकते."

**कॅरेन होर्नें** यांनी लिहिले आहे की, आपल्या दुबळेपणाला आणि दुभंगलेपणाला आपणच कसे हातभार लावतो, किंवहुना आपणच त्याचे कसे पोषण करून आपल्या अंतर्मनातील परावलंवनाचे समर्थन करतो हे आपल्याला एकदा समजायला लागले की हळूहळू आपण मनाने कणखर बनू लागतो. जितक्या प्रमाणात आपण आपल्या अंतर्मनातील संघर्षाला सामोरे जाऊ आणि त्यावर स्वत:च स्वत:चे उपाय शोधायला लागू तितक्या आपण आतून मुक्त होत जाऊ आणि कणखर बनत जाऊ. आपल्या समस्यांना जबाबदार आपणच आहोत हे ज्या टप्प्यावर आपल्या लक्षात येईल त्या टप्प्यावर काहीतरी विलक्षण घडेल. आपल्याला अधिक ऊर्जा लाभेल. आपल्या व्यक्तिमत्त्वातील काही अस्वीकार्य वाटणारे, घावरणारे पैलू दडपण्यात आपण थकतो, आपल्या ऊर्जेची गळती होत असते. पण आता ती बचाव करण्यात जर खर्च होणार नसेल तर ती अधिक सकारात्मक गोष्टींसाठी आपल्याला वापरता येईल. एकदा स्वत:चाच तिरस्कार करणे थांबवले की आपोआप आपले भय कमी होईल आणि आपल्या काळज्याही कमी होतील. ती जुनी लिंगभावाधरित भीती, जी दीर्घकाळ आपला पिच्छा पुरवत होती. ती भीतीच अदृश्य होईल. मग आपण इतरांनाही घावरणार नाही आणि स्वत:लाही घाबरणार नाही.

शेवटी ध्येय गाठायचे आहे ते आपल्यात भावनिक स्वाभाविकता आणण्याचे. त्यामुळे मनाची मरगळ दूर होते, अन् त्याचा परिणाम आपण करत असलेल्या प्रत्येक गोष्टीत दिसतो, मग ते एखादे काम असेल, तो सामाजिक व्यवहार असेल किंवा ते खाजगी पातळीवरील नातेसंबंध असतील. "मीच माझ्या जगण्याचा पहिला स्रोत आहे" ही ती जाणीव असते. **कॅरेन होर्नें** म्हणतात त्याप्रमाणे ही जाणीव आपल्याला 'मन:पूर्वकते'कडे



अनुक्रमणिका

घेऊन जाते. मन:पूर्वकता म्हणजे मनाची अशी क्षमता की, जिथे भावनिक खोटेपणा नसतो, उलट भावनिक दृष्टया प्रामाणिकपणा असतो, एखाद्या कामात, एखाद्या श्रद्धेत किंवा एखाद्याच्या भावनेत आपण पूर्ण समरसून जाऊ शकतो.

अशा मन:पूर्वक जगणाऱ्या स्त्रिया बुद्धिमान असतील किंवा नसतील, सर्जनशील असतील वा नसतील, शहरातील असतील किंवा खेड्यातील असतील परंतु त्या मनातून नक्कीच मुक्त असतील आणि स्वत:ला मुक्त करू न शकलेल्या स्त्रियांपेक्षा गुणात्मक दृष्ट्या वेगळ्या व संपन्न असतील. त्यांची अनुभव घेण्याची पद्धत वेगळी असेल आणि तो व्यक्त करण्याची पद्धतही वेगळी असेल.

असा एक छोटासा काळ आपल्या आयुष्यात येतो, त्याला 'मानसशास्त्रीय क्षण' म्हणूयात; कदाचित त्याचा अवधी आठवड्याचा असेल, कदाचित महिन्यांचाही असेल; पण त्याचा अनुभव एका क्षणात येतो. त्या क्षणी संघर्षांना जन्म देणारी आपल्या व्यक्तिमत्त्वाची अवस्था बंधमुक्त होते. ज्या क्षणी असे घडते त्याक्षणी कुठलीही गोष्ट शक्य होते. म्हणजे नोकरी बदलणे, गाव बदलणे, नवे नाते जोडणे किंवा पूर्वी स्वप्नातही न आलेली एखादी सर्जनशील कृतीही शक्य होते.

अशा मुक्त स्त्रीला जीवन आनंदी वाटू लागते. स्वत:च्या खऱ्याखुऱ्या इच्छेनुसार एखादी गोष्ट स्वीकारायला किंवा नाकारायला ती स्वतंत्र होते. अत्यंत सुंदर, तीव्र भावनिक अनुभव तिची वाट पाहात असतात. ती भावनिक दृष्ट्या प्रगल्भ होते; तिची भावनिक गमनशीलता वाढते. स्वत:ला समाधान देणाऱ्या गोष्टींकडे ती वळते, असमाधानकारक वाटणाऱ्या गोष्टी नाकारण्याचे धैर्य तिच्यात असते.

आपली ध्येये ती स्वत: ठरवते, आपण अपयशी तर ठरणार नाही ना? याचे भय न बाळगता ती ध्येयाप्रत पोहोचण्यासाठी पावले उचलते. आपल्या मर्यादा आणि क्षमतांचे तिला वास्तवपूर्ण भान असते; थोडक्यात ती यशस्वी होण्यासाठी मुक्त असते.

The clan of the cave Bear या कादंबरीची लेखिका **जीन ओएल** (Jean Auel) ची कहाणी अद्भूत वाटावी अशीच आहे. बाहेरच्या घटकांना तिने आपल्या आयुष्याचा अजिबात ताबा घेऊ दिला नाही; किंबहुना तिच्यावर इतर व्यक्ती अवलंबून असताना आपल्या आयुष्यात आकार देण्याची जबाबदारी तिने स्वत:वरच घेतली.

वयाच्या अठराव्या वर्षी तिचा विवाह झाला आणि पंचविसाव्या वर्षापर्यंत ती पाच मुलांची आई झाली. घराची जबाबदारी आणि पोर्टलँडच्या आपल्या घराजवळील टेक्ट्रॉनिक्स प्लँट या कंपनीत पंच ऑपरेटरची नोकरी सांभाळत तिने रात्रशाळेत नाव घातले आणि बिझिनेसमधील मास्टर्सची पदवी संपादन केली. त्या पदवीच्या जोरावर तिने टेक्ट्रॉनिक्समध्येच क्रेडिट मॅनेजरची जागा मिळवली; ८ लाख डॉलर्सच्या खात्याची ती



अनुक्रमणिका

जवाबदारी होती. काही महिने नोकरी केल्यावर आपल्या चाळीसाव्या वाढदिवसात तिने नोकरी सोडली. आता तिला एक कादंबरी लिहायची होती.

एका मध्यरात्री या कल्पनेने तिला झपाटले. नेंदरथॉल्सच्या अगदी आदिम समाजात एक तरुण क्रो-मॅगनॉन मुलगी जाते त्याची ही गोष्ट आहे. या आदिम समाजाचे ज्ञान मिळवण्यासाठी तिने पन्नासच्यावर पुस्तके वाचली. तिला कादंबरी कशी लिहायची ते माहित नव्हते; मग तिने 'कादंबरी लेखना'वरची आपल्या मुलीच्या अभ्यासक्रमातील पुस्तके अभ्यासली. तिचा पहिला खर्डा ४५०,००० शब्दांचा झाला; मग दुसरा, तिसरा ती पुन्हा पुन्हा लिहित राहिली. मग प्रकाशकांशी बोलणी सुरू झाली. काही नकार पचवल्यावर तिने न्यूयॉर्क लिटररी एजंटला पत्र पाठवले व एका लेखकांच्या कार्यशाळेच्या प्रसंगी त्यांची प्रत्यक्ष भेट घेतली. आठ आठवड्यानंतर The clan of the cave Bear या कादंबरीसाठी तिने १ लाख ३० हजार डॉलर्सच्या करारावर सही केली.

अंतर्मनातून मुक्त झालेली स्त्री अशी असते. ती आयुष्यात आलेले बदलाचे वारे नाकारत नाही. आजवर कधीही न केलेले, विलक्षण, नवे असे काम समोर आले तरी ती घाबरत नाही. तिचा स्वत:वर विश्वास असतो आणि स्वत:वरील विश्वास हाच अंतिम असतो.

मला कळलंय की, स्वातंत्र्य आणि स्वावलंबून बाहेरून कुणी देऊ शकत नाही, ना ते या विशाल समाजाकडून मिळणार आहे ना पुरुषांकडून. असंख्य वेदना सहन करून ते आपलं आपल्यालाच मिळवावं लागणार आहे. ते मिळवायचं असेल तर आजवर आपल्याला ज्या सुरक्षिततेच्या, परावलंबित्वाच्या पांगुळगांड्याची सवय झालीय तिचा त्याग करावा लागेल. आणि वाटतं तेवढं ते धोक्याचं नाही.

ज्या स्त्रीचा स्वत:वर विश्वास आहे तिला आपल्या क्षमतेपलिकडची पोकळ स्वप्ने पाहात स्वत:ला फसवत राहण्याची गरज नसते; त्याच वेळी अवघड कामे पार पाडण्याची आपल्यात क्षमता आहे आणि तशी आपली तयारी आहे याची जाणीव असल्याने अशी कामे समोर आली तर ती विचकत नाही. ती वास्तववादी असते. भक्कम पायावर उभी असते आणि स्वत:वर प्रेम करत असते. ती स्वत:वर प्रेम करत असते म्हणून ती इतरांवर प्रेम करायला मुक्त असते.

मुक्त झालेल्या स्त्रीबाबत या आणि याहून कितीतरी अधिक गोष्टी संभवतात.

१९८० च्या दशकात **कॉलेट डाऊलिंगने** केलेले हे चिंतन २००३ मध्येही शिळे झालेले नाही. आजही कित्येक स्त्रिया सिंड्रेलाप्रमाणे, आपले आयुष्य बदलून टाकण्यासाठी एखद्या बाहेरच्या घटकाची वाट पाहाताहेत.



अनुक्रमणिका

स्वानुभवातून आणि चार वर्षांच्या सूक्ष्म संशोधनातून **कॉलेटने** 'स्त्रियांना त्यांच्या खऱ्या स्वातंत्र्यापासून आणि आनंदापासून मागे खेचणारा सिंड्रेला गंड हा प्रमुख घटक कसा आहे ते दाखवले आहे. किंबहुना स्त्रीच्या नकळत तिच्या अंतर्मनात पिढ्यान् पिढ्या रूतून बसलेल्या असुरक्षिततेच्या भावनेला तिने मुखदित केले आहे.

कॉलेटने दिलेली उदाहरणे **अमेरिकन स्त्रियांची** आहेत खरी. परंतु ते सांस्कृतिक तपशील दूर केले तर स्त्री मनाचा गाभा सर्वत्र सारखाच आहे. म्हणूनच सिंड्रेलाच्या कथेचं हे पुनर्वाचन महत्त्वाचं ठरतं.

| | |
|---|---|
| Depression | नैराश्य, वैफल्य |
| Dependence | परावलंबित्व |
| Female achievement gap | आत्मसातीकरणातील स्त्रीधर्मीय खिंडार |
| Complex, Phobia | गंड |
| Learned helplessness | शिकून घेतलेली हतबलता |
| Attribution theory | श्रेय देण्याचा सिद्धांत |
| Togetherness | एकत्रितपणा |
| Fusion | मिसळण |
| Blind devotion | आंधळा त्याग |
| Projective story completion | कथापूर्तीचे तंत्र |
| Role model | आदर्श, नमुनारूप |
| Gender panic | लिंगघबराट |
| Working through | सहेतुक गतीशील प्रयत्न |
| Psychological moment | मानसशास्त्रीय क्षण |

---

गणित या ज्ञानशाखेला आधारभूत मानून संशोधन करणारे जे संशोधक असतात, त्यांना दोन प्रमुख पद्धतींचा वापर करावा लागतो. १) अस्तित्वात असलेल्या सिद्धांतातील विसंवाद व त्रुटी दूर करणे. २) तत्पूर्वी जे सिद्धांत अलग व विसंवादी वाटत होते त्यांच्यात ऐक्य प्रस्थापिक करणे.

**– नोबेल परितोषिक विजेते पॉल डिरॅक यांच्या एका भाषणातून**



अनुक्रमणिका

## मानसशास्त्र

# सिगमंड फ्राईड यांचे लिखाण – विज्ञान की काव्य?

**– श्रीकृष्ण खोत**

**(1) Freud's ideas, involving penis envy Oedipus complex, Id and other fanciful creations are myths that lack objective standing.**

**– Christof Koch (Divisions & Biology and of Engineering and applied science Caltech Pasp dina.**

**– Francis Crick (Salk Institute La Jolla Californa. यांच्या लेखातून**

आपल्या इकडील तथाकथित फ्राईड साहित्याचे गाढे अभ्यासक व विश्लेषक यांच्या लिखाणात नेहमी चलाखी असते. उदा. अलीकडेच अशा एका तथाकथित अभ्यासकाच्या शार्गिदाने या अभ्यासकांच्या नावांवर पुढील विधान नमूद केलेले आहे. "मनाचे मॉडेल जोपर्यंत बदलत नाही तोपर्यंत फ्राईड कालबाह्य होणार नाही." मी तथाकथित या शब्दाचा वापर बुद्धीपुरस्सर केलेला आहे. मुंबई नगरीतील दादर येथील फ्राईड यांच्या लिखाणाचा एका वाचकाशी माझा अनेक वर्षे घनिष्ट परिचय होता. मी फ्राईड यांच्या सिद्धांतावर व लेखनावर मान्यवरांनी केलेली टिका त्यांच्या निदर्शनास आणून दिली होती. पण त्याचा प्रतिवाद त्यांनी कधीही केला नाही. याठिकाणी या तथाकथित अभ्यासकाचे जे वाक्य उद्धृत केले आहे त्यात ती नेहमीची चलाखी आहे. उदा. हे विधान करताना, "हे मनाचे मॉडेल" ही फ्राईड यांची कवी कल्पना आहे हे फार मोठा शिताफीने सांगितलेले नाही. असे करून ते वैज्ञानिकांना मान्य असलेले मॉडेल असा आभास निर्माण केलेला आहे. हे मॉडेल केव्हा, कधी व कोणत्याही वैज्ञानिकांना मान्य झाले याचा पुसटता उल्लेखही हे तथाकथित अभ्यासक करीत नाहीत. हे विधान ज्या शार्गिदाने आम जनतेला पेश केले, तो फक्त गुरुचरणी नतमस्तक झाला होता. एरवी या शार्गिदाने अनेक प्रश्न उपस्थित केले असते. तसे प्रश्न हा शार्गिद दुसऱ्या अनेकांच्या बाबतीत उपस्थित करतो. यावर उल्लेखिलेल्या विधानासारखी अनेक चलाखीची विधाने करून, फ्राईड यांच्या एकंदर लिखाणाचा विज्ञान या स्वरूपात मानसशास्त्र या ज्ञानशाखेस चांगलाच हातभार लागला आहे अशा प्रकारचे बरेचसे प्रतिपादन करण्यात येते. फ्राईड यांनी प्रतिपादन केलेली मनोविश्लेषण पद्धतीचा वापर केल्याने प्रत्यक्षात मनोरुग्ण बरे होतातच असे नाही वा

त्याना आरामही मिळत नाही असा त्या क्षेत्रात काम करणाऱ्या मानसशास्त्रांज्ञाचा अनुभव आहे. म्हणूनच कोख (Koch) व क्रिक (Crick) यांच्यासारख्या नामवंत वैज्ञानिकांनी फ्राईड यांचे विचार व त्यातून सिद्ध होणारे सिद्धांत हे 'मिथ्यके' (Myths) आहेत असे म्हटले. गंमत अशी आहे की, फ्राईड यांच्या लिखाणाचा व त्यातील कल्पनांचा वापर जास्त करून कलाक्षेत्रात होतो. (कलाक्षेत्र हे विज्ञानाच्या कक्षेबाहेर आहे, हे या ठिकाणी लक्षात ठेवले पाहिजे) उदा. अति वास्तव-वादी कला. या चित्रकला ढंगातील डाली (Dali), माग्रीत्त (Magritte) आणि त्यांच्यासारख्याच नामवंत चित्रकारांच्या कलाकृतींचे कलामूल्य प्रचंड आहे हे जरी मान्य केले तरी फ्राईडने मांडलेल्या सिद्धांताच्या सत्यतेशी त्यांचा काहीही संबंध नाही. म्हणजे फ्राईडने मांडलेले सिद्धांत हे वैज्ञानिक क्षेत्रात मान्य होणारे सिद्धांत आहेत. हे त्या महान कलाकृतीवरून ठरत नाही. हे सारे जरी असले तरी फ्राईड यांचे लिखाण, त्यांनी मांडलेले सिद्धांत त्यांचे व्यक्तिमत्त्व याबद्दल अजूनही अनेकांना मोठीच दिलचस्पी आहे; शिवाय त्यांच्याबद्दल मनस्वी आदरही आहे. आपण तुलनेसाठी एका वेगळ्या क्षेत्रातील पण फ्राईड यांच्या लिखाणाचे जे झाले तसेच झालेल्या दुसऱ्या एका त्याच्या क्षेत्रात महान शास्त्रज्ञ मानला गेलेला पण विद्यमान काळी फक्त ललित लेखकांना भावणाऱ्या लेखकाचे झाले आहे. फ्रेझर (Frazer) हे मानवशास्त्रज्ञ. यांचा Golden Bough हा अनेक खंडातील ग्रंथाचा उपयोग ललित साहित्य लिहिणाऱ्यांना फार होतो. पण त्यांची आठवण मानवशास्त्रज्ञाना एक उपचार म्हणून त्यांचे नाव घेण्यापलीकडे होत नाही. मानवशास्त्र (Anthrapology) सोडून इतर शास्त्रज्ञानी त्यांची आठवण होण्याचेही काही कारण नाही. ही विद्यमान वस्तुस्थिती आहे. फ्राईड यांच्या सुदैवाने त्यांचे तसे झालेले नाही. काही वर्षामागे, अमेरिकेतील लायब्ररी ऑफ काँग्रेसने (अमेरिकन संसदेचे ग्रंथालय) प्रायोजित केलेले Fréud Conflict and Culture (फ्राईड संघर्ष आणि संस्कृती) या नावाचे प्रदर्शन न्यूयॉर्क शहरामधील **ज्यूईस म्युझियम** या ठिकाणी भरविण्यात आले होते. याशिवाय न्यूयॉर्क शहरातील प्रख्यात **गुगन हाईम** म्युझियममध्ये Surrealism : Two Private Eyes (अतियथार्थवाद : दोन गुप्त पोलीसी दृष्टीकोनातून) या नावाखाली झाले होते. फ्राईड यांच्या कल्पनांचा चित्रकलेद्वारा होणारा परिणाम जनमानसात रुजावा असा या दोन्ही प्रदर्शनांचा हेतू होता. खास करून अतिवास्तववादी चित्रांच्याद्वारा. लायब्ररी ऑफ काँग्रेसच्या प्रदर्शनात चित्रपटीय चित्रफिती (Film Clips), खुद्द फ्राईड यांच्या मूळ घरातच तयार केलेला चित्रपट, खुद्द फ्राईड यांच्या अभ्यासिकेची पुनर्निर्मिती; नवनिर्मित प्रतिकृती इत्यादींचा त्यात समावेश होता. एवंच फ्राईड यांच्या सर्व लिखाणातील त्यांनी पुरस्कारीलेल्या तत्त्वांची प्रकृती. ज्यातून प्रक्षेपित होईल अशा प्रकारे या प्रदर्शनाची योजना व आखणी करून ती आम जनतेसमोर प्रदर्शित करण्यात आली होती. फ्राईड यांनी मांडलेला Psycho analysiis (मनोविश्लेषण सिंद्धाताबद्दल) त्यांच्या हयातीतच प्रचंड वादंग गाजले होते. फ्राईडनी मांडलेल्या सिद्धांताला अत्यंत प्रखर विरोध करण्यात त्यांचे अगदी फारच निकटवर्तीय सहकारी सहभागी होते. हे खास



अनुक्रमणिका

करून लक्षात ठेवले पाहिजे. एक विचारवंत आणि प्रथमच एक सर्वस्वी नवा सिद्धांत मांडणारा **एक शास्त्रज्ञ** या स्वरूपात फ्राईड यांचे स्थान काय? या संबंधात दोन फारच परस्परविरोधी प्रतिमा त्या शास्त्राच्या मूलगामी अभ्यासकात आहेत. (तथाकथित मराठी भाषिक गाढे नित्शे-फ्राईड साहित्याचे दादरस्थित अभ्यासक यांच्या अंर्तभाव यात नाही कारण ते मूलगामी अभ्यासक कधीच नव्हते) प्रस्थापित सनातनी तत्त्वांना आव्हान देणारा, एक प्रज्ञावंत व धाडसी शास्त्रज्ञ फ्राईड होते म्हणूनच ते बदनाम झाले असे एक पक्षाचे म्हणणे आहे. याउलट कोणत्याही थरावरची कसलीही विश्वसनियता नसलेला (किंवा जवळ- जवळ नसलेला, एका चक्रम पंथाचा (crack-brained) संधीसाधू संस्थापक हा असा झाला दुसरा दृष्टिकोन. यापैकी एकही बाजू वास्तव नाही. फ्राईड यांच्याबद्दल समाजात अजूनही दिलचस्पी का आहे (नवी क्षितिजचे एक माजी संपादक यांत होते) याचा विचार करण्यासाठी हे दोन्हीही दृष्टिकोन बाजूस ठेवून, आपण विचार केला पाहिजे.

म्हणूनच यातील कोणत्याही एका पक्षाची बाजू न घेता या प्रश्नासंबंधी विचार करण्याचा प्रयत्न या लेखात करण्यात आलेला आहे. विसाव्या शतकात पाश्चिमात्य जगतात जन्माला आलेल्या कोणत्याही सुजाण, विद्याविभुषित, बौद्धिक दिलचस्पी असलेली व्यक्ती फ्राईड यांच्या बद्दलच्या सुरस व चमत्कारिक कथा व त्यांनी मानवी संस्कृतीला मोठे योगदान केलेले आहे, असेच ऐकत आली होती. मी देखील हे सारे ऐकल्यानेच तारुण्याच्या आरंभी फ्राईड यांच्या लिखाणाबद्दल माझ्या मनात प्रचंड कुतूहल होते. (या ठिकाणी एखादा जो फ्राईड यांचा पक्षपाती वाचक असेल त्याच्यासाठी हे नमूद करतो की, मी कोणत्याही मनोविश्लेषकाकडे जाऊन माझे मनोविश्लेशण करून घेतलेले नाही. यावर गंमतीने असेही सांगतो की, खुद्द फ्राईड यांनीही करून घेतले नव्हते) या कुतूहलापोटी त्यांच्या एकंदर लिखाणाचे माझ्या मगदुरानुसार दोषैक दृष्टीने आलोडन केले. या लेखाचे पुढचे जे भाग आहेत ते त्या दोषैक वाचनाची फलश्रुती आहे.

(१)

मानवी मनाचा व्यापार कसा चालतो हे जाणून घेण्याच्या संदर्भात फ्राईड यांनी काही क्रांतिकारक ठरतील अशा स्वरूपाचे काही अंदाज आपल्या लिखाणातून व्यक्त केले. ती एका अर्थाने प्रज्ञावान अशी नवनिर्मिती होती. त्या अंदाजांची व्याप्ती समजावून घेण्यासाठी आपण सामान्य सुजाण माणसे मानवी वागणूकीचा अन्वयार्थ लावून, त्यापासून बोध कसा करून घेतो अथवा त्याचे स्पष्टीकरण कशा प्रकारे करतो हे समजावून घेणे आवश्यक आहे. मानवी मनाचा व्यापार कसा चालतो याचे स्पष्टीकरण देण्यासाठी **फ्राईड यांनी वापरलेली 'संरचना व चौकट' ही आपल्यासारखी सामान्य सुजाण माणसे जी चौकट वापरतात त्यापेक्षा** ती फारशी वेगळी नाही. फ्राईड यांची चौकट ही एक सुधारीत आवृती आहे एवढेच. सामान्य मनुष्य एखाद्या परक्या माणसाचे मानस समजावून घेण्याचा प्रयत्न करतो, त्यावेळी काय करतो? त्या परक्या माणसाची इच्छा काय असेल? त्याची नेमकी गरज काय होती? त्याची वासना वा

उद्दिष्ट काय असेल या भोवतीच तो .घोटाळत असतो. त्या कोणा परक्या माणसाचे मानस समज़ावून घेण्याच्या प्रयत्नाचा गाभा त्या प्रश्नांतच आहे. एखाद्या कृतीला कोणत्या हेतूमुळे प्रेरणा मिळाली हे आपणास समजले की त्या कृतीचा अन्वयार्थ आपणास लावता येतो. सामान्यपणे एकाद्या कृती मागचा हेतू हा तसा स्पष्ट असतो. याचे कारण कोणत्या हेतूमुळे एकादी कृती करण्यास जो कोणी प्रवृत्त होतो. तो हेतू त्या कृतीतूनच उघड झालेले असतो. उदा. **'अपना बाजार'** सारख्या लोकप्रिय भांडारात जाऊन काही खरेदी केली तर त्याचे पैसे मी लगेच चुकते करण्याची क्रिया का करतो? या कृती मागचा हेतू अगदी स्पष्ट आहे. ती विकत घेतलेली वस्तू-पैसे चुकते केल्याकारणाने– मला घरी घेऊन जाता येते व तिचा वापर मी माझ्या मनात येईल त्यावेळी मला करता येतो. थोडक्यात ज्या इच्छा आपणास स्पष्टपणे जाणवतात त्याची परिपूर्ती करण्यासाठी आपण सामान्यपणे कृती करतो. एखाद वेळेस असेही होईल की, आपण कृती का करतो या मागचा हेतू आपण ती कृती करतो त्याक्षणी तरी अनआकलनीय असेलही. उदा. एखादी वस्तू मला हवी असते ती वस्तू मला मिळावी यासाठी माझ्या मेजाच्या प्रत्येक खणाचा मी धांडोळा घेतो. पण मला ती काही सापडत नाही. खरे म्हणजे मला नक्की ठाऊक नसते की, मी वस्तू त्या मेजाच्या कोणत्या खणात कोठे ठेवलेली आहे? मग धांडोळा घेण्याची कृती करण्यामागे माझा हेतू काय आहे हे अनआकलनीय आहे. एवंच 'हेतू' असणे ही एक मानसिक अवस्था आहे. त्यातून कृतीला प्रेरणा मिळते. म्हणूनच त्या कृतीला अर्थ प्राप्त होतो. ज्या हेतूने ती कृती करण्याला प्रेरणा मिळालेली असते, त्या संदर्भातच ती कृती विश्वसनीय थोडक्यात बुद्धीला पटणारी ठरते.

आपल्या मनात हेतू अनेक प्रकारचे असतात. आपल्या जीवनात आपण ज्या काही कृती करतो त्यांचे स्पष्टीकरण त्या कृतींच्याद्वारा मिळते. याचे साधे कारण असे आहे की, आपल्या उद्दिष्टांची, इच्छांची, वासंनाची परिपूर्ती करण्याचा मुलभूत प्रयत्न म्हणजे आपण करतो त्या कृती सामान्यपणे एकादी कृती करतो त्यावेळी आपण ती कृती करण्यामागे आपला हेतू काय असतो, हेही आपणास ज्ञात असते. एवंच आपणास कृती-प्रवण करणारे घटक आपल्या-सारख्या माणसात आहेत याची आपणाला जाण असते. याचे कारण आपले आत्मभान. थोडक्यात स्वत:ला समजावून घेण्याची क्षमता आपल्याकडे फार मोठ्या प्रमाणात असते. आपण केलेल्या कृतीमागचे स्पष्टीकरण काय आहे, हे आपणास ज्ञात असते याचे कारण, ती कृती करण्यामागे आपला हेतू काय होता याची आपणास जाणीव असते. म्हणूनच आपण काही वेळा 'हेतू हा जाणीवपूर्वक होता' अशा प्रकारचा शब्दप्रयोग करतो. आपल्यासारख्या इतरांचेही. हे तसे वरवर पहाता चमत्कारिक वैशिष्ट आहे. उदा. आकाशात भ्रमण करणारे ग्रह अगर पृथ्वीतलावरील वनस्पती– यासारख्या मानवाच्या विचारधीन असलेल्या गोष्टीबद्दल असे सांगता येणार नाही. याचे कारण ग्रह अगर वनस्पती या दोघांनाही ते ज्या प्रकारे वर्तन ते का करतात हे ज्ञात आहे असे त्यांना सांगता येणार नाही. परंतु आपण ज्या सर्व कृती करतो,

त्यातील प्रत्येक कृतीचे परिपूर्ण असे स्पष्टीकरण आपणास अर्थातच ज्ञात नसते. उदा. वस्तू हरविणे, प्रसंग विसरणे याबद्दलचे स्पष्टीकरण आपणास देताच येते असे नाही. हा अनुभव आपणा सर्वानाच कधी काळी आलेला असतो. या संबंधात आपण असे गृहित धरतो की, अबोधनिय अशी प्रक्रिया या घटनेत अंतर्भूत आहे. परंतु हे जरी गृहित धरले तरी एक भाग राहतोच. आपण ज्या काही कृती करतो, त्याच्या मानसिकतेचा जो गाभा आहे, तो आपणा सर्वानाच सामान्यपणे ज्ञात असतो. एवंच कृती-प्रवण होण्यासाठी जे आत्मभान व ज्ञान असावयास हवे ते आपणा सर्वांशीच आहे.

आपल्या सर्वांच्या मनाची दोन वैशिष्टे आहेत. (१) आपण ज्या काही कृती करतो, त्या मागच्या प्रेरणांचे अस्तित्व (२) आपणा सर्वांनाच त्याबाबतचे आत्मभान. ही दोन्ही वैशिष्टे एकाच नाण्याच्या दोन बाजू आहेत ती अलग करता येत नाही. फ्राईड यांनी मानवी मनाचे जे मॉडेल कल्पिलेले होते, त्यानुसार अथवा त्यांनी मांडलेल्या मनाच्या संकल्पनेनुसार त्यात अत्यंत आवश्यक भाग हा आहे की, **हे दोन्ही अलग होतीलही.** थोडक्यात आपल्या व्यक्तित्वात आपणास ज्याची जाण नाही पण आपणास कृती करण्यास प्रोत्साहीत करणारे, प्रेरणा देणारे घटक असतीलही, असे ते सांगतात. आत्मभानातून– जाणिवेतून निर्माण होणारी आपण एखादी कृती का करतो? याबद्दलची स्वत:बद्दलची जाण हा घटक आपणा सर्वानाच महत्त्वाचा वाटतो. फ्राईडनी त्याचा उपयोग केला व हेतूवर आधारित असलेल्या मानवी कृतींच्या स्पष्टीकरणाचे क्षेत्र फारच आमूलाग्रपणे विस्तारीत केले. याच संदर्भात फ्राईड यांनी अबोध-मनाची संकल्पना मांडली. त्यांच्या प्रतिपादनानुसार मानवी मनात साठलेल्या हेतूंचा **तलाव** म्हणजे अबोध-मन. आपण ज्या काही कृती करतो त्याचे स्पष्टीकरण त्या 'तलावा'च्या अनुषंगाने मिळते आणि आपण ज्या कृती करतो त्यांना अर्थही प्राप्त होतो. परंतु यापैकी प्रत्येक व्यक्तींची आपल्या स्वत:ला समजावून घेण्याची जी क्षमता आहे त्याचा काहीही भाग नसते. फ्राईड प्रणित हेतूवर आधारित अशी जी स्पष्टीकरणे आहेत तिचा पुरेपूर फायदा, फ्राईडनी उठविला आहे. प्रत्येकाला कधीना कधी तीन प्रकारचे अनुभव येतात. व्यक्तीला पडणारी स्वप्ने, संभाषणात होणाऱ्या चुका अगर एखादी कृती करताना होणारे घोटाळे (फ्राईड याला Parapraxis म्हणतात. Para - to protect, to ward off संरक्षण / हल्ला परतवून लावणे Praxis कृती) आणि सरतेशेवटी न्यूरसिसची भावना व लक्षणे.

वरील छेदकात नमूद केलेल्या तीनही मानवी अनुभवातील घटनांचा व प्रक्रियांचा ज्यात समावेश आहे, त्या सर्वसामान्यपणे आपणास अर्थहीन वाटतात. परंतु त्याना अर्थ आहे असे फ्राईड वारंवार सांगतात. आपणास त्या अर्थहीन वाटतात याचे कारण कृती करणारा जो कोणी असतो, त्याची कृती आपणास ज्ञात असलेल्या कोणत्याही हेतूची परिपूर्ती करीत नसते. निदान आपणास तसे दिसते वा वाटते. परंतु आपल्या मनातील सुप्त हेतूंची परिपूर्ती या आपणास अर्थहीन वाटणाऱ्या घटना वा प्रक्रियांच्या द्वारा होते असे फ्राईड यांचे सांगणे आहे. उदा.



अनुक्रमणिका

आपणास एखादे स्वप्न का पडले यावद्दल आपण काही वेळा बुचकळ्यात पडतो, आपणाकडून बोलताना शब्दांच्या क्रमाची अदलाबदल होते. उदा. (मुलींच्या प्रसिद्ध शाळेऐवजी प्रसिद्ध मुलींची शाळा असे बोलले जाते). एखाद्याला वारंवार हात धुणे आवश्यक आहे असे वाटून तो ती कृती करतो. ही कृती सामान्यपणे 'न्यूराटीक'च आहे. तिच्या मागे हेतू काय असेल हे आपणास सांगता येत नाही. या येथे दिलेल्या तीनही उदाहरणावरून त्या प्रत्येक कृतीमुळे कोणत्या हेतूची पूर्तता झाली होती हे आपल्यासारख्या माणसाना सांगता येत नाही. या साऱ्याच घटना/प्रक्रिया अर्थहीन आहेत, भन्नाट आहेत. त्यांच्यात कोणत्याही हेतू वा मुद्दा अनुस्यूत नाही हे आपणास जाणवते. एवंच अशा अनवट घटना / प्रक्रिया का घडल्या याचे स्पष्टीकरण त्या घटना / प्रक्रिया अनुभवणारी व्यक्ती आपणास सामान्यपणे काहीही स्पष्टीकरण सादर करीत नाही. वरवर पहाता दृष्टोपत्तीस येणाऱ्या अनेक घटना वा गोष्टी असतात, त्या आपणास अर्थहीन वाटतात. पण त्या घटना / प्रक्रिया या सर्वात काही ना काही हेतू अनुस्यूत असेल तो समजावून घेतला जमेस धरला म्हणजे मग या प्रथम दर्शनी गोंधळात टाकणाऱ्या वा भासणाऱ्या घटना / प्रक्रियाना फ्राईड यांच्या सिद्धांतानुसार वा सुत्रानुसार अगदी परिपूर्ण असा अर्थप्राप्त होतो. फ्राईड यांच्या पक्षपात्यांच्या दृष्टिकोनातून भीमटोला (Master Thesis) असा हा फ्राईड यांचा हा सिद्धांत. **फ्राईड आपणास असे सांगतात की, जी कोणी व्यक्ती प्रत्यक्ष कृती करते तिच्या जाणिवेत ते हेतू नसतात.** फ्राईड यांच्या सिद्धांतात ज्या (कवी) कल्पना अंतर्भूत आहेत त्यातील मुलभुत कल्पना त्यांनी हे जे पायाभूत गृहितक मानलेले आहे, त्यातूनच आलेल्या आहेत. या गृहितकानुसार हेतूवर आधारित अशी स्पष्टीकरणे ही सर्वत्र सर्व ठिकाणी लागू ठरणारी विश्वात्मक स्वरूपाची स्पष्टीकरणे आहेत. फ्राईड यांच्या सिद्धांतानुसार दिली जाणारी स्पष्टीकरणे अर्थातच काही ठिकाणी कमकुवत आहेत. वेळप्रसंगी ती न पटणारी आहेत, अथवा शक्य कोटीतील वाटणारी आहेत अशीही नाहीत. परंतु या सर्व स्पष्टीकरणांची गंगोत्री त्या मूळ गृहितकात आहे. काही प्रमाणात या गृहितकाच्या प्रवासात त्यास इतरही सहाय्य प्राप्त झालेले आहे. याशिवाय महत्त्वाचा भाग म्हणजे या गृहितकाबद्दल कोणत्याही स्वरूपाचा प्रश्न व शंका निर्माण करण्याचे फ्राईड यांच्या मनात कधीही आले नाही. याचे कारण त्यांना असे वाटत होते की, प्रत्येक मानवी कृतीमागे, कोणत्या ना कोणत्या प्रकारचे मानवी बुद्धीला पटणारे स्पष्टीकरण असलेच पाहिजे. म्हणूनच प्रत्येक मानवी निर्मितीच्या मुळाशी इच्छापूर्ती (मग ती सुप्त का असेना) असते हेच त्यांनी आपल्या सर्व लिखाणात मार्गदर्शन तत्त्व या स्वरूपात शिरोधार्य मानले.

माणसाला जी स्वप्ने पडतात त्याबाबत फ्राईड यांनी मांडलेला सिद्धांत विचारात घेऊ या. अनेक घट्ट विणीची प्रतिपादने या सिद्धांतात अंतर्भूत आहेत. बाहेरील जगापासून स्वत:ला अलिप्त करून घेण्यासाठी मानव प्राणी झोप घेऊ इच्छितो. अंतर्गत अगर बाहेरचा जो काही त्रास असले, अडथळे असतील, त्यांचा प्रतिकार करून 'आपली निद्रा' ही 'निद्रा' रहावी ही

सर्व मानवी प्राण्यांची इच्छा असते. 'निद्रा' सुरक्षित ठेवणे हेच स्वप्नांचे कार्य आहे. या संबंधात फ्राईड लिहितात.

*"निद्रावस्थेत असताना स्वप्न पडलेल्या एकाद्या व्यक्तीला अन्नाची गरज आहे असे वाटते तिला आपण चांगले रूचकर जेवण घेत आहोत असे स्वप्न पडते आणि त्या व्यक्तीच्या झोपेत खंड पडत नाही. या व्यक्तीसमोर असलेल्या दोन पर्यायापैकी एका पर्यायाची निवड त्या व्यक्तीने करावयाची होती. एक, आपण जागे व्हायचे आणि अन्नसेवन करावयाचे. दोन, निद्राव्यस्था चालूच ठेवावयाची. या व्यक्तीने या दुसऱ्या पर्यायाची निवड करण्यास पसंती दर्शविली आणि आपली जी अन्नविषयक भूक होती, तिची परिपूर्ती स्वप्नाच्याद्वारे केली... काहीही असले तरी निदान तात्पुरती परिपूर्ती तरी झाली होती असे म्हणावे लागते. याचे कारण त्या व्यक्तीला लागलेल्या भुकेमुळे निर्माण झालेली परिस्थिती कायम राहिली असती तर (स्वप्न पडो वा न पडो) त्या व्यक्तीला निद्रावस्थेतून बाहेर यावेच लागले असते."*

आपली झोपमोड करतील अशा आपल्या अनेक इच्छा असतात आणि या फॅन्टसीच्या (अद्‌भूत) जगात स्वप्ने आपणास घेऊन जातात. आपल्या इच्छेची परिपूर्ती करण्यास स्वप्न आपणास मदत करते. तथापि नेमकी कोणती इच्छा या स्वप्नामुळे पूर्ण होत आहे हे नेहमीच उघड वा स्पष्ट नसते म्हणूनच अशा स्वप्नाचा उलगडा करताना ती त्या स्वप्नाने पुरी केलेली इच्छा ही व्यक्तीच्या जाणीवेत असलेली असणारच याचे कारण त्या स्वप्नाचा जो आशय असतो त्यातून ती इच्छा उघड होत नसते. याचा अर्थ या अशा स्वप्नात काही आशय सुप्त (Latent) आणि काही उघड झालेला असणे क्रमप्राप्तच आहे.

परंतु या ठिकाणी असा प्रश्न उपस्थित होतो की, या स्वप्नांचा जो आशय आहे त्यात अशा प्रकारचा भेद का असावयास हवा? फ्राईड या विषयीचे कारण असे सांगतात की, काही इच्छा आपल्या लैंगिक प्रकृतीमुळे स्वप्न ज्या कोणास पडते तिच्या जाणिवेला घृणास्पद वाटते, म्हणजे व्यक्तीने आपल्या स्वत:च्या सामाजिक संदर्भात ज्या काही इच्छा पडपोशीच्या (Taboo ताबू) मानून आपल्या जाणिवेतून तडीपार केलेल्या असतात,त्यांच्यावरची बंदी स्वप्नात थोड्या फार प्रमाणात सैल केली जाते.प्रत्येक व्यक्तीच्या मनात जो विचार-कोतवाल (censor) असतो त्याला गुंगारा दिला जातो. एका तिरपाकड्या (Distorted) अशा लक्षणीय स्वरूपात या पडदपोशीच्या (ताबू) इच्छेची परिपूर्ती होते. म्हणजे या ज्या ज्या दडपलेल्या लैंगिक इच्छेचे जे काही लक्ष असेल ते आविष्कृत करण्याची प्रतिके (Symbols) या स्वप्नात अनुस्यूत असलीच पाहिजेत. या इच्छा व्यक्तीच्या बालपणात तिला जो अनुभव आलेला असतो, त्यातून उद्‌भवलेल्या असतात. व्यक्तीच्या जीवनातील त्या विशिष्ट कालखंडातील अनुभव अगदी बिनधास्तपणे दडपून टाकले गेलेले असतात. निदान प्रत्येक व्यक्तीच्या बालपणानंतरच्या जीवनात बऱ्याचशा काळात ज्या दडपून टाकलेल्या इच्छा असतात, त्या बालजीवनातील लैंगिक भावनासंबंधी असतात. एवंच स्वप्नेही प्रत्येक व्यक्तीच्या बालजीवनातील काळातील



अनुक्रमणिका

दडपून टाकलेल्या इच्छांची तिरपाकडी परिपूर्ती आहेत हे झाले फ्राईड यांच्या सिद्धांताचे विवरण.

फ्राईड यांच्या सिद्धांताचा मूलाधार काय असेल तर स्वप्ने ही नेहमीच इच्छापूर्ती करतात हे गृहितक. थोडक्यात स्वप्नातल्या कृतीमागे काही हेतू असतो. उदा. आपल्या मातेशी संभोग घेण्याची इच्छा व त्यानुसार केलेली कृतीही त्यात अंतर्भूत असेलही. म्हणजेच स्वप्नाचा अन्वयार्थ लावायचा, ते उलगडून दाखवावयाचे म्हणजे जो अबोध असा जो हेतू आहे तो उघड व स्पष्ट करावयाचा येथपर्यंत ठीक आहे. परंतु सिद्धांतात मानवाला सामोरे जाऊ लागणाऱ्या अनेक प्रश्नांची उत्तरे नाहीत. कदाचित फ्राईड यांच्या सिद्धांतात मानवाला सामील होणारे ते प्रश्न नाहीत असे फ्राईड व नीत्शे यांचे तथाकथित अभ्यासक व त्यांचे शार्गिद सांगतीलही. फ्राईड यांच्या सिद्धांताचा गाभा स्वप्न पडणाऱ्या व्यक्तीची झोपमोड होऊ नये हे स्वप्नाचे एक कार्य असेल तर मग काही स्वप्नामुळे अनेकांची झोपमोड का होते? व्यक्तीची झोपमोड करण्याचे सामर्थ्य ज्या इच्छेत आहे त्या इच्छेची परिपूर्ती होण्यासाठी (उदा. स्वादिष्ट अन्न सेवन करणे अथवा आपल्या मातेशी संभोग करणे) यातले प्रत्यक्षात स्वप्न काहीही करीत नाही. म्हणजे व्यक्तीने आपल्या मनात आपल्याला ज्या कृतीतून जे प्रत्यक्ष सुख मिळेल त्यातले ह्या व्यक्तीला काहीही मिळत नाही. ही वस्तुस्थिती जर आहे तर त्या सामर्थ्यशाली इच्छेचे समाधान कसे होते? व्यक्तीला ज्याची भीती वाटते, परंतु ज्या गोष्टीबद्दल आपण इच्छा वा वासना करीत नाही अशांचे प्रतिक असणाऱ्या सर्वसाधारण अनामिक भीती-हुरहूर (Anxiety) अशा स्वरूपांच्या स्वप्नांचे काय?

अबोध मनात ज्या इच्छांना जबरदस्तीने हाकलवून देण्यात आलेले असते त्यांची पूर्ती झाली की, एकाद्याला पडलेल्या स्वप्नात जो आशय असतो, त्याचा हिशोब नेहमीच चुकता होतो, अशी फ्राईड यांची श्रद्धा वरील छेदकात उपस्थित केलेल्या प्रत्येक प्रश्नामागे आहे. थोडक्यात सुरुवात अशी करता येईल. स्वप्नांचा आरंभ झोपेतून होतो. झोपेची इच्छा हे स्वप्नांचे कारण. व्यक्तीच्या मनात उद्‌भविलेल्या इच्छांची परिपूर्ती करण्याचे साधन या स्वरूपात स्वप्ने, फॅन्टसीच्या (अद्‌भुतच्या) मार्गाने ही परिपूर्ती घडवून आणते. असे असले तरी अगदी उत्कटपणे व उघडपणे जाणणावरी अनामिक इच्छा भीती / हुरहूर अंतर्भूत असलेल्या स्वप्नामागे अबोध मनात हद्दपार गेलेल्या इच्छा असल्याच पाहिजेत. परंतु फ्राईड प्रणित सिद्धांतानी केलेल्या प्रतिपादनानुसार वा त्यांच्या दाव्या (Claim) नुसार यापैकी एकही शक्य कोटीतली नाही. याची कारणे साधी व सरळ आहेत. आपणापैकी अनेकजण निश्चितपणे 'स्वप्न' न पडता आजवर जगत आलो आहोत. म्हणजेच आपली झोपमोड होऊ नये यासाठी स्वप्नांची आवश्यकता असतेच असे नाही. यदाकदाचित असलीच तर ती फार किरकोळ स्वरूपाची. याचा अर्थ असा आहे की, एखादी व्यक्ती इच्छापूर्तीच्या संबंधात काही प्रकारची हेतू विरहीत स्वप्ने पहात असते. स्वप्ने ही मानव तनदुरुस्त रहावा यासाठी आवश्यक असतीलही.



अनुक्रमणिका

परंतु व्यक्तीच्या निद्रावस्थेचा भंग होऊ नये यासाठी त्यांची आवश्यकता नाही. स्वप्नाकरवी आपली इच्छापूर्ती करून घेता येते असे समजणेही विलक्षण आहे. समजा मला भूक लागली असल्याकारणाने मी भरपेट जेवणं घेत आहे असे दिवास्वप्न पडल्याने माझी भूक भागणार नाही. याउलट ती भूक अधिक उद्दिपत होण्याची शक्यताच अधिक. लैंगिक स्वरूपाची दिवास्वप्ने पाहिल्याने लैंगिक इच्छापूर्ती होण्याऐवजी ती वासना जोरदारपणे वळावते असाच अनुभव येत नाही का? इच्छापूर्ती झाली आहे असे स्वप्न पडणे, म्हणजे (आपल्या स्वप्नात) आपली इच्छापूर्ती झाली आहे असे नाही. हेच वेगळ्या भाषेय सांगावयाचे झाल्यास मी भगवान श्रीकृष्ण आहे असे मला स्वप्न पडणे म्हणजे मी भगवान श्रीकृष्ण झालो असे होत नाही.

अनेक स्वप्ने ही अगदी अर्थातच उघडपणे इच्छापूर्ती करणारी नसतात. ही वस्तुस्थिती असताना, सर्वच स्वप्ने ही इच्छापूर्ती करण्यासाठी पडतात यावर भर का बरे देण्यात येतो? या अशा प्रकारे ठोसपणे भर देण्याचे पर्यवसान अवोध स्वरूपी इच्छांची, स्वप्नातील गोष्टी कशाचे प्रतिक आहेत आणि तत्सम इतर गोष्टींची शोधशोध करण्यात होतो. याउलट काही स्वप्ने ही जाणिवेतील इच्छांचे प्रतिक असतात आणि काही आपणास ज्या भयांची भयावह गोष्टींचे भान असते त्यासंबंधी असतातच असे सरळपणे का मान्य करू नये. विशेष करून जे कोणी तथाकथित फ्राईड अभ्यासक व त्यांचे शार्गिद वा त्यांचे ढोलवडवे नाहीत त्यांना आपण शालेय परीक्षातून चांगल्या प्रकारे उत्तीर्ण झालो आहोत आणि काही ठिकाणी आपणास अपयशही आलेले असते, अशा प्रकारची स्वप्ने अनेकांना पडतीलही. अशा प्रकारची स्वप्ने ज्या कोणास पडतात त्यांच्या दैनंदिन आयुष्याशी आणि त्यांच्या पूर्वाष्युतात आलेल्या अनुभवाशी त्या स्वप्नांचे काय नाते असते? हे कधींच तितकेसे स्पष्ट नसते. उदा. एखादी शालेय परीक्षा अनेक वर्षापूर्वी होऊन गेलेली असते. पण या परीक्षेत उत्तर पत्रिका लिहिताना आपण काहीतरी गफलत केली आहे म्हणजे त्याचे असे असेल का आपण एका अनामिक भीती-हुरहूर अशा (Anxiety) मानसिक अवस्थेत असतो. ही अवस्था पूर्वाष्युतील तशाच एखाद्या अवस्थेबरोबर जुडली जाते का?

अनेक स्वप्नांचा अर्थ लागत नाही व ती गोंधळात टाकतात हे खरे आहे. परंतु ही स्वप्ने दडपल्या गेलेल्या इच्छांचा पुरावा आहेत असेच मानलेच पाहिजे का? तसे मानले नाही म्हणजे मग इच्छापूर्ती करून झोपमोड होऊ दिली जात नाही हेच स्वप्नांचे कार्य आहे हा सिद्धांत आपणास सोडून द्यावा लागेल, हे ओघानेच आले. परंतु हे करीत असताना फ्राईड यांच्या सिद्धांताऐवजी एका सरळ व साध्या सिद्धांताची मांडणी आपण केली नाही आहे का? साध्या, सरळ व स्पष्ट अशा अनामिक-भीती-हुरहूर (Anxiety) व्यक्त करणाऱ्या स्वप्नांना फ्राईड आपल्या सिद्धांताकरवी त्या सर्व स्वप्नांवर त्यांच्यात जी मानसिक एकता नाही ती लादू पहातात.

फ्राईड यांच्या सिद्धांत मान्य केला तर दुसरेही अनेक प्रश्न उपस्थित होतात. उदा. मानसिक

स्वरूपाची दडपशाही करणारी यंत्रणा मनुष्य जेव्हा जागृतावस्थेत असतो, तेव्हा चांगलीच कार्यक्षम व बलशाली असते. पण व्यक्ती निद्रेच्या आधीन असताना ती फारच कमकुवत का बरे होते? व्यक्तीच्या मनातील कार्यक्षम व बलदंड अशी मानसिक दडपशाही करणारी यंत्रणा अबोध मनातील विचारांना, हेतूंना व्यक्तीच्या जाणिवेत प्रवेश होऊ न देण्यासाठी सर्व मार्ग रोखून धरतील आणि त्याना जाणिवेत प्रवेश करू देणार नाहीत अशी अपेक्षा आपण करावयास हवी. परंतु व्यक्ती निद्रावस्थेत असताना ही दडपशाही यंत्रणा अत्यंत गुढपणे आपली पोलादी पकड गमाविते आणि व्यक्ती जागृत असताना कार्यक्षम व बलशाली असलेल्या यंत्रणेने सामान्यपणे, जे विचार व हेतू दडपून टाकून त्यांना व्यक्तीच्या जाणिवेत प्रवेश करू दिला नसता त्याना मुक्तद्वार देते. म्हणजे, त्याचे असे आहे असे समजावयाचे का 'कोतवाल' ही व्यक्ती सुद्धा निद्रावस्थेत आहे. संधी घेऊन कामचुकार नोकराप्रमाणे तो देखील झोपी जातो. असे झाले म्हणजे मग या कोतवालाने सामान्यपणे ज्या विचाराना, इच्छाना, हेतूंना त्याने रोखले असते त्यांच्याकडे दुर्लक्ष करून, त्यांना वाट मोकळी करून देतो असे मानावयाचे का?

वरील छेदकात ज्या प्रश्नांची चर्चा आपण करीत आहोत ते का बरे निर्माण झाले? त्याचे एकमेव कारण असे आहे की फ्राईड असे गृहित धरतात की, **प्रत्येक स्वप्नामागे एखादी अतृप्त इच्छा असलीच पाहिजे,** हे सूत्र त्यांनी गृहित धरल्याकारणाने, ते सूत्र उभे राहण्यासाठी त्यांनी आणखी काही सूत्रे गृहित धरावी लागतात. उदा. मानवी जाणिवेत नसलेल्या पण स्वप्नांच्या आशयात काही प्रमाणात आविष्कृत झालेल्या अबोध मनातील इच्छांचे अस्तित्व त्यांना गृहित धरणे भागच पडते. वस्तुस्थिती अशी नाही आहे की, स्वप्ने आपणास अटळपणे, अबोध मनाच्या संकल्पनेकडे आपणास घेऊन जातात. परिस्थिती नेमकी उलटी आहे. प्रत्येक स्वप्नामागे, हेतूप्रवण इच्छा असते ही गोष्ट ज्या व्यक्तीस स्वप्न पडलेले असते, तिला स्पष्टपणे ज्ञात असेल वा नसेलही. परंतु एकदा आपण हे सारे गृहित धरले म्हणजे मग अबोध मनाची संकल्पना आपणावर जबरदस्तीने लादणे फ्राईड यांना सोईचे जाते. व्यक्तीस एखादे अनामिक- भय-हुरहूर निश्चित (Anxiety) व्यक्त करणारे स्वप्न पडते. ते स्वप्न कोणी आहे तसे स्विकारले म्हणजे त्या व्यक्तीस ज्याविषयी अनामिक भीती-हुरहूर अशी एखादी गोष्ट त्या स्वप्नातून आविष्कृत होत असते. उदा. ती व्यक्ती परीक्षेतून उत्तीर्ण होणार का? अशा स्वरूपात सरळ- सोटपणे स्विकारली म्हणजे मग त्या स्वप्नाचा अन्वयार्थ लावण्यासाठी, त्यावर भाष्य करण्यासाठी, कोणासही **अबोध-मन** या **संकल्पनेची** आवश्यकता नाही. जागृतावस्थेत तसेच निद्राव्यस्थेतही व्यक्तीचे मन हे नेहमीच भयाच्या भक्षस्थानी असते. या सर्व विवेचनाचा निष्कर्ष असा आहे की, व्यक्तीच्या जाणिवेत नसलेली पण तिच्या अबोध-मनात हद्दपार करून दडविलेल्या इच्छेची परिपूर्ती करण्याचे साधन या स्वरूपात अनामिक-भय-हुरहूर असलेली स्वप्ने हा मार्ग खचितच नाही. व्यक्तीच्या मनावर त्या घडलेल्या स्वप्नाच्या काळात प्रभुत्व गाजवित असणाऱ्या अनामिक वा प्रत्यक्ष भीतीचे प्रतिकरूप ती स्वप्ने असतात.

स्वप्नांचा विचार करताना मानवा व्यतिरिक्त इतर प्राण्यांना पडणाऱ्या स्वप्नांचाही विचार प्रस्तुत आहे. यांचे कारण डार्विन यांनी प्रतिपादलेल्या उत्क्रांतीवाद हा सिद्धांत फ्राईड यांना मान्य होता. एवढेच नव्हे तर ते त्यांचे चहाते होते. म्हणजेच बालपणी मनात उद्‌भविलेल्या लैंगिक वासना वा इच्छा दडपून टाकण्याचा भाग हा प्राण्यांच्या स्वप्नातही अंतर्भूत आहे, असे गृहित धरले पाहिजे. असे केले म्हणजे मग आणखी वेगळाच निष्कर्ष निघतो. या प्राण्यांच्या जाणिवेतही काही इच्छा असतात. त्या सर्व अद्‌भुतपणे परिपूर्ण झाल्या आहेत अशी स्वप्ने त्यांना पडतात असे म्हणावे लागेल. वस्तुस्थिती फारच वेगळी आहे. एकाद्या झोपी गेलेल्या कुत्र्याच्या उदाहरणावरून हा मुद्दा स्पष्ट होईल. त्याच्या वागणूकीतून हे उघडपणे दिसून येते. समजा या कुत्र्याच्या मनात अनामिक भीतीची भावना कसल्यातरी गोष्टीमुळे निर्माण होते. त्या गोष्टीबद्दल त्याला स्वप्न पडलेले आहे. म्हणजे तो कुत्रा त्याला पडलेल्या स्वप्नात, आपल्या अबोध मनात दडपून टाकलेली एखादी इच्छा तृप्त करून घेत असतो. शिवाय त्या कुत्र्याला पडलेल्या त्या स्वप्नातील आशयातून, अबोध मनातील ती विशिष्ट इच्छा उघड झालेली आहे असे गृहित धरणे सरळपणे व स्पष्टपणे मूर्खपणाचे आहे. येथे मुद्दा हा आहे की या कुत्र्याच्या उदाहरणावरून असे सिद्ध होत नाही का जो न्याय त्या कुत्र्याच्या स्वप्नाला देणार तो मानवी स्वप्नांना का बरे द्यावयाचा नाही. डार्विनच्या उत्क्रांतीवादाचा उल्लेख या छेदकाच्या सुरुवातीलाच केला आहे. त्याचे स्मरण करावे. आणखी एक मुद्दा विवेचनाच्या या स्थळी लक्षणीय आहे. स्वप्ने ही प्रकृतीने भिन्न असतातं. हा मुद्दा मान्य केला की मग **'अबोध मनाची'** संकल्पना त्याबरोबरच अंतर्धान पावते. म्हणजेच फ्राईड यांच्या प्रतिपादनाप्रमाणे वा सिद्धांतानुसार संबंधित असलेली अबोध मनाची संकल्पना आणि तिच्या अनुस्यूत असलेली मानसिक दडपशाही करणारी कोतवाली यंत्रणा या गोष्टीदेखील आपोआपच नाहीशा होतात. याचे कारणही साधे व स्पष्ट आहे. स्वप्ने ज्या कोणास पडतात त्या स्वप्नातून अबोध मनाची संकल्पना व तिच्यात अनुस्यूत असलेली 'दमन-यंत्रणा' फ्राईड अभ्यासक व त्यांचे शार्गिद यांच्याशिवाय इतरांनी स्विकाराहर्य समजावी अशी जबरदस्ती करणारा आग्रह धरण्याला व त्याला योग्य तो पुरावा देणारे त्या स्वप्नात काहीही नाही म्हणूनच वैज्ञानिक फ्राईड यांच्या या नवनिर्मितीस 'are myths that lack objective standing' असे म्हणतात. या विषयाशी संबंधातील (खुद्द) फ्राईड यांच्याबद्दलची एक आठवण अत्यंत बोलकी आहे. फ्राईड यांच्या (तथाकथित) सिद्धांताचे अभ्यासक **जॉन फॉड्रेस्ट** यांनी आपल्या 'पोट्रेट ऑफ ए ड्रीम रिडर' (स्वप्ने वाचणाऱ्याचे (शब्द) चित्र) या लेखात नमूद केली आहे. फ्राईड यांच्याकडे एक मनोऋण स्त्री उपचार करून घेण्याकरिता आली होती. तिने फ्राईड यांना असे सांगितले की, तिला एक विशिष्ट गोष्ट काहीही झाले तरी टाळावयाची आहे. तिला या गोष्टीबाबत अनामिक भय-भीतीदर्शक (Anxiety) स्वप्न पडले. आपल्या मनाच्या वस्तुस्थितीची पूर्ण जाणीव असल्याकारणाने ती स्त्री फ्राईडना म्हणाली, "तिचे स्वप्न हे अनामिक भीतीदर्शक (Anxiety)



अनुक्रमणिका

असल्याकारणाने स्वप्ने **ही इच्छापूर्ती करण्यासाठी पडताच हा फ्राईड यांचा सिद्धांत चुकीचा आहे.** "फ्राईड यांनी या स्त्रीला उत्तर देताना असे सांगितले की 'माझा (फ्राईडचा) सिद्धांत चुकीचा आहे हे ठरविण्यासाठीच तिला ते स्वप्न पडले. याचे कारण फ्राईड यांना बेचैनी निर्माण करण्याची इच्छा तिच्या 'अबोध-मनात' होती व फक्त ती तिच्या जाणिवेत नव्हती." आता बोला ! फ्राईड व मार्क्स या दोघांनी मांडलेले सिद्धांत, या कविकल्पनाच होत्या. त्यांना वैज्ञानिक पाया नव्हता, म्हणूनच त्यांचा विज्ञानात समावेश करता येणार नाही असे ठोसपणे नमूद करून त्याचे विवेचन कार्ल पॉवर या प्रख्यात तत्त्वज्ञाने व नोबेल पारितोषिक विजेते, वैज्ञानिक पिटर मेडावर, या दोघांनीही प्रतिपादलेले आहे. कोणत्याही वैज्ञानिक स्वरूपाचा सिद्धांत चुकीचा ठरविण्यासाठी त्या सिद्धांतातच व्यवस्था असणे आवश्यक आहे हे सूत्र फार ठोसपणे कार्ल पॉपर प्रतिपादीत असत. फ्राईड यांच्या सिद्धांतात (?) अशी व्यवस्था नाही. थोडक्यात फ्राईड जे काही सांगत होते ते विज्ञान नसून, तो साहित्यिकांना कवींना किंवा फ्राईडचे नाव घेऊन आपण काहीतरी समाजाला हलविणारे सांगत आहोत अशा तथाकथित सत्यशोधक वा विचारवंतांना मोहक वाटणारा वा भुलविणारा कल्पना विलास होता. पिटर मेडावर यांचा उल्लेख यापूर्वीच आला आहे. ते जीवशास्त्रातील नोबेल पारितोषिक विजेते. त्यांनी असे जाहीरपणे लिहिले आहे की, गेली दीडशे वर्षे We were under the influence of two big Frauds - Freud and Marx - of the century.

हे विधान केल्यानंतर कोणाही नामवंत व बुजूर्ग फ्राईड प्रेमी मि. पिटर मेडावरना जाऊन भिडला नाही. मग गल्लीबोळातील 'फ्राईड कालवाह्य' होणार नाही असे म्हणण्याऱ्या तथाकथित अभ्यासकाना विचारातही घेण्याचे कारण नाही. मि. पिटर मेडावर यांना जाऊन भिडण्याची हिम्मत कोणाला झाली नाही याचे कारण मि. पिटर मेडावर हे आपल्या शास्त्रातील नामवंत संशोधक होतेच. शिवाय त्यांची लेखणीही चांगलीच धारदार. आर्थर कोईस्लरसारख्या लेखकाला त्या लेखणीचा प्रसाद मिळालेला आहे. कॉर्ल पॉपर यांच्या विवेचनाचा ममितार्थ थोडक्यात असा आहे. (या ठिकाणी फक्त फ्राईडच प्रस्तुत आहेत.) फ्राईड आपल्याकडे आलेल्या मनोऋग्णाशी बोलून त्याच्या मानसिक रोगाचे निदान करीत. त्यांनी ऋग्णाला सांगितले की, तुला अमूक अमूक रोग झालेला आहे. यावर त्या ऋग्णाचे प्रतिवाद केला तर फ्राईड महाशय त्याला सांगणार तू हा प्रतिवाद करीत आहेस याचे कारण तुला त्याच रोगाने ग्रासलेले आहे. तुझ्या मनाला हे जाणवलेले आहे, याच कारणामुळे प्रतिवाद करीत आहेस. फ्राईड महाशयांचे निदान स्विकारले तर फ्राईड यांचा सिद्धांत हा बरोबरच होता असे ठरते. थोडक्यात छाप-काट्याच्या खेळासारखा हा युक्तीवाद आहे. छाप पडला तर मी जिंकलो आणि काटा पडला तर तू हरलास या स्वरूपाचे हे प्रतिपादन आहे. म्हणूनच कॉर्ल पॉपर म्हणतात, फ्राईड यांनी मांडलेल्या सिद्धांतात तो चुकीचा ठरविण्याची व्यवस्था नाही. फ्राईड अभ्यासक **जॉन फॉड्रेस्ट** यांनी वाचकांच्या निदर्शनास आणलेली घटना, कॉर्ल पॉपर यांचे म्हणणे किती यथार्थ होते हे

सिद्ध करते. ते असो. परंतु व्यक्तीच्या जाणिवेत नसलेल्या इच्छापूर्तीचे प्रतिनिधित्व करणारी स्वप्ने नेहमीच करतात, हा सिद्धांत किती बरोवर हे पटवून देण्याच्या कामात फ्राईड महाशयानी वैज्ञानिकाना मान्य असलेला मार्ग अंगिकारला नव्हता हे स्पष्ट आहे.

फ्राईड यांनी मांडलेली 'अवोध मना'ची संकल्पना व जाणीव निर्माण होण्यापूर्वीची जाणीव. 'पूर्व मानसिक अवस्था' यात गल्लत करता कामा नये. फ्राईड जाणीवपूर्व अवस्था हा शव्द वापरतात पण तो त्यांना अभिप्रेत असलेल्या एक विशिष्ट अर्थाने. 'स्मरणे' या शव्दाने आपणास अभिप्रेत असलेल्या घटना व प्रक्रिया या येथे – याठिकाणी सध्या आपल्या मनात नसतात (Here and Now). परंतु आपण जर तशी इच्छा केली तर त्यांची आठवण आपणास होते. फ्राईड यांची 'जाणिव-पूर्व' अवस्था या संकल्पनेची ती व्याख्या आहे. त्याचबरोवर विद्यमानकालीन मनोवैज्ञानिकानी याच अवस्थेवद्दल संकल्पना मांडलेल्या आहेत. पण त्यांचे स्वरूप सर्वस्वी वेगळे आहे. एवंच फ्राईड व त्यानी वापरलेला शव्द एकच आहे; म्हणून त्यांच्यात गल्लत होते. विज्ञान क्षेत्रातील काही विभागांचा coqnitive sciences असा उल्लेख केला जातो. Coqnition या इंग्रजी शव्दाचा अर्थ, भावना व इच्छा विरहित ज्ञान. म्हणून आपण त्या विज्ञानास 'निरपेक्ष विज्ञान' या नावाने संवोधूया. जाणिवेत हजर नसलेल्या काही गोष्टीवर जी मानसिक प्रक्रिया होते. त्यावद्दल या विज्ञान क्षेत्राला दिलचस्पी आहे. या प्रक्रियेचे वर्णन पुढीलप्रमाणे करता येईल. उदा. प्रकाश व अंधार यांचे अनेक आकृतिबंध आपण पहातो. आपल्या बुद्धीला पटेल समजेल अशा स्वरूपाच्या प्रतिमात आपण त्यांचे रूपांतर करतो जाणिव-पूर्व अवस्था (Preconscious) या शव्दामुळे ही अडचण निर्माण झालेली आहे ! कविमनाचे, चतुर पण **अ-वैज्ञानिक** असे फ्राईड व जीवशास्त्र या ज्ञान शाखेतील 'निरपेक्ष-विज्ञान' या विभागात काम करणारे वैज्ञानिक हा एकच शव्द वेगवेगळ्या अर्थाने वापरतात. त्यामुळे इंग्रजी भाषेत सांगावयाचे झाल्याचे Semantic Consfusion होते. कोणत्याही भाषेत एकाच शव्दाचे भिन्न संदर्भात वेगवेगळे अर्थ असतात. पण शव्द एकच. त्यामुळे गोंधळ-गैरसमज निर्माण होण्याची शक्यता असते. थोडक्यात शव्दार्थामुळे गोंधळ (Semantic Confusion) सर्व प्रकारच्या मानसिक व्यापारात, जाणिवेत नसलेल्या मानसिक प्रक्रिया नेहमीच कार्यरत असतात. आपण जे काही बोलतो / संभाषण करतो. त्या विषयीच्या जाणिव-पूर्वक केलेल्या समजुतीचे उदाहरण घेऊया. या संदर्भात अनेक लाल निशाणी व उदार-मतवादी डाव्याना प्यारे असलेल्या **'नोओम चोमस्की'** या भाषातज्ज्ञाने अत्यंत ठोसपणे जे प्रतिपादन केले आहे, ते विचारात घेऊया. त्यांचा युक्तीवाद मनाला पटणारा व मान्य होईल असाच आहे. प्रत्येक भाषेच्या व्याकरणाचे काही नियम असतात. त्यांचे प्रतिनिधित्व करणारी एक अत्यंत वरच्या दर्जाची सुस्थापिता संरचना पद्धती (Highly structured system) आपल्या डोक्यात सदैव हजर असते. आपण ज्यांच्यावद्दल जाणिवपूर्वक जागृत नसतो अशा प्रकारच्या प्रक्रियांच्याद्वारा, आपली स्मरण-यंत्रणा कार्यरत असते. हे झाले **'नाओम चोमस्की'**

यांचे प्रतिपादन. **परंतु या प्रकारच्या जाणिवेचे भान नसलेल्या ज्या प्रक्रिया आहेत, त्या फ्राईड यांची अबोध-मनाची जी संकल्पना आहे. तिच्यापेक्षा भिन्न आहेत हे खास करून लक्षात ठेवले पाहिजे.** कार्यक्षमतेने दडपून टाकलेल्या इच्छा, स्मरणे आणि भावना ज्या पद्धती अकरणात्मकतेने (negative effect) भारलेल्या म्हणजे फ्राइड यांच्या मते या ना त्या प्रकारच्या भावनात्मक अशा कमालीच्या वेदना व दुःख यानी फ्राईड यांच्या अबोध-मनाच्या संकल्पनेचा हा अत्यंत महत्वाचा व आवश्यक असा भाग. आपणास मानसिक दडपशाही या कल्पनेची इतकी सवय झाली आहे की, ती एक चांगली सुस्थापित अशी यंत्रणा आहे, असे गृहित धरण्याची प्रवृत्ती आपण प्रकट करतो. परंतु वस्तुस्थिती फारच वेगळी आहे. ती यंत्रणा अडचणींनी अगदी परिपूर्णपणे भरलेली आहे.

आपल्या भावना, वासना अगर इच्छा आपले मन दडपून टाकते. या मानसिक वस्तु-स्थितीचा आपणा सगळ्यांनाच चांगला परिचय आहे. अशा प्रकारे त्या सर्व गोष्टी निष्क्रिय केल्या जातात. पण हे केव्हा घडून येते? काही वेळा आपणास एखादी इच्छा होते. ती अगदी जाणिवपूर्वक झालेली असते. पण त्याचवेळी त्या इच्छेची परिपूर्ती होऊ नये असे आपणास वाटत असते. खरे म्हणजे आपणास त्यावेळी असेही वाटत असते की, ही जी इच्छा आपण करतो ती आपण करताच कामा नये. हे सगळे तसे फारच गुंतागुंतीचे वाटणारच. एका उदाहरणावरून हा मुद्दा स्पष्ट करण्याचा प्रयत्न करतो. समजा आपले वजन एकसारखे वाढत असल्याकारणाने आपण स्वत:वर काही निर्बंध घालून घ्यावयास हवेत हा विचार पटलेला असतो. पण आजवरच्या खाण्याच्या आवडी आपणास दुसरीकडे खेचत असतात. आंब्याचे वा सिताफळांचे आईस्क्रिम मनसोक्त चापावे असे एकीकडे वाटते. परंतु आपल्या शारीरिक अवस्थेच्या सद्यस्थितीत आपण अशी इच्छा मनात येऊ देता कामा नये हे पटलेले असते. नेमक्या अशा अवस्थेत आपले मन त्या 'मानसिक दडपशाही'च्या आहारी जाते. या प्रकाराची आपणा सर्वांस चांगलाच परिचय आहे. **परंतु या सर्व प्रक्रियेत आपल्या जाणिवेत त्यातले काहीच नसते असे नाही.** आपणास हे ज्ञात असते की आपण ही इच्छा (आंब्याचे आईस्क्रिम चापावे) करतो. तसेच आपण अशी इच्छा का करू नये हेही आपणास ज्ञान असते. एवंच आपण ही इच्छा जाणिवपूर्वक दडपून टाकण्याच्या तयारीस लागतो. थोडक्या प्रत्यक्ष कृतीपासून (आईस्क्रिम चापणे) त्या इच्छेची फारकत करतो. या अशा प्रकारे बुद्धीपुरस्सरपणे इच्छांच्या केलेल्या 'मानसिक दडपशाही'च्या घटनांनी कोणाचेही मानसिक आयुष्य दुथडी भरून वहात असते. परंतु फ्राईड प्रणित जी मानसिक दडपशाहीची संकल्पना आहे, ती या ठिकाणी केलेल्या विवेचनास अजिबात मिळती-जुळती नाही. फ्राईड महाशय आपणास वारंवार असे बजावितात की, ही 'मानसिक दडपशाही' ही जाणिवपूर्वक केलेली नसते. फ्राईड यांच्या तथाकथित सिद्धांत सारांशाने पुढील शब्दात व्यक्त करता येईल. एकादी इच्छा वा स्मरण हे सुखदाई वाटत नसेल, लज्जास्पद वाटत असेल अगर आपल्या ज्या दुसऱ्या काही अन्य इच्छा असतील त्यांच्याशी

त्या इच्छेचा संघर्ष असला तर आपण काय करतो? फ्राईड यांच्या म्हणण्यानुसार आपल्या डोक्यात / मनात एक यंत्रणा आहे. ही यंत्रणा आपणास या अशा प्रकारच्या 'मानसिक अवस्था' आपल्या जाणिवेत येणार नाहीत अशी व्यवस्था करते. काही वेळा नव्हे तर बहुतेक वेळा ही सर्व कार्यवाही आपण अजाणता करतो. याचे साधे व सोपे फ्राईड प्रणित कारण असे आहे की, आपणास सुखदायक न वाटणारी किंवा दु:खदायक वाटणारी मानसिकता आपल्या जाणिवेतून हद्दपार व्हावी. किमान-पक्षी ती दूर रहावी अशी व्यवस्था मानवी मनात आहे.

परंतु या कवि-कल्पनेचा वा संकल्पनेचा अधिक तपशीलात जाऊन विचार केला असता, ती कवि-कल्पना / संकल्पना आपणास फारच बुचकळ्यात वा गोंधळात टाकते. प्रथन दर्शनी– म्हणजे त्याचे असे आहे. ज्या इच्छा, स्मरणे आपणास असुखद, दु:खकारक, लज्जास्पद वाटतात या सर्व गोष्टी एखाद्या नियमावलीनुसार या फ्राईडप्रणित 'मानसिक दडपशाहीचे' भक्ष्य बनतात ! आपणा सर्वांकडे दु:खकारक वाटणारी स्मरणे असतात आणि लज्जास्पद ठराव्यात व आपणास वाटतील अशा इच्छाही आपण करतो. या सर्वांबद्दल आपल्या मनाला सातत्याने जाणीव असते. इतकेच नाहीतर त्यांची आपल्या मनाला सदैव टोचणी असते. फ्राईड यांच्या सिद्धांतानुसार यातील **काहींवर** 'मानसिक दडपशाही' केली जाते आणि **काहींवर** केली जात नाही ! हा असा भेदभाव का होतो? याचे उत्तर चमकदार वाक्ये व कल्पनाविलास करणारे फ्राईड काय देतात. त्यांचे उत्तर तो नकारात्मक परिणाम आहे (negative effect) हेच आहे. परंतु हे स्पष्टीकरण नाही कल्पना विलास आहे. फ्राईड यांचे दादर येथील अभ्यासक वा त्यांचे शार्गिद हे देखील– अर्थात ते सामान्य तर्कशास्त्रानुसार विचार करीत असतील तर – त्यांनाही मान्य होण्यास अडचण पडू नये. मी माझ्या पुरतेच बोलावयाचे झाल्यास मी देखील या माझ्या स्वत:च्या आयुष्यातील अशा प्रकारच्या घटनाबद्दल आत्मसंशोधन करतो. या सर्व प्रकारचा मानसिक दु:ख, असुखाची भावना निर्माण करणाऱ्या मानसिक अवस्था मलाही अनुभवाव्या लागतात. परंतु या अवस्थाना माझ्या जाणिवेत येऊ न देणे मला सर्वस्वी अशक्य आहे याची खात्री पटते. मी मनात म्हणतो, फ्राईड सांगतात त्याप्रमाणे तसे शक्य झाले असते तर !

विशेष करून लहान मुले ही भावना वा इच्छांबद्दल 'दडपशाही'ची कृती करण्याकरता फारच कुशल असतात असे फ्राईड **गृहित** धरतात. माझ्यासारख्या उतार वयात असलेल्या व्यक्तीला जी कृती करण्याची क्षमता नसते. पण अशी कृती अगदी सहजपणे करण्याचे कौशल्य लहान मुले कसे काय हस्तगत करतात? वयात आलेली व्यक्ती सामान्यपणे नेहमीच आपल्या मानसिक आयुष्यावर अधिक चांगले नियंत्रण ठेवीत नाही का? आता हे खरे आहे एकेकाळी मला जे ज्ञात होते. त्यातील बहुतेक सारे मी विसरलो आहे. परंतु मी माझी एकही इच्छा वा स्मरण फ्राईड सांगतात त्या अर्थाने दडपून टाकल्याचे मला ज्ञात नाही. असे निवेदन करताना मी सत्यालाप करीत नाही आहे. माझ्या स्मरणात स्पष्टपणे मला दिसणाऱ्या अनेक रिकाम्या जागा आहेत. अगर माझ्या व्यक्तिरित्य माझ्या परिचितानी सादर केलेल्या निवेदनावरून मी

**हेतूपुरस्सर** काही विसरलो आहे याबद्दल काहीही पुरावा नाही. या माझ्या विधानाबद्दल फ्राईड भक्त असे म्हणतील हे विधान मुळ मुद्याला हातच घालीत नाही. एखाद्याचे 'मनोविश्लेषण' तेही तज्ज्ञ मनोविश्लेषकाकडून झाल्याशिवाय जी स्मरणे वा इच्छा दडपली गेली होती वा आहेत ती परत स्मरणात येतच नाहीत ! (गमतीचा भाग असा की खुद्द फ्राईड यांनी स्वत:चे मनोविश्लेषण करून घेतले नव्हते हा भाग हे शार्गिद सोईस्करपणे विसरतात) परंतु हा 'दडपून' टाकण्याचा प्रश्न हा वाटतो तितका सोपा नाही. मी एखादी गोष्ट साफ विसरतो. ती विसरलो याचे भानही मला नसते. परंतु एखादी गोष्ट मला खरोखरच आठवत नसते. एखादे नाव, घटना– पण मी ती विसरलो आहे याचे ज्ञान मला असते. विसरणे व त्याचे भान नसणे, विसरणे पण त्याचे ज्ञान असणे या दोन प्रकारच्या विसरण्यात आपण गल्लत करता कामा नये. अनेक प्रकारच्या विस्मृतीबद्दल अप्रत्यक्ष स्वरूपाचा पुरावा असणे हे कोणतीही त्रुटी नसलेल्या शक्यतेत आहे आणि म्हणूनच आपणास काहीतरी 'आठवत' नाही आहे हे आपणास ज्ञात असते. उदा. माझ्या मित्र आणि मी आम्ही दोघांनी एकाच वेळी, एक बोलपट पाहिलेला असतो. परंतु अनेक वर्षे उलटल्यानंतरही माझ्या मित्राला तो प्रसंग चांगला आठवतो आणि मला त्यातले काहीही आठवत नसते. यावर माझा मित्र असे सांगेलही मी तो बोलपट पाहिलेला आहे, याला माझा मित्र साक्ष आहे. पण त्या संबंधीची माझी आठवण पार बुजलेली आहे. म्हणजेच मी हा बोलपट पाहिल्याचे ज्ञान पार विसरून गेलो आहे याचे ज्ञान मला होते.

मला एकच मुद्दा ठोसपणे नमूद करावयाचा आहे. मानसिक दडपशाही मी केल्यामुळे एखाद्या गोष्टीची विस्मृती झाली आहे असे एकही उदाहरण माझ्याबावतीत तरी नाही. कालौघात अनेक स्मरणे वा इच्छा विरून जातात. काहींच्या मानसिक विश्वात ज्या व्यक्तींना वा गोष्टींना जे मध्यवर्ती स्थान असते ते चांगलेच मागे पडते. अमेरिकन म्हणीनुसार **welcome wears off** पण त्या दोन्ही गोष्टी अगदी सुरक्षितपणे मानसिकतेतून दडपून टाकल्या गेल्या आहेत असा त्याचा अर्थ नाही. फ्राईडनी प्रतिपादल्यानुसार 'दडपून टाकतो' ही प्रक्रिया सर्वगामी व सर्वसाक्षी असती तर त्याचा परिणाम काय झाला असता. त्याचे वर्णन पुढीलप्रमाणे करता येईल. समजा माझे 'क्ष' बद्दलचे स्मरण मला फारच तापदायक होते. पण मला सध्या त्याबद्दल काहीही आठवत नाही असे मला अधूनमधून वाटावयास हवे होते... एकेकाळी मला कानडी भाषेचे चांगले ज्ञान होते. पण या घटकेला मला त्यातले फारच थोडे आठवते. वस्तुस्थिती अशी आहे की, जी स्मरणे मला वेदनादायक असतात, ती सातत्याने माझा पाठपुरावा करतात आणि सातत्याने माझा जाणिवेत हजर असतात.

माझ्यापुरते बोलावयाचे झाल्यास माझ्या खास अशा काहीही लैंगिक इच्छा नाहीत. खास म्हणजे नेमके काय? माझ्या मनात ज्या लैंगिक इच्छा न याव्यात या विचारास मी पसंती देईन अशा. म्हणूनच त्या दडपून टाकण्याचा (repress) अथवा पराकोटीला जाऊन सांगावयाचे झाल्यास जागरुकतेतून जाणिवपूर्वक दडपून (Suppressed) टाकण्याचा प्रश्नच उपस्थित



अनुक्रमणिका

झाला नाही. म्हणजे या अशा लैंगिक इच्छांबाबत मी काही केले तर त्यापासून मला परावृत्त करण्याचा वा मला प्रतिबंध करण्याची वेळ आली नाही. भावना, वासना वा इच्छा मनात 'दडपून' टाकणे ही जी फ्राईड प्रणित संकल्पना वा कवी कल्पना आहे ती फारच लोकप्रिय आहे. परंतु ते **मिथ्यक** आहे असे सर्वच मान्यवर वैज्ञानिक सांगतात. या गोष्टी मनात दडपून टाकून त्या हद्दपार करणे हे मिथ्यक आहे. फ्राईड यांच्या सिद्धांताच्या उभारणीत ते गृहित धरलेले आहे. त्यालाच जर काही वैज्ञानिक स्वरुपाचा पुरावा नसून, ते केवळ एक मिथ्यक आहे असे असेल तर फ्राईड प्रणित अबोध-मनाची संकल्पना वा कवी-कल्पना हे सुद्धा मग **मिथ्यकच** ठरते. याचे कारण मनात जे काही दडपून टाकलेले असते त्यांची गोळा बेरीज म्हणजे अबोध-मन अशी त्याची व्याख्या फ्राईड यांनी केलेली आहे. मनाचा हा भाग भावना / वासना / इच्छा यांनी भरलेली एक कढई आहे. ती चांगलीच खदखद असते. पण तिच्यावर असलेले झाकण मात्र किंचित उघडे असते. असे आपली संकल्पना वा कवी-कल्पनेबद्दल विवरण फ्राईड यांनी केले आहे. हे सुद्धा **मिथ्यकच** आहे. याचे कारण जे काही खदखदणे असते, ते चांगले उघड्यावर, सर्वांसमोरच चालू असते. अगदी ते दिसते त्या ठिकाणीच.

यानंतर आणखी एका सखोल अशा संकल्पनात्मक प्रश्नाकडे वळूया. भावना, वासना वा इच्छा याची मनात 'दडपल्या' जातात हे खरे. पण हे 'दडपणे' कोणीही जाणिवपूर्वक करीत नाही. हा मुद्दा अस्तित्ववाद या तत्त्वज्ञानाचे एक महान पुरस्कर्ते प्रख्यात फ्रेंच लेखक सार्त्र यांनी आपल्या Being and nothingness या ग्रंथात विस्ताराने मांडलेला आहे. फ्राईड यांची अशी श्रद्धा होती की, (मनात) दडपशाही करण्यासाठी एक खास यंत्रणा होती. तिला त्यांनी नाव दिले censor 'कोतवाल.' अशा प्रकारच्या अनेक कल्पना, फ्राईड यांनी चौफेर फेकल्या आहेत त्यातलीच ती एक. त्यांच्या इतर सर्व कल्पनाप्रमाणेच या यंत्रणेचे उगमस्थान मानवाच्या Nervous system मध्ये कोठेतरी आहे. असे त्यांचे सांगणे होते. या कोलवालाकडे नेमके काय कोणते? कोणत्या भावना, वासना वा इच्छा त्याने 'दडपून' टाकावयाच्या आणि त्यातील कोणत्याना जाणिवेत प्रवेश द्यावयाचा? ही यंत्रणा ज्यावेळी कार्यक्षम असेल त्यावेळी कोणाही व्यक्तीला पडणाऱ्या स्वप्नांतील आशय नक्की करते. या संबंधात फ्राईड यांनी अगदी पारदर्शकपणे लिहिलेले आहे. ते म्हणतात.

*"आपण. . . अबोध-मनाची ही जी संरचना व पद्धती आहे तिची तुलना एका विशाल स्वागत कक्षाशी करूया. याठिकाणी झालेल्या गर्दीत प्रत्येक व्यक्ती स्वतंत्रपणे आणि अलगपणे धक्काबुक्की करतात. त्यासारखेच मानसिक प्रेरणांचे असते. त्याच प्रकारची त्या धक्काबुक्की करतात. स्वागत कक्षात प्रवेश केल्यानंतर त्याच्या लगतच जे विशाल सभागृह असते, त्याच्या शेजारीच एक दुसरी छोटी खोली असते. . . आरामात बसून गप्पागोष्टी करण्यासाठी राखून ठेवलेली – या खोलीत मानवी जाणीवही वास्तव्य करून असते. परंतु विशाल सभागृहाला व या आराम कक्षाला जोडणारा जो दरवाजा असतो, त्याच्या उंबरठ्यावर पहारेकरी असतो. तो*

*आपली कामगिरी चोखपणे पार पाडतो. प्रत्येक भिन्नभिन्न अशा मानसिक प्रेरणांची तपासणी करतो. 'कोतवाल' त्याच्याकडे सुपूर्द केलेली कामगिरी इमान-इतबारे पार पडत असतो. म्हणजे या पहारेकऱ्याला ज्या प्रेरणा नापसंत होत्या, तसेच ज्या आनंददायी वाटत नव्हत्या त्यांना तो आराम कक्षात प्रवेश देत नाही.''*

याठिकाणी नेमका असा प्रश्न उपस्थित होतो की, आपणास ज्या भावना वासना वा इच्छा दडपून टाकाव्यात असे वाटते त्यावद्दल त्या कोतवालाच्या मनात काहीही जाणीव नसताना हा कोतवाल ही कामगिरी कशी काय करतो? आपल्यासारख्यांना अर्थात फ्राईड भक्त वा त्यांचे शार्गिद वगळून– प्रत्यक्ष जीवनात आढळणारे 'कोतवाल' कसे काम करतात हे चांगले ठाऊक आहे. एक तर कोतवाल कोणाला प्रवेश द्यावयाचा अथवा कोणाला प्रतिबंध करावयाचा यावद्दल चांगलेच जागरुक असतात. परंतु फ्राईड यांनी आपल्या सिद्धांतासाठी निर्माण केलेल्या कोतवालाच्याबाबतीत हे आपले ज्ञान चुकीचे ठरते. फ्राईड यांच्या कोतवालास आपण कशास प्रतिबंध करायचा याचे ज्ञान उपजतच असते. त्याजबरोबर कोणाला प्रवेश द्यायचा नाही हेही त्याला ज्ञात नसते असे फ्राईडनी आपला सिद्धांत मांडताना गृहित धरलेले आहे. एवंच ही मानसिक दडपशाहीची जी संकल्पना / कल्पना आहे तिच्यात सुसंगती अजिबात नाही असे दृष्टोपत्तीस येते. केवळ तर्कशुद्ध विश्लेषणाचा त्या संकल्पनात / कल्पनात असलेल्या अंतर्विरोधाबाबतचे हे प्रतिपादन आहे असे एखाद्यास वाटेल. पण आपण जसाजसा अबोध-मन स्वरूपी 'मानसिक' दडपशाही या संकल्पनेचा / कल्पनेचा अधिक विचार कराल तसतशी ही अबोध-मन स्वरूपी दडपशाही ही अशक्य कोटीतली घटना आहे याची अधिक अधिक खात्री पटेल. आपणास ज्याचे अस्तित्व ज्ञात नाही त्याची मानसिक दडपशाही करणे हे केवळ अशक्य. परंतु आपण जर असे मानले की, त्याच्या अस्तित्वाबद्दल आपल्याला जाण आहे, तर मग ते आपल्या जाणिवेत नाही असे म्हणता येणार नाही. परंतु आपण असे समजू या की, या अबोध मनात काय आहे याबद्दल कोतवालाला जाण आहे व जागरुकता आहे ! असे जर गृहित धरले तर मग असा मुद्दा उपस्थित होतो की, सरतेशेवटी मानसिक दडपशाही कशा करता करावयाची. आपण ती दडपशाही करतो याचे कारण त्या दडपशाहीत अंतर्भूत असलेल्या भावना वरून व त्या इच्छा यांचे ज्ञान होऊ नये व त्याबद्दल जागरुकता प्राप्त होऊ नये यासाठीच करीत असतोना. आणखी एका बाजूने विचार करूया. हा कोतवाल ज्या गोष्टीवर दडपशाही करू इच्छितो ती आपल्यासारख्यांचे संरक्षण करण्यासाठी. या कार्यासाठीच ती दडपशाही करणारी यंत्रणा असते. परंतु हे जर मान्य केले तर मग एक प्रश्न पुन्हा निर्माण होईल. या कोतवालाच्या वर्तनासंबंधीची त्याच्या वर्तनाची कोतवाली कोणी करणारा असतो का? अशा प्रकारे ही साखळी वाढतच जाणार. एवंच अबोध मनाची जी संकल्पना आहे ती कोतवाल या पदाच्या निर्मितीची जी संकल्पना आहे तिच्याशी अजिबात सुसंवादी नाही. म्हणजे फ्राईड प्रणित जी मानसिक दडपशाहीची संकल्पना आहे, तिच्याशीही सुसंगत नाही.



अनुक्रमणिका

परंतु गंमत अशी आहे की, अबोध-मनाची निर्मिती नेमकी कशाने होत असेल तर ती मानसिक दडपशाहीमुळे. ही दडपशाही नसेल तर फ्राईड प्रणित अबोध-मन अस्तित्वात येणे शक्य नाही. परंतु 'जाणीव' ही दडपशाहीत अनुस्यूत आहे. थोडक्यात अबोध-मन या संकल्पनेत अंतर्विरोध आहे. जाणीव-दडपशाही-अबोध अशी ती साखळी आहे. जाणिवेतून-दडपशाही त्यातून अबोध मनाची निर्मिती यावर कोणी फ्राईड भक्त असा युक्तिवाद करील की 'कोतवाल' आणि 'आत्मपिंड' (Ego) हे दोन घटक वेगळे मानून आपणास या संकल्पेतील अंतर्विरोध दूर करता येईल. म्हणजे त्याचे असे की, आपण कोणत्या भावना, वासना व इच्छा दडपून टाकत आहोत याची जाणीव कोतवालाला असते ! पण ती आत्मपिंडाला (Ego) नसते. कोतवाल आणि आत्मपिंड या दोघांना अलग करून या संकल्पनेतील अंतर्विरोधातून निसटता येईल. (पण असे करताना आणखीन अंतर्विरोध निर्माण होतात त्याचे काय? तो मुद्दा वेगळा आपण तो वाजूस ठेवूया) पण तसे निसटता येत नाही याचे साधे कारण असे आहे की, हा 'कोतवाल' हा आत्मपिंडाच्या चाकरीत असतो. म्हणूनच आत्मपिंडापासून या कोतवालाला अलग करता येत नाही. काहीही झाले तरी व्यक्तीला अरुचीच्या वाटणाऱ्या अवस्था या कोतवालाला सहन कराव्या लागणार असतील, तर मग 'आत्मपिंडा'चे संरक्षण करण्यात काय मुद्दा आहे. याशिवाय या सर्व घटापटाला आपण आणखी एका विचित्र सिद्धांताला सामोरे जावे लागते. प्रत्येक व्यक्तीकडे कित्येक Humanular छोट्या मानवी जाणिवेची अनेक केंद्रे आहेत अशी प्रकृती आहे असा तो सिद्धांत आहे.

परंतु ही सारी बौद्धिक स्वरूपाची चलाखी करूनही 'दडपशाही' ही संकल्पना चुकीची ठरण्याचा संभव राहतोच. खुद्द फ्राईड यांनीच याबाबत कबुली दिलेली आहे. ही 'दडपशाही' आपल्याकडे सोपविलेली कामगिरी इतक्या अकार्यक्षमतेने का बरे पार पडते? हा कोतवाल भावना-वासना-इच्छा यांना एकीकडे हद्दपार करून अबोध मनात त्यांची रवानगी करतो. परंतु हाच कोतवाल या सर्वांनी स्वप्नात Parapraxis आणि neurosis या अवस्थेत उफाळून येण्याबाबत का बरे प्रतिबंध करीत नाही. कार्यक्षम अशी दडपशाही यंत्रणा उभारणी करण्याचा हा खासच मार्ग नाही. एवंच आपण जर अशा प्रकारच्या यंत्रणेने जीवशास्त्रीयदृष्ट्या हत्यारबंद होऊन या जगात प्रवेश केला असेल तर? निसर्ग मातेने (Mother Nature) एक अत्यंत ठिसाळपणे योजिलेली मानसिक यंत्रणा आपणास दिलेली आहे. हे असे विधान करता येते याचे कारण अगदी साधे व सरळ आहे. आपण स्वप्न पाहू लागताक्षणीच ते पराभूत होते. आपल्या मानसिक आयुष्यात ज्या ठिकाणी हा प्रदेश आहे व जेथे आपण पोहोचतो, त्याठिकाणी या तडीपार केलेल्या गोष्टींचे लचके येऊन पोहोचतात. कोतवालाला आपण जे साहित्य नुसते पाहूही नये असे वाटते असे साहित्य आपल्या स्वप्नातून उफाळून येते. परंतु हे होत असताना या कोतवालाने आत्यंतिक स्वरूपाची धावाधाव करून तो आपल्या अकार्यक्षमतेची प्रतिके (म्हणजे भावना-वासना-इच्छा यांना या कोतवालाने अबोध-मनात प्रवेश करण्यासाठी हरकत

घेतलेली नसते) आणि स्वप्नात दिसणारी जी गोष्ट असते तिला तिरपाकडे स्वरूप देऊन आपली अकार्यक्षमता लपविण्याचा वा तिच्यावर पांघरुण घालण्याचा प्रयत्न करतो.

फ्राईड यांच्या लेखनाच्या कोणताही पूर्वग्रह मनात न ठेवता स्वच्छ मनाने विचार केला, तर मग आपल्या मनात निर्माण होणाऱ्या प्रश्नाचे एक उत्तर संभवते. अबोध मनात लोटल्या गेलेल्या भावना / वासना / इच्छा यांच्यात एक प्रकारची मानसिक ऊर्जा असावी. एखाद्या प्रेशर कुकरमध्ये तयार झालेली वाफ तो कुकर जर नीट काम करीत नसला, तर मग ज्या प्रकारे ती वाफ बाहेर पडते, तोच प्रकार या ऊर्जेच्या बाबतीतही असावा. परंतु ही अशी ऊर्जा-प्रतिकृती (Model) ही एक प्रकारची थोड्याबहुत प्रमाणात म्हणू या एक उपमाच आहे. त्या प्रतिकृतीत, त्या ऊर्जेचे मापन कोणत्या एककात (Units) होणार याचे स्पष्टीकरण नाही. ते काहीही असो. परंतु मग आणखी एक प्रश्न उपस्थित होती. एकीकडे या भावना / वासना / इच्छा या सर्वांना आपल्या जाणिवेतून हद्दपार करून त्यांची रवानगी अबोध-मनात केली जाते. या सर्व हद्दपार केलेल्या गोष्टीतून (मानसिक) 'दडपशाही' आपल्या स्वत:ला काही ऊर्जा प्राप्त करून घेते. परंतु या हद्दपार केलेल्या गोष्टीवर सर्वस्वी नियंत्रण ठेवण्यास ती ऊर्जा पुरेशी नसते. फ्राईड यांच्या एकंदर लिखाणाचा विचार केल्यानंतर आणखी एक प्रश्न निर्माण होतो. जाणिवेत असलेल्या भावना-वासना-इच्छा-मोजक्या शब्दात सांगावयाचे झाल्यास जाणिवेत असलेला 'मानसिक अवस्थेवर' दडपशाही करून तिची रवानगी अबोध-मनात करण्याची अभूतपूर्व ताकद या दमन यंत्रणेत आहे. परंतु त्या दमन यंत्रणेला एखादी वा कोणीही व्यक्ती बोलताना ज्या चुका करते त्याला प्रतिबंध करावा अशी त्या व्यक्तीची मानसिक अवस्था प्राप्त करून देण्याचे मात्र जमत नाही. कोणाही व्यक्तीला-मलाही-बोलताना चुका होण्याचा जो प्रकार आहे त्याला प्रतिबंध करण्याची ताकद माझ्या जाणिवेत आहे. तिच्याकरवी असे काही होऊ नये याची काळजी मला घेता येते. परंतु या चुका वा गफलतीची रवानगी **अबोध-मनात करण्याबाबतीत मी पूर्णपणे सामर्थ्यहीन आहे.** एवंच दडपशाही करणारा जो कोणी 'कोतवाल' आहे, त्याची ताकद, त्याचा कमकुवतपणा, त्याच्याकडून होणाऱ्या चुका यांच्यातील अनुबंध तसा चमत्कारिच आहे. एका शब्दात त्यात काहीही ताळमेळ नाही. त्याच्या वागणूकीचे स्पष्टीकरण देता येत नाही. प्रत्यक्ष केलेली निरीक्षणे आणि अंतर्गत सुसंवाद यांच्यापेक्षा पोथीनिष्ठ (Dogmatic) सिद्धांत या कोतवालाला हुकूम होतात.

(२)

फ्राईड यांच्या सिद्धांतात दडपशाही आणि लैंगिकत यांची वीण अगदी घट्ट अशीच आहे. बालक हा लैंगिक प्राणी (Sexual being). बालकाला आपली लैंगिक प्रवृत्ती दडपून टाकावी लागते. मुख्यत्वे करून, पालकांची त्याच्यावर जी सत्ता असते, दाब असतो त्याकरवी ती कृती केली जाते. फ्राईड यांच्या लिखाणामुळे गाजलेल्या मौखिक, गुदद्वारीय आणि लिंगाकरवी तृप्त होणाऱ्या अवस्था या सर्व अवस्था फ्राईड आपल्या पद्धतीने उलगडून दाखवितात. त्याज-



अनुक्रमणिका

बरोबर आपल्या मातेशी समागम करावा, आपणास नपुंसक करण्यात येईल अशी अनामिक भीती (Anxiety), पुरुषाच्या लिंगाबद्दल वाटणारी असूया इत्यादी संकल्पनाचा वा कल्पनांचा फ्राईड यांच्या लिखाणात समावेश आहे. लैंगिकता सुप्ताव्यवस्थेत असण्याचा तो कालखंड असतो. याचेही वर्णन त्यांच्या लिखाणात आढळते. एवंच बालकाचे अगदी आरंभीचे असे ते लैंगिक जीवन आणि व त्याच्या मानस-नाट्याचे (Psycodrama) दर्शन फ्राईड आपल्या लिखाणाकरवी आम जमतेस सादर करतात. फक्त या सर्व संकल्पना आपल्या कल्पनेतून निर्माण झाल्या आहेत, **तो आपला कल्पना विलास आहे हे न सांगता, त्याला वैज्ञानिक बैठक आहे असे भासवतात.** बालकाच्या आरंभीच्या लैंगिक आयुष्याचा परिणाम एकतर परिपक्व अशा निरोगी लैंगिकतेत होतो अथवा त्यातून Neurosis ची अवस्था निर्माण होण्याची शक्यता असते. बारीकसारीक तपशीलात जाऊन फारच काळजीपूर्वक बसविलेला, अत्यंत विकसित पण त्याजबरोबर गुंतागुंतीचा असा हा सिद्धांत व त्यात अनुस्यूत असलेल्या संकल्पना सादर करताना फ्राईड यांनी स्वत:च जो युक्तीवाद केला आहे. तो वाचल्यानंतर वाचकाच्या लक्षात काय येते? शब्द व भाषा आपल्याला हवी तशी वाकवून ती तिरपाकडी (Distort) करणे अनावश्यक कल्पनांचा व संभाव्यता व्यक्त करणाऱ्या बौद्धिक उड्या. फ्राईड ज्या अनेक गोष्टींच्या वास्तवतेबद्दल दावा करीत होते त्या ढळढळीतपणे किती अशक्य कोटीतल्या आहेत हे वाचकाला भावणे. फ्राईड यांचा आपल्या सिद्धांताबद्दलचा युक्तीवाद वाचताना हे सारे वाचकाला हैराण करते.

बालक लैंगिक क्षेत्रातही कार्यक्षम असते हा फ्राईड प्रणित सिद्धांत तसा बोचरा नाही. परतु या सिद्धांताला फ्राईड ज्या स्वैरपणे व मुक्तपणे जे तिरपाकडे स्वरूप देतात तेच जास्त खुपते. शिवाय आपण जे अत्यंत धाडसी दावे (Claims) करीत आहोत, **त्याबद्दल कोणा वैज्ञानिकाची खात्री पटेल असा पुरावाही फ्राईड सादर करीत नाहीत.** या कारणाने तो सिद्धांत फारच बोचरा झाला आहे. बालकाला आपली लैंगिक भूक भागविण्यासाठी आपली लैंगिक इंद्रिये हीच एकमेव जागा वा केंद्र नाही. मुख आणि गुदद्वार हे दोन्हीही शारीरिक भाग हे तितक्याच लैंगिकतेने भारलेले आहेत असा दावा या सिद्धांताकरवी फ्राईड करतात. हा जो त्यांचा दावा आहे त्यातले तेच कळीचे म्हणूनच महत्त्वाचे मुद्दे आहेत. फ्राईड हा लेखक म्हणून सामान्य इसम नव्हता. तो फारच चतुर. त्याने आपण जो दावा करीत आहोत त्याबाबत कोणत्या स्वरूपाचे आक्षेप घेतले जातील याची अटकळ या चतुर लेखकाने केलेल्या वाद-संवादात-चर्चेत अपेक्षिली होती. म्हणजे त्याचे असे आहे बालकाला जो आनंद सर्वसामान्यपणे प्राप्त होतो त्याची सांगड अगदी नेमकेपणाने फ्राईड यांनी लैंगिक स्वरूपाच्या आनंदाशी घातलेली आहे. एक वेळ असे मानूया की आपला हा आनंद बालक आपल्या मुखाकरवी वा गुदद्वाकरवी प्राप्त करून घेते. म्हणजे मातेच स्तन चोखताना बालकाला होणारा आनंद आणि आपल्या गुदद्वाराकरवी मलविर्सजन केल्याकारणाने होणारा आनंद. परंतु मुद्दा असा आहे की, हा जो

आनंद बालकाला होतो, तो लैंगिक स्वरूपाचा आनंद आहे असे का म्हणावयाचे? याचे साधे व सरळ कारण असे आहे की, फ्राईड सिद्धांतानुसार बालकांच्या भावनात व कार्यवाहीत त्यांची लैंगिक इंद्रिये अंर्तभूत नसतात. म्हणजे बालक मातेचे स्तन चोखीत असताना ते आपली भूक शमावित असते. मलविर्सजन करताना ते आपल्या शरीराची गरज पुरवित असते. या दोन्हींही क्रियात त्या बालकाचे **लिंग** अंतर्भूत नसते. हे जर आहे तर मग बालकाला या क्रिया करताना होणारा आनंद हा **कामतृप्तीचा** आनंद कसा ठरतो. वास्तविक या दोन्ही क्रियांचे स्पष्ट असे पर्यायी वर्णन पुढील प्रमाणे करता येईल. आपले आवडते अन्न सेवन करताना होणारा आनंद आपल्या मुखाकरवी आपल्याला प्राप्त होतो; आणि मलविर्सजन गुदद्वाराकरवी झाले म्हणजे पोट रिकामे झाल्याकारणाने हुशारी वाटते, यात प्रामुख्याने वाटा गुदद्वाराचा असतो. वयात आलेल्या व्यक्तीला आनंद आपल्या लिंगाद्वारे कामतृप्ती झाली म्हणजे प्राप्त होतो. पण या दोन्हींही प्रकारच्या आनंदाची प्रकृती बालकाच्या बाबतीत लैंगिक असते असे का समजावयाचे? मानवी शरीरातील अवयवाशी हे आनंद निगडीत आहेत ही वस्तुस्थिती आहे. परंतु लैंगिक सुखापासून मिळणारा आनंद, त्याच्याशी अन्नसेवन करणे, मलविसर्जन करणे या क्रियापासून मिळणारा जो आनंद, यात नेमकेपणाने त्यात कोणत्याही प्रकारचे साधर्म्य नाही.

या दोन प्रकारच्या आनंदाबद्दल कोणाला कितीही दिलचस्पी असली तरी तो फरक दूर करताच येणार नाही. मौखिक आणि गुदद्वारीय क्रिया या लैंगिक विकासातील अवस्था आहेत, यावर फ्राईड पुन्हा पुन्हा ठोसपणे भर देतात. पण आपण हे का करीत आहोत याचे समाधानकारक स्पष्टीकरण मात्र ते कधीही देत नाहीत. समागम केल्यानंतरचे समाधान-आनंद यांना आविष्कृत करणारा जो चेहरा असतो, त्यासारखाच स्तनपान करून तृप्त झालेल्या बालकाचा चेहरा दिसतो, यासारखे लंगडे समर्थन फ्राईड महाशय देतात. यापेक्षा अधिक चांगले स्पष्टीकरण त्याना देता आलेले नाही. Freud Evaluated (फ्राईड यांचे मूल्यमापन) या Malcom Macmillan यांच्या ग्रंथात फ्राईडप्रणित लैंगिकतेसंबंधी उत्तम चर्चा वाचकास आढळते. मॅकमिलन साहेबानी केलेले विश्लेषण जितके वाचनीय आहे त्याहीपेक्षा ते अधिक भेदक आहे. वयात आलेली काही माणसे लैंगिक सुख मिळविण्याकरिता 'मुख आणि गुदद्वार' या दोन्हींही शारीरिक अवयवांचा वेळप्रसंगी उपयोग करतात. पण बालके तसे करीत नाहीत हे मान्य करण्याइतके फ्राईड सुजाण नक्कीच होते. बालकाच्या मनोविश्वाचा तो भागच असत नाही असे ते सांगतात. परंतु एकीकडे हे सांगत असताना ते असा दावा करतात की, बालक जेव्हा स्तनपान करते, मलविर्सजन करते, त्यावेळी ज्यात लिंग (योनी (non-genital) यांची हजेरी नसते अशा प्रकारच्या **लैंगिकतेत ते** सहभागी असते. कोणाही वयात आलेल्या व्यक्तीला दोन प्रकारच्या आनंदाचा अनुभव येतो वा घेता येतो. लैंगिक-सुखातून मिळणारा आनंद आणि शरीराच्या वेगवेगळ्या अवयवाशी निगडीत असलेला आनंद. हे दोन्हीही प्रकारचे आनंद वेगळे व अलग आहेत. परंतु फ्राईड असा भेदभाव करावयास तयार नाहीत. याचे साधे कारण हे आहे



अनुक्रमणिका

की, फ्राईड जे मानसशास्त्र पेश करीत होते. त्यात सैद्धांतिक स्वरूपाची एकवाक्यता असावी या अस्थानी इच्छेपोटी तो खटाटोप होता. (फ्राईड महाशयानी स्वप्ने आणि इच्छापूर्ती यासंबंधीचे विवेचन करताना हेच केले आहे)

**वैज्ञानिकात** कुविख्यात ठरलेल्या 'इडीपस गंडामुळे' बालकाच्या मनावर दडपण येते व त्या कारणामुळे बालकाची लैंगिकता निद्राव्यस्थेत जाते असे फ्राईड यांनी सुचविले आहे. यासाठी पुरावा बालपणातील गोष्टींचा. म्हणजे आपल्या आयुष्याच्या अगदी सुरुवातीच्या वर्षात काय झाले याचा सर्वानाच विसर पडतो. याकडे ते बोट दाखवितात. त्यांनी जो (मानसिक) दडपशाहीचा सिद्धांत मांडला आहे त्याचे समर्थन करणारा तो पुरावा आहे असे त्यांच प्रतिपादन आहे. परंतु हे सांगत असताना फ्राईड हे विसरतात की, सर्वाच्याच सुरुवातीच्या बालपणातील स्मरणे अशी असतात की, फ्राईडना जी दडपशाही अभिप्रेत आहे, त्यालाही स्मरणे पात्रच नसतात. बालकाच्या आयुष्यातील पहिल्या तीन-चार वा त्यापेक्षा काही थोड्या वर्षांच्या काळातील प्रत्येक अनुभवाची स्मरणे बालकाला दडपून टाकण्याचे काहीच कारण नसते. कुविख्यात इडीपसगंड त्यातून निर्माण होणारी तथाकथित (मानसिक) दडपशाही ही संकल्पना सर्वसाधारण विचारात आता इतकी मुरली आहे की, बालपण व लैंगिकता याबद्दल विचार करताना आपला विचार सर्वसामान्य व्यक्तींपर्यंत पोहोचविताना नेहमीच अडचण येते. यासाठी त्या संकल्पनेपासून जरा दूर जाऊन त्याची तपासणी करणे, त्या संकल्पनेचे समीक्षात्मक पृथ्थकरण करणे कठीण होऊन बसले आहे. परंतु समजा केले तर आपणास एक गोष्ट स्पष्ट होईल. (१) ही संकल्पना हा केवळ फ्राईड यांच्या **कविमनाचा कल्पना विलास आहे आणि त्या संकल्पनेचे समर्थन करण्यासाठी वैज्ञानिक स्वरूपाचा ते काहीही पुरावा सादर करीत** नाहीत. लहान बालके अगदी जाणिवपूर्वक आपल्या मातेबरोबर लैंगिक स्वरूपाचे संबंध असावेत अशी इच्छा करतात आणि ही इच्छा त्या बालकाच्या मनात असेल या कारणासाठी त्या बालकाला या त्याच्या इच्छित लैंगिक संबंधाला मदत करणारे इंद्रियच छाटून टाकावे अशी त्या बालकाच्या पित्याची इच्छा असते असे फ्राईड सांगतात. हे वास्तव आहे का? फ्राईड या संकल्पनेबाबत काय म्हणतात याबद्दलचे त्यांच्याच शब्दातले एक मासलेवाईक उदाहरण.

*"दोन ते तीन वर्षाचा मुलगा, त्याच्या लैंगिक स्वरूपाच्या ऊर्जेचा विकास होता होता तो* आपल्या स्वत:च्या लैंगिक इतिहासाबद्दल जागरूक होण्याच्या अवस्थेत प्रवेश करतो. आपल्या स्वत:च्या शरीरातील लैंगिक अवयवातून मिळणाऱ्या सुखदाई भावना त्याला जाणवू लागतात. या अवयवाला हाताने प्रेरणा देऊन आपल्या मनातही सुखदाई भावना येईल तेव्हा तिची परिपूर्ती कशी करावयाची हे तो शिकलेला असतो. तो आपल्या मातेचा प्रियकर बनतो. ती त्याला शरीराने आपलीशी व्हावी अशी त्याची इच्छा असते. तीही एका विशिष्ट पद्धतीने लैंगिक जीवनाबद्दल त्या बालकाने जे निरीक्षण केलेले असते आणि त्याला जी उपजत बुद्धी

*(Intution) असते त्यापासून त्याने जी स्फूर्ती घेतलेली असते, त्यानुसार त्या बालकाकडे जे लैंगिक इंद्रिय असते, ते आपल्याकडे आहे याचा त्या बालकाला अभिमान असतो. तो आपल्या आईला या इंद्रियाचे प्रदर्शन करून, तिला फूस लावून आपलीशी करण्याचा प्रयत्न करतो... सरतेशेवटी या बालकाची माता अत्यंत कठोर मार्गाचा अवलंब करते. बालक ज्या लैंगिक इंद्रियाच्या जोरावर आपल्या स्वतःच्या आईला आव्हान देतो, तिची अवज्ञा करतो तेच त्याच्याकडून काढून घेतले जाईल, असा दम आई त्या बालकाला देते. आपण दिलेली ही धमकी प्रत्यक्ष कार्यवाहीत उतरविण्याचे काम ती बालकाच्या पित्यावर सुपूर्द करते. हे करीत असताना ही माता बालकाला असे बजाविते की, त्याचा पिता त्याचे लैंगिक इंद्रियच छाटून टाकील... परंतु ही धमकी ज्यावेळी बालकाला मिळते, त्यावेळी त्याला स्त्री-योनीचे स्मरण झाले, अगर ही धमकी मिळाल्यानंतर काही थोड्या दिवसानी स्त्री-योनीचे बालकाला दर्शन झाले, मग तो ते विचारात घेतो...म्हणजेच त्याला जो अत्यंत महत्त्वाचा असा जो शारीरिक अवयव वाटतो तो आपल्याकडे नाही याचे त्याला ज्ञान होते. मग काय होते? बालक तोवर जे गंभीरपणे शिकला होता, तसेच इंद्रिय त्या धारणाच्या प्रभावाखाली येऊन, तोवर फारशी वर्षे न गेलेल्या आपल्या आयुष्यातील अत्यंत कठोर अनुभव बालकाला येतो.*

**फ्राईड यांनी ही जी अद्‌भुत सूचना केली आहे, त्यासाठी ते काही पुरावा सादर करतात का? काहीही पुरावा देत नाहीत.** याठिकाणी उन्मेखून सांगावयाचा मुद्दा असा की, फ्राईडनी बालकाच्या मनातील वर्णन केलेले हे विचार व भावना याबद्दल बालकाला चांगलीच जाणीव असते. परंतु होता होता आपली खच्ची केली जाईल ही अनामिक भीती त्यावेळी त्याच्या मनात घर करते. या मानसिक अवस्था दडपल्या जातात आणि त्यांची रवानगी अबोध मनात होते. (पुरुष) बालकाच्या मनातील इच्छा व त्याला वाटत असलेली अनामिक भीती या दोहोंबद्दल अत्यंत काळजीपूर्वक केलेली अनुभवजन्म तपासणी केलेली कोणालाही पहाण्याची इच्छा होईल. तत्त्वता ही अशी तपासणी करणे फारच कठीण नाही. परंतु फ्राईड तसे काही करीत नाहीत. विसाव्या शतकाच्या सुरुवातीला काही मनोरुग्ण (Neurotic) स्त्रियांनी जे काही सुचविले त्यावर फ्राईड यांच्या या परिकल्पनेचा डोलारा उभारलेला आहे. शिवाय दुसरा महत्त्वाचा भाग म्हणजे ज्याची एका विशिष्ट सिद्धांतास बांधिलकी होती अशा मनोविश्लेषणकाला (फ्राईडला) याने सुचित केलेल्या माहितीवर ती परिकल्पना उभी आहे हे लक्षात ठेवले पाहिजे.

(बालक) मुलींच्याबाबतीत फ्राईड यांची कल्पना ही तितकीच अद्‌भुत आहे. तिच्याबद्दल अनेक मान्यवर मनोविश्लेषकानी अनेक प्रश्न उपस्थित केले आहेत. फ्राईड मुलींच्या बाबतीत असे सांगतात की, आपल्याकडे लिंग नाही याबद्दल मुलींना असूया वाटते. ते आपणास प्राप्त करून दिले नाही याबद्दल त्या आपल्या आईवर रागावलेल्या असतात. त्या रागातून दुःस्वास निर्माण होतो. या सर्वांचा परिणाम आपला पिता हाच लैंगिक भावनांचे केंद्र आहे अशा प्रकारचा

बदल त्यांच्या मनात होतो. **या सर्वच कल्पना आधुनिक व मान्यवर मनोविश्लेषकाना गंभीरपणे विचारात घ्याव्यात असे वाटत नाही. या कल्पनेबद्दल प्रत्यक्ष निरीक्षण करून फ्राईड यांनी काही पुरावा सादर केला आहे का? काहीही नाही.** या आपल्या कल्पनेऐवजी फ्राईड असे का गृहित धरीत नाहीत (पुरुष) बालकाना आपल्याला स्तन नाहीत यामुळे अथवा आपल्याकडे 'योनी' सारखे इंद्रिय नाही, यामुळे मुलांना असूया वाटते. शिवाय लिंग हे इंद्रिय हा अगदी अप्रूप खजिना आहे असा विचार का करावयाचा? मनुष्य प्राणी सोडून इतर प्राणी जगताचा विचार करता या अशा प्रकारचे विशिष्ट जननेंद्रिय नाही म्हणून या प्राणी जगतातील माद्यात याच प्रकारची न्यूनगंडाची भावना प्रकट केली जाते का? उदा. माद्याना आपल्याकडे आकर्षित करावे यासाठी (नर) माकड आपले लिंग चांगलेच लोंबवून प्रदर्शित करतो त्यावेळी तरुण माद्या या फ्राईड प्रणित आसूयेच बळी ठरतात का?

लैंगिकतेचा विकास कसा होतो याबद्दलचा आपला सिद्धांत बसविताना फ्राईड मानवा-व्यतिरिक्त इतर प्राण्यांच्या मानसात अधिक तपशीलात जाऊन त्याचा बारकाईने विचार केला असता तर अधिक चांगले असते, असेच कोणी म्हणेल. हे सांगण्याचे कारण असे आहे की एकीकडे ते डार्विनच्या उत्क्रांतीवादाची शपथ घेतात. पण त्याचबरोबर मानव आणि मानवेतर प्राणी याच्यात मानसशास्त्रीय असा अगदी आमूलाग्र विसंवाद आहे हेही गृहित धरतात ! विशेष करून लैंगिकतेचा विचार करताना (बालक) मुलींची कशी का होईना स्वाभाविकपणे खच्ची करण्यात आली आहे आणि त्यामुळे आपलीही खच्ची करण्यात येणार आहे अशी भीती मुलांच्या मनात निर्माण होणे आणि आपल्यात काही कमतरता आहे म्हणून त्यांच्या मनात राग निर्माण होतो असे होत नाही. पण आपण भिन्न आहोत याची मुलांना आणि मुलींना या दोघांनाही जाणीव असते आणि याच कारणामुळे आपणाकडे स्वाभाविकपणे दोन भिन्न अशी जननेंद्रिये आहेत असे समजणे जास्त संयुक्तिक होईल. **एका बाबतीत फ्राईड यांचे मोठेपण मान्य केलेच पाहिजे.** बालकांनासुद्धा लैंगिक भावना असतात हे त्यांच्या कवीमनाने प्रथम जाणले. (पण त्या लैंगिक भावना कोणत्या प्रकारच्या होत्या याबद्दल वैज्ञानिकांना मतभेद व्यक्त केले आहेत) परंतु हे मान्य करूनही बालकांच्या डोक्यात रती-सुखाबद्दलचे (Erotic) विचार कोंबण्याची आवश्यकता नाही. प्रख्यात बाल मानसशास्त्रज्ञ **ॲलीसन गोपनिक** आणि त्यांचे सहकारी यांनी असे नमूद केले आहे की एकतर अशा प्रकारचे विचार करण्याइतक्या उंचीवरची तरलता, त्यांच्याकडे नसते. तशी ती त्यांच्याकडे आहे याबद्दल आपल्याकडे काहीही पुरावा नाही. युद्धकाळात दारू-गोळांचा वर्षाव होतो. त्यावेळी अनेक सैनिकांना मानसिक धक्का सहन करावा लागतो. परिणामी त्यांचे मानसिक संतुलन बिघडते. अशा सर्व प्रकारच्या मानसिक-संतुलनाच्या बिघाडामागे (Neurosis) फ्राईड यांच्या सिद्धांतानुसार तयार झालेली मानस-चित्रे असतात हे समजणे देखील अविश्वसनीय आहे. या लढाईच्या प्रसंगी फ्राईड यांच्या सिद्धांतानुसारच होते, हे समजण्यास काहीही आधार नाही.

याठिकाणी देखील फ्राईड आपला कल्पना विलासी दांडपट्टा कसलाही घरबंद न ठेवता फिरवितात. लैंगिक शिस्तीबाबत एखाद्या व्यक्तीच्या पूर्वायुष्यात अतिरेक झाला किंवा एखाद्या व्यक्तीला मानसिक धक्क्यातून जावे लागले तर नंतरच्या आयुष्यात मानसिक संतुलन बिघडेलही (Neurosis) हे मान्य करण्यास काहीच अडचण नाही. परंतु बालपणची लैंगिकता हाच सर्व मानसिक दु:खाचा पाया वा मुलाधार आहे असा जो दावा केला जातो, त्यापासून ही मान्यता वा वस्तुस्थिती फारच दूर आहे.

फ्राईड यांनी Id (वासनापिंड) Ego (आत्मपिंड) आणि Superego (आदर्शपिंड) या संकल्पना मांडल्या. हे त्यांचे योगदान महत्त्वाचे नव्हते का? असे कोणी फ्राईड भक्त म्हणेल. सर्व प्रथम या संबंधात खुद्द फ्राईड यांनी काय सांगितले आहे हे पाहूया.

*"वासना पिंडाने आपल्या उपज़त प्रवृत्तीनुसार केलेल्या दाव्याना लगाम घालणे ही अत्यंत पराकोटीची कठोर अशी मागणी (Demand) आत्मपिंडांकडून केली जाते. Anticathexes वरती जी प्रचंड ऊर्जा खर्च होते. ती त्याच पातळीवर कायम चालू रहावी, हे करणे वासना पिंडाचे कर्तव्यच असते. पण हे कार्य त्याच्याकडून सिद्ध होण्यासाठी आत्मपिंडाने सहाय्य करावे हे त्या मागणीत अंतर्भूत असते. परंतु आदर्शपिंडाकडून केल्या जाणाऱ्या मागण्याही शक्तीशाली पण त्याजबरोबर इतक्या सातत्याने केल्या जातात व त्या उसंतही देत नाहीत असे होण्याचा संभव असतो. असे झाले म्हणजे आपल्याला जी इतर कामे करण्याला सामोरे जावयाचे आहे, त्याबाबत आत्मपिंडाला पक्षघात (Paralysis) होण्याचा संभव असतो. नेमक्या याच ठिकाणी (ऊर्जेच्या बाबतीत) आर्थिक स्वरूपाचा संघर्ष निर्माण होण्याची शक्यता आहे. असा संशय आपण व्यक्त केला तर तो वाजवीच ठरावा. या संघर्षात खिंडीत सापडलेल्या आत्मपिंडाविरुद्ध वासनापिंड व आदर्शपिंड हे संयुक्त आघाडी उघडतात. आत्मपिंड खिंडीत सापडलेला असतो याचे कारण आपली नेहमीची स्थिती कायम रहावी या उद्देशाने तो वास्तवतेला चिकटून राहण्याचा प्रयत्न करतो" (An outline of Psychoanalysis* पृष्ठ *49-50 James Strchey NORTON Publishers 1969)*

एवंच फ्राईड यांच्या सिद्धांताने मनाची विभागणी आत्मपिंड, वासनापिंड व आदर्शपिंड अशा तीन विभागणी करून आपणास सादर केली आहे. परंतु ही विभागणी जखडबंद अशी कोणत्याही प्रकारची सुट नसलेली आणि खुजेपणाची प्रवृत्ती (Homuncular) दर्शविणारी आहेत. फ्राईड अशा प्रकारे प्रतिपादन करीत आहेत की मानवी मनात संपूर्ण वाढ झालेले असे तीन विभाग असतात. यातील प्रत्येक विभाग व्यक्तीचे आपल्याकडे लक्ष वेधून घेण्याकरिता चढाओढ करीत असतो. एकमेकांबरोबर एकमेकांसमोर खरोखरच युद्ध करावयास उभ्या असलेल्या गटांच्या सामाजिक - समूहासारखे मानवी मन असते. ही अशा प्रकारे मांडणी करून ती सादर केल्यानंतर तिची मदत काहींना झाली असेलही. **परंतु या मांडणीत**

**नवीन असे काय आहे** किंवा तिच्याबद्दल खास करून दिलचस्पी वाटावी असे काय आहे हे स्पष्ट होत नाही. काही उपजत इच्छा (Innate desire) आणि काही नैतिक श्रद्धा यांचा संच अर्थातच प्रत्येक व्यक्तीकडे असतो. या संचात संघर्षही निर्माण होण्याची शक्यता कोणी नाकारत नाही. पण त्याजवरोबर त्या संघर्षावर नियंत्रण ठेवण्याचे कामही तो संच करतो.

या सर्व मानसिक रचना व पद्धती कशा तयार होतात, त्यांच्यात काय आशय असतो याबद्दल फ्राईड यांच्या काही आगळ्या-वेगळ्या रचना आहेत. त्या एरवी कशाही असोत पण त्या सामान्य वा अर्थहीन खासच नाहीत. प्रत्येकाकडे अनेक उपजत प्रवृत्ती (instinctes) असतात त्यात मृत्यु तसेच जीवनाबद्दलची असोशी या दोन्हीचा समावेश आहे, असे फ्राईड यांनी गृहित धरलेले आहे. (फ्राईड त्याना Thanatos आणि EROS अशी नाव देऊन त्यांना संबोधितात) पण त्यांनी हे असे गृहित धरणे जीवशास्त्र दृष्ट्या फारसे विश्वसनीय नाही. याचे साधे कारण असे आहे की ज्या प्राण्याला 'मृत्यू' हवाहवासा वाटण्याची उपजत प्रवृत्तींची (instinct) आहे तो या पृथ्वीतलावर टिकून राहण्याच्या आणि प्रजोपत्ती करण्याच्या लढाईत टिकून राहणे ह्या लढाईत जग धरून राहणे फारसे शक्य कोटीतले नाही. मनुष्य प्राण्या व्यतिरिक्त इतर प्राण्यानाही मृत्यू हवाहवासा वाटण्याची उपजत प्रवृत्ती (instirct) असते असे समजता येईल का? मनुष्य प्राण्याला आत्मविनाश करून घेण्याची इच्छा होते हे खरे आहे. परंतु ही जरी वस्तुस्थिती असली, तरी जीवशास्त्रीय दृष्ट्या आपल्याला ज्या उपजत प्रवृत्ती (instinct) देणगी मिळालेली आहे. त्यांची आत्मविनाशाची इच्छा हा त्यातला एक भाग आहे असे आपणास कसे म्हणता येईल?'जाणिवे'बद्दल फ्राईड यांचा सिद्धांत तितकाच अविश्वसनीय आहे. माता-पित्याकडून आणि समाजाकडून आपल्याला जे प्रतिबंध केले जातात, ते आपण आत्मसात करतो व त्याचा परिणाम म्हणजे आपली 'जाणिव'. बालकाचा मानसिक व शारीरिक विकास होत असताना एक अशी अवस्था असेल की त्यात बुद्धीचा उपयोग केला जात नाही. (Pre-rational stage) या विधानात काही तथ्य जरूर आहे. बालपणी आपणास ज्या शिक्षा मिळतात आणि ज्या गोष्टी करून नये असे आपणास बजाविण्यात येते; काही वेळेला त्याबद्दल सक्तीही करण्यात येते, त्याचा परिणाम स्पष्ट आहे. परंतु याचा अर्थ असा होत नाही की कोणतीही वयात आलेली, विचारी व परिपक्व व्यक्ती नैतिक व अनैतिक काय याबाबत ज्या निवडी करते, त्याचे कारण आपणास बालपणी जी वागणूक मिळते यात आहे असा होत नाही. शिवाय आपणापैकी बहुतेक सर्वजण लहानाचे मोठे होत असताना परिपक्व व विचारी व्यक्ती होण्याचे उद्दिष्ट बाळगून असतो. सर्व सामान्य माणसे निती संबधी विचार करतात त्यावर माता-पित्यांचे करोल नियंत्रण नसते. याउलट फ्राईड समजतात त्यापेक्षा त्याबाबत विचार करण्याची सर्वसामान्य माणसाची क्षमता कितीतरी स्वतंत्र्य आहे. माता- पित्यांच्या विचाराचा वा वागणूकीचा त्यावर फारसा प्रभाव नसतो. ही क्षमता असल्याकारणाने व्यक्ती वयात आल्यानंतर तिच्यावर माता-पित्यांनी वा अगर त्यांच्या

काळातील जेष्ठानी, व्यक्तीवर लादलेली नैतिकता वारंवार त्याज्य ठरविली जाते. फ्राईड यांनी सुचविलेली चौकट फारच अरूंद आहे, सर्व घटनांची-विचारांची मोडतोड करून त्या चौकटीत त्या सर्वांना कोंबण्याचा उद्योग ते करतात असे अनेक वेळा आढळून येते. या सर्व प्रतिपादनाचा अर्थ असा नाही की त्यांच्या सिद्धांतावर विश्वास ठेवण्याची माझी इच्छा नाही. परंतु मी तसे का करावे हेच मला स्पष्ट होत नाही आहे. याचे कारण सिद्धांताचे विवेचन *ते वैज्ञानिक स्वरूपात करीत नाहीत.*

फ्राईड यांचे सिद्धांत इतक्या डळमळीत पायावर जर आधारलेले आहेत तर ते अजूनही बुद्धीजीवी साहित्यिक आणि गूढवादी मिस्टीक विचारसरणीच्या लोकांना का बरे आपलेसे वाटतात? फ्राईड यांच्या सिद्धांताबद्दल या सर्वांना असलेले आकर्षणे हे कोणीही सुजाण व्यक्ती नाकारणार नाही. पण या आकर्षणाचा मूळ उगम नेमका कोठे आहे? एकतर फ्राईड यांचे लिखाण प्रख्यात साहित्यिक कै. प्रा. श्री. म. माटे यांचा शब्द वापरून सांगावयाचे झाल्यास लगेच 'गारूड' करते. ते मोहात पाडते. फ्राईड आपल्या लिखाणात वाचकाला काही वेळा आवाहन करतात काही वेळा दमबाजी करून वाचकास आव्हान देतात. अशा प्रकारे वाचकाच्या मनात अशी भावना निर्माण करतात की त्यांच्या सिद्धांताला मान्यता न देणारी व्यक्ती स्वत: फारच कंटाळवाणी, कशावद्दलही दिलचस्पी नसलेली पूर्वग्रहानी परिपूर्णपणे ग्रासलेली व्यक्ती आहे. सत्याला सामोरे जाण्याची या व्यक्तीला भिती वाटते. या शिवाय त्यांच्या लिखाणाने अनेकाना विषेश करून साहित्यक्षेत्रात निर्मिती करणाऱ्यांना स्फूर्ती मिळालेली आहे. मानवी जीवनातील नाट्य आणि त्यातील मानसिक संरचना याचे आजवर कोणीही न पाहिलेले विश्व फ्राईड हा कवी मनाचा लेखक सर्वांना खुले करून दाखवितो. थोडक्यात सांगावयाचे झाल्यास मानवी जीवनाचा जो थर आजवर लपवून ठेवला गेला होता तो फ्राईड वाचकास उघड करून व उलगडून दाखवितात. इतकेच नव्हे तर त्यांच्या या तपासणीने वाचकाला आजवर स्वत:बद्दल जे वाटत होते, त्यापेक्षा आपण कितीतरी अधिक सखोल आहोत हेही लक्षात येते. आणखीही अनेक गोष्टींबद्दलचे ज्ञान गुरूराज फ्राईड हे वाचकाला सादर करतात. वाचकाला तो सर्वज्ञानी सर्व गोष्टींचे स्पष्टीकरण फ्राईड यांच्या सिद्धांताकरवी देणारा तो सर्वज्ञानी असा याची खात्री करून देतात. त्यापासून माथे फिरविणारा आनंद वाचकास ते नजर करतात. आजवर वाचकाला जे बुचकाळ्यात टाकणारे व ज्यापासून काही अर्थबोध होत नाही असे वाटत होते, ते फ्राईड यांच्या लिखाणातून वाचकाला ते स्पष्ट झाले आहे, याचे ज्ञान त्याला होते. एवंच आपण सर्वज्ञानी झालो आहोत याची खात्री पटते. थोडक्यात वाचकाच्या असे लक्षात येते की आजवर त्याला ज्याचा साधा संशयही आला नव्हता, त्यापेक्षा या गोष्टीबद्दल स्पष्टीकरण देण्याची वाचकाची ताकद कितीतरी प्रचंड आहे, हे फ्राईड यांच्या लिखाणाचे वाचन केल्यानंतर वाचकास ज्ञात होते. (या अशा वाचकाला कवी मनाच्या फ्राईड यांच्या लिखाणाने भूरळ पडते. ते विज्ञान नाही याविषयी त्याला ज्ञान नसते हा भाग त्यात आहेच) एवंच बाहेरच्या आमजनतेबद्दल फारच प्रचंड ज्ञान असलेल्या

व्यक्तीला फ्राईड आपल्या वाचकांचे परिवर्तन करतात. फ्राईड हे रतीसुख लैंगिकतेवर (Sexual) ठोसपणे भर देतात. हा मुद्दा व विचारसुद्धा अत्यंत मौलिक आहे. प्रख्यात तत्त्वज्ञ विटगेनस्टाईन यांनी याबाबत एक लक्षणीय विधान केले आहे. "मानवी आत्माचे (Human Soul) फ्राईड यांनी चितारलेले चित्र हे अत्यंत घृणास्पद आहे. पण याच कारणामुळे त्या चित्राकडे लोक आकर्षित होतात. आपण ज्या प्रेरणांबद्दल उच्चारसुद्धा करू नये, आणि ज्या प्रेरणांचा आपण अथकपणे प्रतिकार करतो अशा सर्व प्रेरणांची एक खदखदती कढई आपले मन आहे. या कल्पनेतच काही प्रमाणात दिलासा देणाऱ्या गोष्टी आहेत. उदा. लैंगिक दडपशाही आणि अप्रामाणिकपणा यासारख्या बलाढ्य शक्तीशी आपण मुकावला करीत आहोत. यावर विश्वास ठेवणे हेच मूळांत आकर्षक आहे. "एवंच फ्राईड यांच्याबरोबर मतभेद दर्शविणे म्हणजे-त्याचे थोडक्यात असे आहे-व्हिक्टोरिया महाराणीच्या काळात भावनात्मक नैतिकतेने घासून पुसून पुरवठा केलेल्या मानवी- मानसिकतेचे समर्थन करण्यासारखे ते होते, कोणता आधुनिक वाचक हे मान्य करण्यास तयार होईल? प्रत्येक व्यक्तीच्या मनात काळ्याकुट्ट व त्याजवरोबर रोमांचकारीही गोष्टी असतात. फ्राईड प्रणित हे जे सत्य आहे, आणि जे प्रत्येक व्यक्ती म्हणजे वाचकाच्या मनात ही भावना निर्माण करण्यात ते यशस्वी होतात. हे सारे अगदी जगत मान्य, तितकेच आकर्षक. शहाणपणाचा मुलांमा दिलेले असे. ते काहीही असो विसाव्या शतकातील फ्राईड यांच्या लिखाणाचे वाचक खास करून ललित लेखक व गूढवादी- मिस्टिक विचारांचा पाठपुरावा करणारे, त्याबद्दल आकर्षण असलेले पण वैज्ञानिकदृष्ट्या साक्षेपी नसलेल्या लोकावर फ्राईड यांच्या विचारांचा कब्जा जबरदस्त आहे. गंमत अशी आहे की फ्राईड हे आपण आधुनिकतावादी निरिश्वरवादी आहेत असे सांगतात. असे असूनही मानवी प्रकृतीबद्दल मिथक आहे असा सिद्धांत मांडतात. त्याबद्दल आपल्या मोहक लेखन शैलीत प्रतिपादन करतात. परंतु प्रत्यक्षात वस्तुस्थिती अशी आहे की हे मिथ्थक सत्य, अर्धसत्य आणि केवळ कल्पना विलास यांचे झिंग आणणारे मिश्रण.

**तीन**

फ्राईड हे अजूनही विशेषत: साहित्यिक जगतात मानाचे स्थान मिळवून आहेत त्याचे आणखी एक कारण आहे. मानव या प्राण्याबद्दल आपली जी संकल्पना आहे ती तयार होण्याला विसाव्या शतकातील अनेकांचा हातभार लागला आहे हे खरे आहे. पण तिच्या उभारणीत दोन व्यक्तींचा सिंहाचा वाटा आहे. इतरांचे योगदान त्या मानाने बेताचे आहे. चार्लस डार्विन आणि सिगमंड फ्राईड हे ते दोन महाभाग. यापैकी फ्राईड हे भन्नाट, बिनधास्त आणि डार्विन हे क्रांतीकारक असे *वैज्ञानिकांचे* मत आहे. फ्राईड यांच्याबद्दल साहित्यिकांची व गूढवाद्यांची मते वेगळी आहेत, या मंडळीचे डार्विनबरोबर काही देणघेणे नसते. एका सखोल दृष्टीने पहाता फ्राईड यांची जाण सर्वस्वी काव्यात्मकतेकडे झुकणारी होती. हे जरी

असले तरी *डार्विन त्यांच्या अगोदर होऊन गेले नसते, तर फ्राईडही झाले नसते– म्हणजे फ्राईडही आज ज्या करता ज्ञात आहेत तसे झाले नसते हे लक्षात ठेवले पाहिजे.*

विद्यमान युग हे तंत्रविज्ञानाचे युग आहे. समाजातील वैचारिक पिछाडीचे संरक्षण करण्याचे काम अंगावर घेतलेल्या मूलतत्त्ववाद्यांचा नि:पात करण्यासाठी डार्विनची आवश्यकता नव्हती. डार्विन यांनी एकच गोष्ट केली व ती फारच महत्वाची होती. सर्व सजीव प्राण्यांचा कधीतरी उगम झाला. एका समान परिस्थितीतून म्हणजे आपला जीव व प्रजाती प्राप्त पर्यावरणात टिकवून धरण्यासाठी जरूर असलेले गुण आपल्यात असावे, यासाठी त्यानी आपले शारीरिक आकार व मनाची घडण केलेली होती. या संकल्पनेच्या अवती-भोवती सूत्रे बसवून, त्यांनी एकत्रित केलेल्या काही तत्त्वांचा संच डार्विन यांनी सुचविला होता. सर्वच विद्यमान सजीव प्राणी याच एका समान तत्त्वार उभे आहेत. डार्विन यांनी ही तत्त्वे मांडली तेव्हा गदारोळ झालाच. त्याबद्दल अतिशयोक्त कल्पनाही केल्या गेल्या. कालांतराने हा धुरळा खाली बसला. धार्मिक उदारमतवादचे वारेही वाहू लागले. या सर्वांचा परिणाम असा झाला की सेंद्रिय (Organic) निसर्गाबद्दल जी संकल्पना होती ती एका व्यापक नियमबद्ध पण त्याच वेळी ऐक्यही दर्शविणारी झाली. ऐक्य याचा अर्थ असा नाही त्या संकल्पनेबद्दल विकल्प प्रदर्शित केले गेले नाहीत किंवा त्याला कोणी फाटे फोडले नाहीत. डार्विन यांनी सांगितल्याप्रमाणे एक पेशीच्या Protvzoans या प्राण्यापासून सुरवात होऊन उक्रांती या वाटचालीत मानव या प्राण्याची निर्मिती झाली, त्यात व्यापक असे सातत्य होते. एवंच उत्क्रांती या सिद्धांतात जीवशास्त्राला सरतेशेवटी प्राणी जगतात ऐक्य प्रस्थापित करण्यासाठी एक तत्त्व सापडले होते. मानव प्राणी हा एकमेव नव्हता तो सेंद्रिय परंपरेचा वारसदार (Organic-legacy) होता.

उत्क्रांतीची प्रक्रिया शिगेला पोचल्यानंतर मानव हा प्राणी जन्माला आला. म्हणूनच मानव हा प्राणी स्वत:वर फार खूष आहे. त्याच्या मनात पुढील विचार येत असावा. परिपूर्ण असा प्राणी निर्माण करण्याच्या प्रयत्नात सरतेशेवटी ईश्वर अथवा निसर्गाने सातत्याने शहाणपण दाखवून मानव या प्राण्याची निर्मिती केली. स्वत:वर खूष असणारा मानव हा प्राणी हे जाहीर करीत असावा. परंतु मानव हा प्राणी निसर्गाची परिपूर्ण अशी निर्मिती नसून त्यात अनेक त्रूटी असल्याकारणाने ती अजूनही अपूर्ण असलेली कलाकृती आहे, अशी प्रकारची प्रतिमा सादर करण्याचे काम फ्राईड यांनी केले. 'फ्राईड असे सांगत होते की मानव हा प्राणी मानवी बुद्धीला न पटणाऱ्या, तसेच सयुक्तिक नसलेल्या गोष्टी विरुद्ध संघर्ष करीत असलेली, समाजात जगावयाचे असेल तर मनाअंतर्गत व सातत्याने बदलणारी परिस्थिती, त्यातून निर्माण होणाऱ्या उर्मी यांना ताब्यात ठेवलेच पाहिजे. याचे स्मरण असणारा, ज्या बंधनाच्या स्मरणामुळे कृतीप्रवण केला जाणारा, उतुंग भावना व्यक्त करणारे वागणे आणि वेडही या दोन्ही प्रवृत्तीना सारख्याच प्रमाणात बीजवेत ठरणारा, बालकच्या अवस्थेत पण निरागस

असण्याऐवजी जे दुसरे काही असेल अशी बाल्यावस्था या सर्वापासून कधींही संपूर्णपणे स्वातंत्र्य नसलेला मानव हा प्राणी आहे. थोडक्यात सांगावयाचे झाल्यास, फ्राईड असे सुचवित होते की मानवाची उत्तम वागणूक लक्षात घेतली आणि सगळ्यात महत्त्वाचे म्हणजे, सर्व दृष्टीने मानवाची वाईट वागणूकही जमेल धरली, तरी त्यांचे स्पष्टीकरण एका समान स्पष्टीकरणाच्या परिघात येतात. एवंच एका समान प्रक्रियेतून चांगल्या व अनिष्ट (Evil) अशा दोन प्रवृत्ती वाढत असतात.

मानवाबद्दलच्या या नव्या संकल्पना मांडणारा फ्राईड ही विसाव्या शतकातील पाश्चिमात्य समाजाची उभारणी करणारी व्यक्ती या भूमिकेत त्याना पहाताना ही कल्पना वरवर तशी चमत्कारिक भासेलही. ते काही भूमिका पार पाडण्याच्या बाबतीत अगदी योग्य व्यक्ती होते. या संदर्भात त्यानी तोवरच्या आयुष्यात जी प्रशस्तीपत्रे पैदा केली होती, त्याची तपासणी करणे हे फलादाई ठरेल. विशेषत: आपला काळ, आणि आपण स्वत: या दोन्हींही बाबतीत, अत्यंत दु:खदायकपणे प्राप्त करून घेतलेली जी प्रतिमा होती त्यावरच त्यांनी निर्माण केलेली नव मानवाची प्रतिमा प्रामुख्याने पायाभूत होती. म्हणजे या नवनिर्मितीत त्यांच्या त्या प्रशास्त्रीपत्रांचा सिंहाचा वाटा होता. या ठिकाणी आपल्याला फ्राईड यांच्या 'मानस-गतिमानतेशी' (Psycho - dynamics) फारसे कर्तव्य नाही. याचे कारण या विषयी माझी मते या लेखात अगोदरच नोंदविली आहेत. परंतु त्यांच्या व्यक्तित्त्वात सामावून गेलेल्या बौद्धिक परंपराबद्दल या ठिकाणी आपणास जास्त करून कर्तव्य आहे. फ्राईड जन्माला आलेला काळ युरोपिय ऐहिकवादाचा, जडवादी विचारसरणीचा पुरस्कार करणारा होता. थोडक्यात ते त्या समाजाचे 'बालक' होते.

या विचारांशी त्यांची लग्नगाठ बांधली गेली होती. पण त्याजबरोबर सरतेशेवटी अभिजात असे वास्तव पदार्थविज्ञान शास्त्राच्या भाषेत आविष्कृत झालेच पाहिजे असा आग्रह धरणारा (Helm Holtiz) होम होलटीझ यांनी बिनधास्तपणे सादर केलेल्या पदार्थ वैज्ञानिकतनेचा (Physicalism) फ्राईड यांना सांस्कृतिक वारसा प्राप्त झाला होता. तो किती सामर्थ्यशाली होता हे त्यांनी आपल्या कृतीनेच दाखवून दिले आहे. मानवी शरीराची रचना कशी असते व त्या शरीराचे अवयव एकमेकाशी कसा व्यापार करतात याबद्दल संशोधन करण्यात फ्राईड याना खरोखरच दिलचस्पी होती. ही दिलचस्पी त्या परंपरेचे सामर्थ्य आविष्कृत करते. एकीकडे ते विधिलिखितता / पदार्थ शास्त्रीय वैज्ञानिकता (Physicalim) परंपरेचे ते पाईक आहेत. पण त्याजबरोबर ते रोमंटीसिझमकडे अगदी सखोल आकृष्ट झाले होते. त्यांचा या दिलचस्पीचे प्रख्यात इंग्लिश कवी डब्ल्यू एच. ऑडेन (W.H. Auden) आणि प्रख्यात अमेरिकन साहित्य समीक्षक, लिओनेल ट्रिलींग (Lionel Tribling) या दोघानाही त्याचे बोधन झालेले होते. तेही पराकोटीच्या भावनात्मक पातळीवर. या मान्यवरांच्या मते फ्राईड यांच्या मनात, व्यक्तीत्त्वात त्यांनी अंगीकारलेल्या संशोधनात, रोमँटिसिझमचा एक सखोल असा प्रवाह होता. म्हणजे मानवी जीवनातील उर्मींचे (impulse) असलेले भान,



अनुक्रमणिका

मानवी जीवनात्मक नाट्य या गोष्टी आहेत. पण त्याजबरोबर प्रतिकांचे सामर्थ्य हेही आहे. शिवाय बोधनाचे मार्ग अनेक आहेत. पण त्यातील चैतन्य (Spirit) लक्षात घेता, ते बुद्धीवादी असण्यापेक्षाही अधिक करून *काव्यात्मक* आहेत. कवी हा सांस्कृतिक दृष्ट्या समाजापासून दुरावलेला असतो इत्यादी. फ्राईड यांची पहिली मानसिक ऋग्ण एक महिला होती. या महिलेबरोबर त्यांचे जे काही संभाषण झाले असेल त्यात त्या महिलेने आपल्याः पित्यांचे आपल्याबरोबर लैंगिक स्वरूपाचे संबध ठेवले होते असे विधान केले. *या विधानाला प्रत्यक्ष पुरावा काहीही नव्हता.* परंतु या संभाषणाचा आधार घेऊन प्रत्येक बालकाचे *माता पिता आपल्या बालकाबरोबर लैंगिक संबंध ठेवतात असे धाडसी विधन छाती ठोकपणे करण्याच्या प्रलोभनास ते बळी पडले यांचे कारण ते प्रकृतीने रोमँटिक होते.*

फ्राईड यांच्या व्यक्तीत्त्वात दोन परस्पर विरोधी परंपरा अंर्तभूत आहेत. एकीकडे ते रोमँटिक होते. म्हणजे बुद्धीप्रामाण्यान मानता आपल्याला जे भावते ते मानणारे परंतु त्याजबरोबर ते एकोणिसाव्या शतकाच्या विज्ञानवादाचे पाईकही होते. ज्यू धर्माचे धर्मकांड वा ज्यूंच्या ठोकळेबाज धार्मिक मतांचा आदर करणारे ते खासच नव्हते. परंतु नैतिकतेसंबंधी त्यांच्या ज्या संकल्पना होत्या त्या सखोलपणे अशा होत्या की त्याकरवी ते ज्यू आहेत हे स्पष्ट होत होते. हा त्यांचा विषेश इतरही काही क्षेत्रात दिसून येतो उदा. बौद्धिक झटापटीत जो विलक्षण, आक्षेपी असा खेळ असतो वा आदान प्रदान असते त्याबद्दल त्यांना असलेले प्रेम. भास चित्राकरवी (illusion) बोधन होईल याबद्दलचा त्यांचा अविश्वास, भविष्यवेत्त्याच्या स्वरूपाची त्यांची जी बुद्धिमत्ता होती, एवढेच नव्हे तर परिपक्व असे लैंगिक सुख कशामुळे (eroticism) निर्माण होते याबद्दलची त्यांची संकल्पना या सर्वाकरवी सरतेशेवटी ते प्रकृतीने ज्यूच होते हेच सिद्ध होते. सामाजिक नियंत्रण असलेले अगर बालकाप्रमाणे निरागसता असलेले रामराज्य (utopia) प्रस्थापित होईल वा ते असेलही या संबधात त्यांची जी बुद्धिमत्ता होती ती न-नैतिकता मानणारी होती. परंतु सर्वसंग परित्याग करावा अशा होण्यालाही या भविष्यवेत्त्याने साफ नकार दिला होता. प्रत्येकाने भासचित्रात्मक बोधन देणाऱ्या वास्तवापासून (illusion) मुक्त करून घ्यावे, मनात असलेला बालिश अशा (neurotic) भावनातून मुक्त करून घ्यावे म्हणजे मग बुद्धीचा जो मृदू व मुलायम आवाज आहे त्याचे अधिराज्य येण्याची शक्तता आहे. फ्राईड यांचे शहाणपण त्यांनी प्रसारीत केलेल्या तत्वातून, सिद्धांतातून अगर सूत्रातून आविष्कृत होत नाही. मानव हा प्राणी परिपक्वतेच्या अवस्थेत कसा पोचतो या विषयीच्या त्यांच्या विवेचनातून ते आविष्कृत होते. मानस रुग्ण बरा व रोगयुक्त झाला हे केव्हा समजायचे? फ्राईड यांच्यामते त्याने आपले भवितव्य केवळ बुद्धी वापरून निश्चित करण्यास सुरवात केली की मग तो मानसरुग्ण या अवस्थेतून (neurosic) मधून मुक्त झाला आहे असे समजायचे. परिपक्व प्रेमाबद्दल, फ्राईड यांची संकल्पना काय होती? भावुकता आणि संवेदनक्षमता यांचे बेमालूम मिश्रण त्या संकल्पनेत असावे असे दिसते. या विधानाला अपवाद त्यांच्या लिखाणात शोधूनही सापडत नाही,



अनुक्रमणिका

विद्यमान काळी मुलांना स्वातंत्र्य देण्याची पालकांची जी आधुनिक प्रवृत्ती आहे, तो फ्राईड यांच्या विचाराचा वारसा आहे.

ग्रीक तत्त्वज्ञानात (stoics) नावाची एक विचारधारा व पंथ आहे. या पंथाचे दोन शब्दात अगदी थोडक्यात करावयाचे झाल्यास ते येणेप्रमाणे करता येईल. १) प्रत्येकाने आपल्या प्रकृतीची ओळख करून घ्यावी. २) त्या प्रकृतीवर ज्या नियमांचे नियंत्रण आहे, ते प्रत्येकाने स्विकारावे. हे केले म्हणजे चांगल्या जीवनाक्रमाचा शोध लागेल. फ्राईड यांच्या मानसात हा स्टॉईक पंथीय विचार आणि महान अभिजात ग्रीक नाटककार यांच्या अभिजात परंपरेचे एक विलक्षण मिश्रण होते. निसर्गाच्या नियमांचे उल्लघंन करणे. कोणत्याही कितीही कर्तबगार व पराक्रमी मानवाला शक्य नाही. हे स्टॉईक पंथीयांचे मत फ्राईडना मान्य होते. परंतु नेमक्या याच मर्यादमुळे म्हणजे याच नियंत्रणाच्या लक्ष्मण रेषेकडे अलिकडे राहताना त्यात मानवी जीवनातील नाट्य अंगभूत आहे असे फ्राईड यांना वाटत होते. फ्राईड यांचे अभिजात ग्रीक नाटकांबद्दलचे प्रेम आणि आपली मानस शास्त्रीय सूत्रे मांडताना त्यांनी त्या नाट्य सृष्टीचा केलेला उपयोग हा जगजाहीर आहे. मानवी शोकांतिकेची जाण, मानवाच्या आयुष्याची रडकथा प्रत्येकाला आयुष्यात त्यालाच भोगावेच लागणे हे अटळ आहे हे तीन मुद्दे फ्राईडनी ज्या मनोरुग्णांचा इतिहास वाचकाला पेश केला आहे, त्यातील ते व्यवच्छेदक लक्षण आहे. शोकांतिक नाट्य (Tragedy) (मनात कल्पून लिहिणारे) फ्राईड जेव्हा मनोरुग्णाला आराम देणाऱ्या धन्वंतरीच्या पोषाखात प्रवेश करतात तेव्हा ते हुकुम सोडणारे अधिकारी नसतात. या अधिकाऱ्याने दुसऱ्याच एका उद्दिष्टाने त्या मनोरुग्णाच्या जीवन-नाट्यात प्रवेश केलेला असतो. तो असा चमत्कार करू इच्छितो की प्रत्येक व्यक्तीच्या जीवनातील नाट्यात अंतर्भूत असे एक वेगळेच नाट्य घडवून आणणे, त्यात वेळप्रसंगी अदलाबदल करणे शक्य आहे का? मनोरुग्णाला या आपल्या स्वत:च्या प्रकृतीवर नियंत्रण ठेवणारे नियम स्विकारणे यातच चांगले जीवन आहे असा शोध प्रत्येकाला लागतो.

मानवी स्वभावात व व्यवहारात कोणत्याही परिस्थितीत एक प्रकारचे सातत्य असते; याबद्दल फ्राईडनी आपणास *प्रथमच* जाण दिली. या सातत्यसंबधीच्या विचारात मानवाच्या प्रकृतीच नियमपालन करण्याची प्रवृत्ती नेहमीच अंतर्भूत असते. याला पहिला क्रमांक आहे. मानवी व्यवहारात अपघात किंवा योगायोगाने अनेक घटना घडतात. पण निसर्गात अपघात घडतात. तसे त्यांना आपण मानत नाही. त्याचप्रमाणे मानवी व्यवहारातील अपघात किंवा योगायोग यांचा उपयोग एक 'स्पष्टीकरण' म्हणून करता कामा नये. एकोणिसाव्या शतकातील विज्ञान-निष्ठ यथार्थवादाने (naturalism) हे येथे उल्लेखिलेले अगदी स्पष्ट व उघड असे प्रतिपादन समाजाने स्वीकारावे यासाठी भूमी चांगलीच तयार करून ठेवली होती. म्हणूनच मानवी व्यवहाराच्या केंद्रस्थानी 'समान मानव' आहे ही यथार्थवादी स्पष्टीकरणे विस्तारीत करणे एवढेच काम, फ्राईड यांना करावयाचे होते. The Psychopathology of every-day life (दैनंदिन जीवनातील मानसिक रूग्णत्तेच्या छटा) हा फ्राईड यांचा सखोल असा ग्रंथ

नाही, परंतु या ग्रंथाचा आधारभूत मानून तयार झालेली 'Freudian-slip' या शब्दप्रयोगाने ओळखली जाणारी, इंग्रजी भाषेत एक संकल्पना आहे. मानवी वागणूक ही किती नियम पाळणारी आहे हा विचार सर्वसामान्य व्यक्तीस मान्य व्हावा. या संदर्भात या संकल्पनेचे मोठे योगदान आहे. Wundt या शास्त्रज्ञापासून तो विद्यमान काळातील वर्तन-मानसशास्त्रज्ञांनी याबाबत अगदी काटेकोर आणि वैज्ञानिक विद्वत जगातात मान्य होतील अशी स्पष्टीकरणे मांडली आहेत. पण त्या स्पष्टीकरणाना जे जमले नाही ते फ्राईड यांच्या ग्रंथावर आधारलेल्या संकल्पनेला साध्य झाले आहे. म्हणजे ते ललित-साहित्यिकांच्या जगतात ही संकल्पना मान्य झाल्याकारणाने 'फ्रुडियन-स्लीप' हा शब्द प्रयोग रूढ झाला, *पण त्या संकल्पनेला वैज्ञानिक असा काहीही आधार नाही. ती केवळ एक कवी-कल्पना आहे* एवढेच. मग या ठिकाणी प्रश्न असा उपस्थित होतो की कादंबरीकार, तत्त्वज्ञ, आणि विद्वत जगतात मानत्या पावलेले मानस शास्त्रज्ञ याना जे जमले नाही ते फ्राईड यांना का जमले? या प्रश्नाचा आपण विचार करणार आहोत.

Hacelkel या जीवशास्त्रज्ञाने एक प्रमेय प्रस्थापित केले होते. या प्रमेयानुसार प्राणी जगतातील वेगवेगळे गट किंवा प्राण्यांचे एखादे वैशिष्ट या दोन्हींचाही उत्क्रांतीमय होणारा विकास आणि त्यातील विविधता (Phyloqeny) याचे पुन:स्मरण त्यांची उत्पती वा त्यांचा विकास करते (ontogeny). फ्राईड यांना डार्विन यांचा उत्क्रांतीचा सिद्धांत हॅकेलकेल (Haceclel) *यांचा पलिकडे जाऊन विस्तारीत केला* मानवी मन ते सभ्यतापूर्व (Civilization) काळाच्या प्राथमिक (Primitive) अवस्थेतील, बाल्याव्यवस्थेतील असो, आणि मानवी मनात तयार झालेल्या प्रतिमानी (archaic) भारलेले असो या साऱ्या अवस्था मानवी मनात एकमेकावरोवर सातत्याने अस्तित्वात असतात. म्हणजे सभ्यता प्राप्त झालेल्या अवस्थेतील आणि ज्या अवस्था उत्क्रांत झाल्या आहेत त्या अवस्था या दोन्हीही अवस्था एकाच वेळी मानवी मनात हजर असतात. *या विधानाला फ्राईड काहीही पुरावा देत नाहीत, उलट तो अनावश्यक आहे असे छाती ठोकपणे सांगतात.* हे फ्राईड यांच्या ग्रंथातील एका उताऱ्यावरून स्पष्टपणे दिसून येते.

*"प्राणी जगताचा विचार करताना एकीकडे अगदी कनिष्ठ श्रेणीच्या प्राण्यापासून सुरवात होऊन, विकास होता होता अत्यंत विकसित श्रेणीच्या प्राण्यात उत्क्रांती झाली असा आपला दृष्टीकोन असतो..... परंतु दुसरीकडे मानवी मनाचा विचार करता आदीमानवाच्या मानसातून विकसित झालेल्या व्यक्तींचे विद्यमान कालीन व्यक्तीच्या मानसात परिवर्तन होत असतानाच्या काळात व हा विकास झाल्यानंतरही आदिमानवाचे मानस त्या विकसित मानसाबरोबर अस्तित्वात असते– It is superfulos to give instances in proof of it (या विधानाच्या पुराव्या करता उदाहरणे देणे अनावश्यक आहे. पुरावा देणे हे गैरवाजवी आहे) हा विकास*

*जेव्हा घडून येतो, तेव्हा सामान्यपणे विकास होताना झालेल्या दुहेरी विभाजनाचा तो परिणाम असतो. मानवी मन हा स्वतंत्र भाग आहे असे कल्पून त्याचे भाग केले तर (एका) मनोप्रवृत्ती अगर प्रेरणेचा भाग यात काहीही वदल न होता तसाच अजूनही तग धरून आहे. (दोन) त्याचवेळी इतर भाग हे त्या कालखंडाच्या विकासातून गेले आहेत. मानवी मनात आपण सातत्याने काय टिकवून ठेवतो असा जो अधिक सर्वसाधारण प्रश्न आहे. त्याच्या अगदी नजीक येऊन आपण ठेवतो.... सर्व सामान्य जीवनात आपण ज्या अतिसामान्य गोष्टी विसरतो याचा अर्थ त्या गोष्टींचा नाश करण्यात आला आहे वा त्यांचा उच्छेद करण्यात आला आहे, याचे ते विसरणे हे द्योतक आहे. या आपल्या समजूतीतील चूक आपणास ज्ञात झाली त्या वेळेपासून आपण या समजूतीच्या अगदी विरुद्ध टोकाचा दृष्टीकोन स्विकारण्याची प्रवृत्ती प्रकट करू लागतो. म्हणजे मानवी जीवनात ज्या गोष्टींनी एकादा घर केले, एकादी प्रतिमा तयार करून ती मनात धरून ठेवली तर मग त्या गोष्टी व त्या प्रतिमा कधीही नष्ट होत नाही. त्यातील प्रत्येक गोष्ट व प्रतिमा यांच्यात पुन्हा एकदा प्रकाशात येण्याचे सामर्थ्य असते. (CIVILIZATION AND ITS DISCONTENTS LONDON HOGARTH PRESS 1930 – PAGES 14 / 15)*

फ्राईड यांच्या कवी मनाची प्रथा नेमकी अशाच ठिकाणी दिसून येते. दोन टोकाला असलेल्या गोष्टीला विसंवाद ते आपल्या कवी मनाच्या प्रतिभे करवी मिटवून टाकतात, त्या कवी मनाला वैज्ञानिक स्वरूपाच्या पुराव्याची आवश्यकता भासत नाही. उदा. वयात आलेली व्यक्ती आणि बालक यांच्यात असलेला फरक हा तसा फरक नसतोच हे त्या कवी मनाने सांगितले. कवी मनच ते, जे न देखे रवी ते देखे कवी– म्हणूनच प्रत्यक्ष पुरावा सादर करण्याचा प्रश्न उपस्थितच होत नाही ! (Child was the father of man) (बालक हे मानव या प्राण्याचे पितीजी आहेत) परंतु नुसता असा उद्घोष करून त्यावर भार देऊन भागत नाही. म्हणून चतूर फ्राईड यानी त्या अडचणीतून सुटका करून घेण्यासाठी दोन सिद्धांत मांडले. (पहिला) बालकी-लैंगिकता (infantile sexualim) हा सिद्धांत त्या मानाने नीटस (ELEGANT) आहे. (दुसरा) (मानसातील लैंगिक वाढीचे टप्पे, विकास व अवस्था Psychosexual develepment) हा सिद्धांत हा मात्र गुंतागुंतीचा व ग्रेगरूळ आहे. वालक आणि वयात आलेली व्यक्ती यांच्यात असलेले अंतर भरून काढण्याच्या दृष्टीने फ्राईड यांनी केलेला तो प्रयत्न होता. फ्राईड प्रणित या लैंगिक विकासाला अवस्था पुढील टप्प्यातून जातात. मौखिक-लैंगिक सुखापासून ते गुदद्वार तेथून लिंगसुख (oral anal-phalic) अशा त्या अवस्था आहेत. हा सर्व विकास तथाकथित आहे. *वैज्ञानिकाना मान्य होईल असा काहीही पुरावा फ्राईड देत नाहीत. एवंच हा सिद्धांत कवी मनाचा खेळ आहे.* वैज्ञानिक क्षेत्रातील विद्यमान सर्वमान्य मानसशास्त्रात आणि मानवी व्यवहारबुद्धीतही (common sense) या सिद्धांताला पक्के स्थान प्राप्त झालेले नाही. परंतु मानव प्राण्याच्या त्याच्या जन्मापासून

लैंगिकतेचा सातत्याने विकास होतच असतो हा मुद्दा सर्वानाच मान्य आहे. ज्या मान्यतेचे प्रतिबिंब विद्यमान युरोप-अमेरिकन (काही प्रमाणात भारतातही) आपणास दृष्टीस पडते. उदा. या पाश्चिमात्य देशातून बालकांविषयी लिहिलेल्या पुस्तकातून या लैंगिकतेपासून वयात आपल्या व्यक्तींच्या लैंगिकतेला व्यवहारबुद्धीमुळे मानाचे स्थान दिलेले आढळते. तसेच विद्यमान काळातील तरुण-जोडपी आपल्या पाल्यांचे शंका निरसन करताना जी सुटणूक घेतात त्याकरवी हा भाग दृष्टोपत्तीस येतो. या शिवाय जीवशास्त्रात बीच (Beach) आणि इतर जीवशास्त्रज्ञानी प्राण्यावर अगदी तळागाळातील प्राण्यावरही त्या प्राण्यांना आलेल्या आपल्या बालपणीच्या अनुभवाचा वयात आलेल्या प्राण्याच्या लैंगिक वर्तनावर किती गहिरा व सखोल परिणाम होतो हे प्रयोगाने दाखवून दिलेच आहे.

विद्यमान काळी लोक आपल्या स्वप्नाबद्दल पूर्वी ज्या निरागसतेने कथन करीत होते, त्या निरागसतेने कथन करताना आढळत नाहीत. याचे कारण फ्राईड यांच्या सिद्धांतातच आहे ! जागेपणी आपण एखादे उद्दिष्ट नजरेसमोर ठेऊन, बुद्धी व युक्तीवाद यांच्या साहाय्याने वर्तन करतो. झोपी गेल्यानंतर आपणास स्वप्ने पडतात. स्वप्नात आपण काही फँटसीज (अद्‌भूत) अनुभवतो वा पाहातो. परंतु एखादे उद्दिष्ट नजरेसमोर ठेऊन हे सारे झालेले नसते, अथवा उद्दिष्ट नसतेच असे म्हणणे जास्त योग्य ठरेल. शिवाय त्या अदभूताला बुद्धी व युक्तीवाद यांची जोड वा सहाय्य नसतेच. थोडक्यात जागेपणीचे उद्दिष्ट नजरेसमोर ठेऊन केलेले वर्तन आणि स्वप्न या दोन घटनात म्हणूनच विसंवाद आहे आणि त्यात सलगता नाही. फ्राईड यांनी आपल्या सिद्धांताद्वारा याच मुद्याबद्दल प्रश्न निर्माण केले होते. त्यांच्या मते या दोन्ही घटना वरवर अलग दिसतात. तसे दिसत असले तरी त्यात सलगता आहे. फ्राईड स्वप्नासंबधी भाष्य करताना, त्यांच्या अन्वयार्थ लावण्याचा प्रयत्न करताना सुरवातीला अनेक ओबडधोबड गावरान प्रतिकांचा वापर केला होता. त्या प्रतिमात तशी नागरता नव्हती. विद्यमान काळी *फ्राईडनी वापरलेल्या प्रतिकांचा दिवसेदिवस अधिक प्रमाणात त्याग केला जात आहे हे खरे.* परंतु व्यक्तीने लपविलेल्या इच्छा आणि भिती यांचे प्रतिनिधित्व स्वप्ने करतात ही कल्पना *वैज्ञानिकात नसली* तरी सामान्य जगात सर्वमान्य झालेली आहे. लेखक आणि कलावंत यांच्या हातात फ्राईड यांनी एक हत्यार ठेवले आहे. साहित्य व कला यांच्या समीक्षकानी फ्राईड यांचा, नवनिर्मितीच्या कामात अबोध मनातील सखोल प्रक्रिया कार्यरत असतात, या सिद्धांताला आपल्या क्षेत्रात मान्यता दिलेली आहे. त्यामुळे कलावंत, मानव विद्या आणि वैज्ञानिक यांच्यात जो अदृश्य अनुबंध असतो. तो 'समजावून' घेण्याच्या कामात समीक्षकाना या सिद्धांताची फार मदत झालेली आहे. त्यांची जाण सजग होण्यात त्याचे चांगलेच योगदान आहे. (नवी क्षितिजे मधील या पूर्वीच्या अनेक लेखातून यासंबधीचे विवेचन येऊन गेलेले आहे)



अनुक्रमणिका

मानसिक आजार आणि मानसिक आरोग्य यात आपण कालपर्यंत त्या दोन टोकाला असलेल्या अवस्था आहेत असे मानत आलो होतो व तसा फरक त्यांच्यात आहे असे समजत होतो. त्यातली एक अवस्था निरोगी व्यक्तीची आहे हे आपण मान्य केले होते. पण फ्राईड यांच्या सिद्धांतामुळे आपणास जणू वारसा हक्काने वेगळाच दृष्टीकोन प्राप्त झाला आहे. एखाद्या व्यक्तीला या मानसिक वा अन्य अडचणीना व संकटाना सामोरे जावे लागते. त्याची अगदी पराकोटीची प्रतिक्रिया मानसिक संतुलन (neurosis) बिघडण्यात होते. हा जो फ्राईड प्रणित दृष्टीकोन आहे, तो दोन दृष्टींने क्रांतीकारक आहे. *एकतर* हे सूत्र मांडले जाणे हीच क्रांतीकारक घटना आहे. *दोन* या दृष्टीकोनामुळे सामाजिक व्यवहारात उत्पन्न होणाऱ्या तदनुषंगिक गोष्टीही क्रांतीकारक आहेतच. मुळातले 'बीज' वाईट असल्याने मानसिक आजार असलेली संतती होते. त्याजबरोबर पाश्चिमात्त्य जगतात एकोणिसाव्या शतकात प्रचलित असलेल्या रोगांची वर्गवारी करून अमूक अमूक व्यक्तीच्या संततीला आजार भेट देतात, तसेच पिशाश्चांच्या बाधा होते आणि सरतेशेवटी ईश्वरी न्यायाने मिळालेली शिक्षा या सर्वांमुळे मानसिक संतुलन बिघडते असे त्याकाळी समजण्यात येत होते. परंतु यापैकी एकाही तत्त्वातून वा सिद्धांतातून जागरूक विद्यमान काळी जे सर्वसामान्य आजार आहेत त्यामुळे काही मानसिक रुग्णांना जे सोसावे लागते त्याकडे सहृदयतेने पहावे यासाठी काहीही आधार नव्हता. तो फ्राईड यांच्या सिद्धांतामुळे त्याला *वैज्ञानिक स्वरूपाचा काहीही आधार नसतानाही प्राप्त झाला.*

वैज्ञानिक शास्त्रज्ञ म्हणून फ्राईड यांना विद्यमान काळी कोणी मान देत नाही. पण त्यांच्या कवी मनाने कल्पिलेल्या संकल्पनाना मात्र सर्वसामान्यात व खास करून गूढवादी विचारसरणीच्या लोकांत मान्यता आहे. सरतेशेवटी या संबधात आणखी एक मुद्दा नमूद करावासा वाटतो. मानवाच्या परिस्थितीत (human condition) असलेल्या सलगतेबद्दल फ्राईड यांच्या विचारामुळे अधिक सखोल अशी मानवी बंधुत्वाची जाण मानवाच्या आवाक्यात आली आहे. एकेकाळी जे अनिष्ट (evil) आहे असे मानले जाऊन, त्याचे ताडन केले पाहिजे, त्याला शिक्षा केली पाहिजे असा आग्रह सर्वसामान्य लोक धरीत होते. विद्यमान-काळी फ्राईड यांच्या सिद्धांतामुळे काही झाले तरी सर्वसामान्य लोक त्याबाबत आग्रही नसतात. या उलट त्या अनिष्ट प्रवृत्तीकडे सहानभूतीने पाहिले जाते. आजारी मनाची जी अभिव्यक्ती आहे या स्वरूपात त्या प्रवृत्तीकडे पाहिले जाते, हे खरे आहे. *परंतु ही व्यक्ती दुष्ट वा अनिष्ट प्रवृत्ती प्रकट करणारी आहे म्हणजे ती आजारी मनाची अभिव्यक्ती आहे. या दोन टोकाच्या विचारातून निर्माण होणाऱ्या जटिल समस्येचा अजून तरी निचरा झालेला नाही ही वस्तुस्थिती आहे. या गुंत्याची सोडवणूक करणे हे आपल्या विद्यमान युगासमोर असलेले एक नैतिक असे महान आव्हान आहे.* दुसऱ्या एका प्रश्नाकडे वळूया. फ्राईड यांच्या दृष्टीकोनाला प्रथम प्रखर विरोध झाला. परंतु या विरोधानंतर मानवी संबधाच्या ज्या सर्वमान्य संकल्पना



अनुक्रमणिका

होत्या त्या बाबत फ्राईड यांचा जो दृष्टीकोन होता त्याला कोणालाही कल्पना नव्हती इतका तो का यशस्वी झाला?

याला अनेक कारणे आहेत. त्यापैकी एकाचा विचार आपण या पूर्वीच केलेला आहे. उदा. पाश्चिमात्त्य जगत हे संघटित, सुसंवादी, अंगभूतपणे संशयापलिकडे असलेली व मूलभूत (organic) गुणवैशिष्टे असलेल्या घटना प्रक्रियाबद्दल यथार्थवादी (naturalistic) स्पष्टीकरणे स्वीकारण्यास नेहमीच राज़ी असतो, आणि त्याचबरोबर मानसिक पातळीवर अशी स्पष्टीकरणे मान्य करण्यास अधिक मानसिकता दाखवितो. युरोपमध्ये ही प्रवृत्ती गेली चार शतके दिसून येते. त्यात कधीही खंड पडलेला नाही या चार शतकात वैज्ञानिक प्रगती सातत्याने होतच आहे. उदा. डार्विन प्रणित उक्रांतीवादाने जीवशास्त्र या ज्ञानशाखेवर सरतेशेवटी शिरपेच खोवला. डार्विन यांच्या या सिद्धांतामुळे मानवा व्यक्तिरिक्त जे प्राणीजगत आहे, त्यात व मानवी जगतात कोणतीही दुरी नाही. त्यांच्यात सलगत आहे हे दाखवून दिले गेले होते. यथार्थवादाचा (naturalism) उदय असे दाखवून देतो की डार्विन यांचा सिद्धांत हा निसर्ग समजावून घेण्याचा एक मार्ग आहे. पण एकीकडे हा उदय व उत्कर्ष होत असताना असे दिसते की धर्माधिष्टीत अशी जी स्पष्टीकरणे होती व ती का आहेत त्यांच्या बावतच्या अपेक्षात दिवसेदिवस क्षीणता आली आहे. पाश्चिमात्त्य जगातील एकोणिसाव्या शतकाच्या शेवटच्या चरणात एका प्रसिद्ध विचारवंताच्या उद्‌गारानुसार धर्म हा 'कसल्याही तत्त्वप्रणालीबद्दल आपणास काही ज्ञात नाही. अगर आध्यात्मिकता म्हणजे सर्व प्रकारच्या घटना / विचार जमा करणारी आहे अशी न-वैज्ञानिक भूमिका स्विकारण्यास धर्माने अनेकवेळा संमती दिलेली आहे. (too often agreed to accept the role of a non scientific spiritual grab or an idologiacl know-nothing) मानवाच्या परिस्थितीवर (human condition) प्रकाश टाकण्याचे व तीचे स्पष्टीकरणे देण्याचे धर्माने केव्हाच सोडून दिलेले आहे. परंतु त्याजवरोबर 'मानवाच्या परिस्थितीने'ही विज्ञानाशी जुळवून घेतलेले नाही. मानवाबद्दलची सर्वसाधारण अशी जी संकल्पना होती तिच्यात परिवर्तन घडवून आणण्यात विज्ञानाला अभिप्रेत असलेल्या कारण-परिणाम, या स्वरूपाचे विवेचन त्या संकल्पनेत अंर्तभूत करण्यात यश आलेले नाही. हे खरे आहे. परंतु वैज्ञानिक स्वरूपाच्या विवेचनात ज्या त्रुटी व फटी-होत्या त्या फ्राईड यांच्या उत्फूर्त स्फूर्तीदायक प्रतिमानी आणि त्यांच्या सिद्धांताकरवी त्या नाहीश्या होणार होत्या. फ्राईड यांच्या कवी मनात स्फुरलेल्या सिद्धांतामुळे ते घडूनआले. *वैज्ञानिकांच्या वर्तुळात* नसली तरी सर्वसामान्य सुजाण माणसाच्या मनावर फ्राईड यांनी निर्माण केलेले मिथ्थक सिद्धांत यांची पकड अजूनही आहे. त्या सर्वांना एखाद्या तत्त्वप्रणालीचे स्वरूप प्राप्त झाले असूनही तिची ताकद व त्यातील सामान्यजनाना स्फूर्तिदायक वाटणाऱ्या प्रतिमा फ्राईड यांच्या मूळ सिद्धांतात असावी. मानवी अस्तित्वाच्या दृष्टीने आवश्यक असा जो मानसिक भाग आहे त्याच्यात अंर्तभूत असलेल्या त्या प्रतिमा



अनुक्रमणिका

आहेत, या आवश्यकतेसंबधी अनेक वैज्ञानिक दृष्टीकोन आहेत. तिच्यातील शोकांतिक स्वरूपाच्या निर्देश करणारे, त्या आवश्यकतेतील संबधी कवी मनाचेही अनेक दृष्टीकोन आहेत. *फ्राईड यांच्या कवी मनाने निर्माण केलेल्या त्या स्फूर्तीदायक प्रतिमात हे सारे दृष्टीकोन सामील होऊन ते प्रकट झाल्याचे आढळून येते.* नेमकी ही वैशिष्टे फ्राईड यांच्या सिद्धांतात अथवा त्याची मूळे त्या सिद्धांतात आढळतात. या सिद्धांतातून अंर्तभूत असलेली सूत्रे प्रत्यक्ष प्रकट करणारे अनेक सर्वसामान्य सुजाण माणसे आपल्या दैनंदिन जीवनात आढळतात. उर्जेने भरलेला सुखासिनतेचा पाठलाग करणारा आंधळा वाासनापिंड (id) शिक्षा करण्यास आतूर असलेला कर्मठ असा आदर्श पिंड (super ego) इतरांच्याकडे असलेली उर्जा आपल्या अस्तित्वासाठी आपल्या वापरासाठी खेचून घेऊन आपल्या अस्तित्वासाठी झुंजणारा "आत्मपिंड" हे सारे नाट्य आटोपशीर असेच व रूक्ष असेच मितव्ययी आहे. वासनापिंडाला अनेक वेळा झटके येतात. या झटक्यामुळे उत्पन्न होणाऱ्या धोक्याशी मुकाबला करण्याकरीता 'आत्मपिंड' अनेक प्रकारच्या कावेबाज यंत्रणा विकसित करतो उदा. नकार, प्रक्षेपण अथवा तश्याच प्रकारच्या अनेक क्लुप्त्या. अशा प्रकारे या नाट्यातील पात्रामध्ये समतोल व संतुलन प्रस्थापित केले जाते. प्रकृती आणि मानसिक संतुलन, या प्रस्थापित झालेल्या परिस्थितीत अनुस्यूत आहेत. रचनेत असलेले भाग सुटे करण्याचे (decomposition) नाट्यमयतंत्र फ्राईड यांनी वापरले होते. म्हणजे एकाच जीवनात जी अनेक पात्रे असतात त्यांना अलग करून त्यांचा विचार करणे व मग त्यांचा साकल्याने विचार करणे. फॅन्टसी आणि स्वप्ने यात या तंत्राचा वापर होतो. हे त्यांनी जाणले होते वा तशी कल्पना केली होती. त्यांनी आपल्या 'The poems and the daydreams' या निबंधात या तंत्राचा गौरव केल्याचे आढळते. आपण या विषयांची चर्चा या अगोदरच केली आहे.

याशिवाय या त्यांच्या सिद्धांतात अनेक प्रतिमा अंर्तभूत आहेत. प्रत्येक व्यक्तीला अनुभव सतत मिळतच असतो. त्या अनुभवाशी त्या व्यक्तीचे आदान-प्रदान, वाद-संवाद, क्रिया-प्रतिक्रिया होते; व त्यातून तिला गती मिळते. या सर्व प्रक्रियेशी त्या प्रतिमांचा सूर अगदी ताबडतोब जुळतो. परंतु हे खरे आहे की हा वरवरचा असा जो जाणीवपूर्वक अनुभव आहे त्याचा या प्रतिमा भाग होत नाहीत. परंतु मानवासमोर असलेले पेचप्रसंग, त्याला करावे लागणारे संघर्ष, त्याला येणारे मानसिक झटके, त्याची गुपिते, त्याला भेडसावणाऱ्या उर्मी, व त्यांची शोककारक अशी गुणात्मकता त्यात त्या प्रतिमा अगदी चपखलपणे बसतात.

फ्राईड यांच्या सिद्धांतात वैज्ञानिक अशा ज्या प्रतिमा आहेत. त्यात अभिजात यांत्रिकीतील बराचश्या आहेत. या प्रतिमांची त्या सिद्धांताला आवश्यकता होती. काही प्रतिमा जल यांत्रिकेतल्या (hydraulics) आहेत. उदा. एखादी उर्मी एखाद्या ठिकाणी दावून टाकली तर दुसऱ्या एखाद्या ठिकाणी ती आपल्याला वाट करून बाहेर पडते. ही एकंदर फ्राईड पद्धती बंद (closed) असल्यासारखी आहे (याबद्दलचे विवेचन या लेखाच्या सुरवातीलाच आहे) व

तशीच ती यांत्रिकी आहे, काही वेळी ती विद्युत यांत्रिकी क्षेत्रातही प्रवेश करते. विद्युतभार (charge) असल्यासारखे मानसिक उर्जेचे केंद्र तयार होते– किंवा एका विशिष्ट पाटातून ती मानसिक उर्जा वहात असते. एकाएकी या पाटात अडथळे उत्पन्न होतात व हा प्रवाह बंद पडतो. असे झाले म्हणजे मग त्या उर्जेत असणारा जो विद्युतभारा सारखा असलेला भार नाहीसा होतो. फ्राईड आपले मानसशास्त्रीय सिद्धांत ज्या काळात मांडत होते वा बसवित होते, त्या काळातील जे पदार्थविज्ञान शास्त्र होते त्याला अनुरूप अशीच त्या सिद्धांताची मांडणी, विचार वा त्यात अंर्तभूत असलेल्या अभिजात यांत्रिकी प्रतिमा आहेत.

सरतेशेवटी या प्रतिमासंवधी एक महत्त्वाचा मुद्दा नमूद करावयास हवा. माणसाच्या म्हणून ज्या प्रतिमा फ्राईड यांच्या सिद्धांतात सादर करण्यात आल्या आहेत, त्या सर्वस्वी धर्मातीत (Secular) आहेत. 'परिपक्व मानव' आदर्श आहे. बाल्यावस्थेत ज्या प्रकारे मानसिक संतुलन बिघडते, (Neurosis) त्याचा स्पर्शही फ्राईड यांच्या सिद्धांताला अभिप्रेत असलेल्या मानवाला झालेला नसतो. आपला स्वत:च्या मार्ग क्षमतेचा पाठपुरावा त्याने करावा. परंतु एकीकडे रामराज्यवाद (utopia) आणि यती धर्म (asceticism) या दोन्ही अवस्था-पासू फ्राईड यांनी आपला सिद्धांत अलग व स्वतंत्र ठेवला आहे. या कारणामुळे डाव्या (रामराज्य ही अवस्था त्याज्य ठरविल्याकारणाने) व उजव्या (यतीधर्म ही अवस्था ठरविल्याकारणाने) विचारसरणीच्या लोकांकडून त्यांना प्रहार सहन करावे लागले. त्या दोन्ही तत्त्वप्रणालींच्या दृष्टीकोनातून या फ्राईड यांच्या सिद्धांताकडे तुच्छतेने व घृणेतून पाहिले जाते. परंतु दिवसें- दिवस वर्धिष्णू उदारमतवादी बुद्धीजीवी वर्गियाकडून या प्रतिमांचे स्वागत अगदी राजीखुषीने झालेले आहे. आध्यात्मिक स्वरूपाशी ठोकळेबाज विचारसरणी जी समाजात तयार होत असते तिच्या विरूद्ध संघर्ष करण्याच्या उद्देशाने संघटित होण्यासाठी फ्राईड यांनी मांडलेला 'मानवाचा आदर्श' हा केद्रबिंदू बनला आहे.

फ्राईड यांनी लैंगिकता आणि उर्मी (impulse) यांचे समीकरण मांडलेले आहे. विद्यमान काळी या समीकरणास रास्तपणे विरोध केला जातो. परंतु हे समीकरण साहित्यिक क्षेत्रात फारच प्रेरणादायी ठरलेले आहे. फ्राईड यांना हे समीकरण मांडून जुन्या व्हिक्टोरियन कर्मठ विचारात आमूलाग्र बदल घडवून आणलाच. म्हणजे डार्विन यांनी ज्या प्रकारची वैचारिक क्रांती घडवून आणली, तोच पराक्रम फ्राईड यांनी केला असे बहुसंख्य सामान्य जनाना वाटते.

चिसाव्या शतकातील सर्व सामान्य मनुष्य, त्याचे वैचारिक विश्व समजावून घेण्याच्या दृष्टीने न्यूटन प्रणित पदार्थ विज्ञान शास्त्र आणि डार्विन यांनी मांडलेला उत्क्रांतीवाद यांचे योगदान फार प्रचंड आहे. त्याच प्रकारचे योगदान फ्राईड यांच्या सिद्धांतानी केले आहे असे काही महाभाग अजूनही सांगतात. परंतु फ्राईड यांचे हे शार्गिद हे मोठी गफलत करतात फ्राईड यांचे सिद्धांत वा त्यांचे विचार हे त्या जातकुळातील आहेत असे मानणे हे साफ



अनुक्रमणिका

चुकीचे आहे. म्हणूनच नोबेल पारितोषिक विजेते. प्रख्यात शास्त्रज्ञ फ्राईड यांचे वर्णन 'a big fraud' असे करतात व त्याचा प्रतिवाद कोणीही केलेला नाही यासंबधीचा उल्लेख या लेखाच्या सुरवातीलाच केलेला आहे त्याचे वाचकाना स्मरण देत आहे. ते त्यांचे स्वरूप वैज्ञानिक नसून ते एक रूपक (metaphor) आहे एक नाट्य आहे– थोडक्यात कवी-मनाचा आविष्कार– मानवी मानस समजण्यास मदत होण्याच्या दृष्टीने एक आदर्श उदाहरण आहे. मानव कसा असतो वा कसा असावा याबद्दल आडाखे बांधण्याचा तो मार्ग आहे, ते एक नाट्य आहे एवढेच त्या फ्राईड यांच्या तथाथित सिद्धांताबद्दल म्हणता येईल. *अर्थात फ्राईड यांचे जे अंधभत्त नाहीत.* त्यांच्यामते मानसशास्त्रातील सिद्धांतरूपी प्रचंड इमारत कोणीतरी वैज्ञानिकांने उभारावी यासाठी फ्राईड यांनी पायाभरणी केली आणि विसाव्या शतकाने ती टोलेजंग इमारत उभारावी यासाठी सुविधा प्राप्त करून दिलेली होती. परंतु प्रत्यक्षात तसे काही घडले नाही हे त्यांना मान्य आहे. परंतु त्यातले काही अजूनही आशावादी आहेत. (उदा. नवी क्षितिजेचे एक भूतपूर्व संपादक सांगत असत की, 'मनाचे मॉडेल' (फ्राईड प्रणित मॉडेल) जो पर्यंत बदलत नाही तोपर्यंत फ्राईड कालबाह्य होणार नाही.' हे विधान त्या संपादकाच्या शार्गिदाच्या लेखातून घेतलेले आहे) याहीपेक्षा एक महत्त्वाचा पैलू फ्राईड यांच्या विचारात आहे असे हे फ्राईड यांचे अंधभक्त नसलेले (?) चहाते सांगतात. त्यांच्या मते फ्राईड यांनी आपणास मानवाची अशी प्रतिमा उपलब्ध करून दिली आहे की, माणूस घृणास्पद वा तिरस्कारणीय न बनता तो आपल्या सर्वांच्या आवाक्यात आला आहे, त्याला म्हणूनच समजावून घेता येते. हे असे खरोखरीच घडले आहे का? याचे उत्तर आपणापैकी सर्वानाच देता येईल.

---

उत्तम कल्पना नेहमी केव्हा सुचतात? मला या ठिकाणी असे नमूद करावयाचे आहे की, त्या आपण त्यांचा ध्यास घेऊन पाठपुरावा करीत असतो, त्यावेळी नाही. परंतु आपण जेव्हा अधिक मोकळ्या ढाकळया मानसिक अवस्थेत असतो तेव्हाच मला तरी उत्तम कल्पना सुचतात.

.... मी दर रविवारी एकटाच चांगला दूरवर फिरायला जातो. या माझ्या पदभ्रमणात अत्यंत रमत गमत प्राप्त परिस्थितीचे परिक्षण करण्याची माझी प्रवृत्तीमुळे हे असे प्रसंग अनेक वेळा अत्यंत फलदाई होते. अर्थात फिरायला जाण्यामागचा हेतू संशोधन नसून आपल्या मनावरचा ताण कमी करावा हा प्रमुख हेतू होता. म्हणूनच त्या उत्तम कल्पना मला सुचत असतीलही.

– पॉल डिरॅक



अनुक्रमणिका

# समाजशास्त्र

## आधुनिकीकरणाचे गतिशास्त्र

- नाना जोशी

### उपोद्घात : क्रांतीकारी युगाचे आव्हान

प्रथम एका शब्दाचा खुलासा. मानव प्राणी हा शब्द जेव्हा या लेखात येईल, तेव्हा तो प्राणी जगतातील एक प्राणी या अर्थाने आहे. मानव-मानवजात हा इंग्रजी भाषेत Homo Sapiens - (आधुनिक मानव, शहाणा मानव) या अर्थाने वापरला जातो, तोच अर्थ या लेखात अभिप्रेत आहे.

मानव जातीच्या एका महान क्रांतीकारी परिवर्तनाचा अनुभव आपण घेत आहोत. मानवी जीवनाचे प्रश्न जुनेच आहेत. विज्ञान आणि तंत्रविज्ञान यांचा फार झपाट्याने विकास होत आहे. या दोन्ही क्षेत्रातील संशोधनाचा उपयोग करण्याच्या प्रयत्नात वेगवेगळ्या समाजातील लोक आहेत. जगात सर्वत्रच याचा अनुभव आपणास येईल या संशोधनाचा वापर केल्याकारणाने जे सामाजिक बदल होतात त्यातून त्या सामाजिक बदलांचे आकृतिबंध तयार होतात. या बदलातून मानवाची परिस्थिती सुधारण्याच्या दृष्टीने आजवर कधीही उपलब्ध नव्हत्या एवढ्या शक्यता प्राप्त झाल्या आहेत. परंतु मानवाने आजवर ज्याची कधीही कल्पना केली नव्हती अशा विनाशाची शक्यताही मानवाला धमकावित आहेत. या सामाजिक बदलांच्या शक्तीही समजावून घेण्याचा शोधही अगदी निकडीचा आहे. त्यात अपयश आले, तर त्यामुळे विनाश होण्याचा संभव नाकारता येणार नाही. या क्रांतीकारी शक्तीवर प्रभुत्व मिळविणे ही जागतिक राजकारणाची मध्यवर्ती समस्या झाली आहे. एवंच मानवाने एक प्रकारे सर्वस्व पणाला लावले आहे. जगात शांतता नांदावी यासाठी मानवाने संघर्ष केला नाही तर सर्व विनाशाचा धोका त्याच्या समोर आ वासून उभा आहे. मानवी कल्याणाला पोषक ठरेल या प्रकारे या परिवर्तनाला दिशा मिळावी यासाठी पहिले पाऊल उचलणे कोणाला शक्य आहे? मानवी समाजातील ज्या गोष्टींत बदल अपरिहार्यपणे झालाच पाहिजे आणि ज्या गोष्टी काहीही झाले तरी टिकवून धरल्या पाहिजेत हे ज्यांनी समाजावून घेतले आहे त्यांनाच हे पहिले पाऊल उचलता येईल. तसेच जगातील वेगवेगळ्या समाजावर ज्या प्रकारे परिणाम झाले आहेत, कोठचे परिणाम झाले आहेत हे ज्यांनी अत्यंत स्पष्टपणे समजावून घेतले आहे, त्यांनाही हे पहिले पाऊल उचलता येईल.



अनुक्रमणिका

मानवी व्यवहारात सध्या जो बदल घडत आहे त्याची व्याप्ती आणि प्रखरता फार मोठी आहे. या अशा प्रकारचा अनुभव मानवजातीने या पूर्वी फक्त दोनदा घेतला होता, जागतिक इतिहासाच्या आजवरच्या संपूर्ण चाटचाली संदर्भातच या बदलांचे महत्व समजेल, त्या संदर्भाशिवाय त्याचे महत्व समजणारच नाही. आदिमानवाची (Primates) शेकडो वर्षे उत्क्रांती होत असताना सुमारे १० लाख वर्षापूर्वी मानव हा प्राणी या पृथ्वीतलावर अवतरला, मानवाने अनुभवलेले हे पहिले क्रांतीकारी परिवर्तन. रेडीओ ॲक्स्टीव्ह (किरण विसर्जन क्षमता असलेल्या) वस्तूंच्या पृथ्थकरणातून रासायनिक तपासातून, पृथ्वी व सूर्य मालेचा जन्म केव्हा झाला याबद्दल अंदाज बांधण्यात आले आहेत. आपण ज्या स्वरूपात आज ही पृथ्वी पहातो त्या स्वरूपातील पृथ्वी ही सुमारे वीस बिलीयन वर्षे अस्तित्वात आहे. सूर्यमाला ही सुमारे साडेचार बिलियन वर्षापूर्वी अस्तित्वात आली. पृथ्वीवर जीवसृष्टी उत्क्रांत होण्यासाठी, सूर्यमाला तयार झाल्यानंतर अडीच बिलियन वर्षांचा काळ लागला. आदीमानव या पृथ्वीतलावर प्राणी सृष्टीची उत्क्रांती होऊन अवतरला तो सुमारे एक बिलियन वर्षापूर्वी असा अंदाज आहे. हे सर्व लक्षात घेतल्यानंतर मानवाचे या पृथ्वीतलावर प्राणी सृष्टीची उत्क्रांती होऊन तो अवतरणे हे केवढे परिवर्तन होते, त्याची व्याप्ती केवढी मोठी होती याची कल्पना येईल. मानव जातीला (homo sapiens) त्या प्रकारचा तो पहिलाच अनुभव. मानव हा प्राणी पृथ्वीतलावर अस्तित्वात येण्यापूर्वीचे जीवन आणि मानव या थरावरच्या प्राण्यात प्राणी सृष्टीत उत्क्रांत झाल्यानंतरचे जीवन यात फरक हा असणारच. ही सर्वच प्रक्रिया कमालीच्या संथ वेगाने झाली हेही सत्य आहे. परंतु 'मानव-प्राणी सृष्टी' आणि मानव जात या दोहोंत जो लक्षणिय फरक आहे त्या कारणानेच त्या घटनेला क्रांती म्हणणे हे अतिशयोत नाही हेच आपल्याला आढळून येईल. 'मानवजात पूर्व प्राणीसृष्टी' समजावून घेण्याच्या उद्देशाने मानवशास्त्रज्ञ विद्यमानकाळी बॅबून जातीच्या माकडांच्या कळपांची पहाणी करतात. तसेच दुसऱ्या अनेक जातीच्या माकडांची (Primates) समाजांचा अभ्यास करतात. माकडांचे समाज आणि मानव-जातीचे समाज या दोहोंतले फरक किती लक्षणिय व प्रचंड आहेत हे त्यांच्या अभ्यासावरून स्पष्ट होते. माकडांच्या समाजातही सामाजिक अशी चाल-वागणूक, शिष्टाचार असतात. त्यांच्यात समाज संघटनही असते. ते काहीही असले तरी या माकड समाजाच्या कर्तृत्वाचा आवाका वेगळ्याच प्रकारचा असतो. त्याचे स्वरूप मानव समाजापेक्षा अगदी वेगळे असते. मानव हा प्राणी उत्क्रांत झाल्यानंतरच्या अगदी सुरुवातीच्या काळातला मानव हा अवजारे बनवित होता, संरक्षणासाठी शस्त्रे तयार करीत होता आणि प्राथमिक स्वरूपाची का होईना दळणवळणाची साधनेही त्याच्यापाशी होती, निवाऱ्यासाठी तो घरे बांधीत होता. बोलीभाषेच्या द्वारे, लिहिलेल्या खुणांच्या द्वारे, चिन्हांच्या द्वारे तो एकमेकांशी संपर्क साधत असे. आपल्या समाजाचे संरक्षण करण्यासाठी, सुरक्षिततेसाठी, परस्परास मदत करण्यासाठी, तो मोठ्या मानवी गटात संघटीत होत असे. तो अन्नधान्याची



अनुक्रमणिका

निर्मिती करी, अशा प्रकारे निर्माण केलेले धान्य बराच काळ टिकावे यासाठी त्यावर संस्कार करून त्याचा साठा करी. अनेक वेगवेगळ्या मार्गानी आपले हेतू साध्य करण्यासाठी तो निसर्गावर प्रभुत्व मिळवी, त्याला आपलेसे करी. या अशा सर्व साधनांचा व मार्गांचा अवलंब करून आपल्या भविष्यकाळावर काही प्रमाणात तरी त्याला नियंत्रण ठेवता येत असे. हे सारे परिवर्तन होताना मानवी शरीरातही फरक झाला होता. मानवी मेंदूचा आकार तिप्पटीने वाढला, मानव अवजारांचा वापर करू लागल्यानंतर मेंदूच्या या आकारवाढीच्या गतीस वेग प्राप्त झाला होता.

अगदी आरंभीच्या काळात मानवी समाजाचे परिवर्तन सुसंस्कृत समाजात होणे ही देखिल मानवी जगातील क्रांती होती. सामाजिक बदल हा मानवी समाजात सतत होतच असतो. परंतु आरंभीच्या काळात त्याची व्याप्ती अगदीच बेताची असे. त्या कारणाने त्यातील प्रखरता कोणाला जाणवत नव्हती. परंतु ही व्याप्ती आणि प्रखरता या दोन्हीही बाबतीत त्याकाळी आगळा अनुभव मानवी समाजाला दोन वेळा आला. त्यातील एकाचे वर्णन या मागाच्या परिच्छेदात येऊन गेलेच आहे. आदिमानवी समाजांचे सुसंस्कृत समाजात परिवर्तन होऊन त्या मानवाला आलेला अनुभव. दोन अनुभवांचा उल्लेख यापूर्वी केलाच आहे. त्या दोहोंतला हा दुसरा अनुभव. आदिमानवी समाजांचे सुसंस्कृत समाजात परिवर्तन होणे या प्रक्रियेने सात हजार वर्षापूर्वी परमोच्च बिंदू गाठला असे म्हणता येईल. तीन नद्यांच्या खोऱ्यात हे सांस्कृतिक परिवर्तन घडून आल्याचे दिसते. टायग्रिस आणि युफ्राटीस या नद्यांच्या दरम्यानचा प्रदेश, इजिप्त मधिल नाईल नदीचे खोरे, आणि हिंदुस्थानातील सिंधू नदीचे खोरे,क्रांती प्रथम या तीन ठिकाणी झाली. इतरही अनेक ठिकाणी मागाहून हे परिवर्तन घडून आले, व तेही अगदी स्वतंत्रपणे. म्हणजे या पहिल्या तीन केंद्रातून उसनवारी व देवाण घेवाण न करता ते झाले असावे असा अंदाज आहे. ग्रीस मधिल क्रिट या बेटावर, चीन मधिल यलो नदीच्या खोऱ्यात आणि तीच्या उपनद्यांच्या अनेक खोऱ्यात ही सांस्कृतिक क्रांती घडल्याचेही आपणास आढळते. क्रीट बेटावरचा आणि चीनमधील यलो नदीचे खोरे या ठिकाणचे समाज सुमारे पांच हजार वर्षापूर्वी उदयास आले. मध्य अमेरिका आणि अँडीयन नदीचे खोरे. या सर्व ठिकाणी सुमारे चार हजार वर्षापूर्वी जमिनीच्या अगदी साध्यासुध्या नांगरटीपापासून, तो संघटीत शेती करण्यापर्यंत परिवर्तन होण्यासाठी मानवी समाज टोळ्यांच्या स्वरूपात संघटीत होणे, खेड्यातून वसती करण्यापासून त्यांचे शहरात आणि राज्यात रूपांतर होणे, हे सर्व सामाजिक बदल या सातही विभागात घडून आले आहेत. हे सांस्कृतिक समाज, आदिम-मानवी समाजापेक्षा अधिक मोठे होते, अधिक गुंता-गुंतीचे होते. परस्परांशी संपर्क साधण्यासाठी, त्या समाजात लिखित अशी भाषा, खूणा, चिन्हे इत्यादींचा वापर करण्याच्या पद्धती प्रचलित होत्या. यापैकी मध्य अमेरिका, आणि अँडीयन समाज हे ह्या मानाने, त्या काळी आदिम मानवी समाजांच्या सारखेच होते.



अनुक्रमणिका

या सुसंस्कृत समाजाबद्दल सर्वात महत्वाची गोष्ट सांगावयाची म्हणजे त्या समाजाचे वैचारीक विश्व. या समाजाकडे अत्यंत तरल (Sophishicated) संकल्पना होत्या या समाजाच्या धार्मिक श्रद्धातून मानवी वैशिष्ट्यातून आणि अस्मितेतून (identity) मानव-मानवातील संबंधातून, मानवी भावनातून या संकल्पना आविष्कृत होत होत्या, त्याजबरोबर मानवी आकलनशक्तिपलिकडे असलेल्या, ज्यांच्याबद्दल मानवाला संपूर्ण ज्ञान होणे शक्य नव्हते, अशा गोष्टींबद्दल मानवाला आपल्या स्वत:च्या अनुभवातून ज्ञान प्राप्त झाले होते. या अनुभवातून फार जटील अशा सत्याची जाण त्याला आली होती. त्याकरवीही या संकल्पना आविष्कृत होत. अगदी प्रारंभीच्या काळातील सुसंस्कृत समाजाच्या धर्मांना पाणी पृथ्वी, आणि प्रजानिर्मिती या सर्वांबद्दल वाटणारी चिंता, समान होती. त्या काळात, ज्ञात असलेल्या पृथ्वीवरील विचारात अंगभूत असलेली कायम स्वरूपाची सत्ये याबद्दल त्या काळच्या सुसंस्कृत समाजाची जाण ते धर्म व्यक्त करीत होते. वेगवेगळ्या प्रकारच्या अमूर्त अशा निरनिराळ्या प्रतिमांच्या द्वारा ही जाण व्यक्त केली जाई. ही जाण ही ज्या पातळीवर असे, त्या करवी त्या जाणीवेची प्रवृत्तीही प्रकट होत होती. विद्यमान काळी या अशा प्रकारच्या ज्ञानात महत्वाची व लक्षणीय अशी भर पडण्यासाठी हजारों वर्षांचा काळ लोटावा लागत नाही. आदीम समाजाच्या बाबतीत ते खरे होते. म्हणजे त्या समाजाला हे ज्ञान प्राप्त करून घेण्यासाठी हजारो वर्षे वाट पहात बसणे भाग होते. त्यानंतरचे सुसंस्कृत समाज विकसित झाले असल्याने, त्यांना पुरेशी गतिमानता प्राप्त झाली. या गतिमानतेमुळे मानवी व्यवहारात बदल करण्याची शक्यता मानवाला आली, त्याजबरोबर त्या समाजाना तत्पूर्वी ज्ञात नव्हती, वा अनुभवलीही नव्हती अशी अस्थिरताही त्या समाजात आली. थोड्या शतकांच्या अवधित या सुसंस्कृतसमाजाची प्रकृती आमूलाग्रपणे बदलली. ते समाज झटपट विकसित झाले. परंतु त्याजबरोवर त्या समाजात समोर उभे असलेले प्रश्न सोडविण्यात ते समाज अपयशीही झाले होते.

टायग्रीस आणि युफ्राटीस (पूर्वीचा मेसापोटेमिया) या नद्यांचे खोरे, इजिप्तमधील नाईल नदीचे खोरे आणि हिंदुस्थानातील सिंधू नदीचे खोरे, ग्रीस मधील क्रीट हे बेट, चीनमधील पीत नदीचे (yellow river) खोरे, मध्य अमेरिका, अँडीयन नदीच्या अनेक खोऱ्यातून या सात समाजाना सभ्यता प्रथम प्राप्त झाली. याचा उल्लेख यापूर्वी येऊन गेला आहे. या सात समाजापैकी, दोन म्हणजे भारतीय आणि चीन हे समाज आजवर सातत्याने टिकून आहेत. या समाजांच्या नशिबात अनेक प्रकारचे चढ-उतार आले. त्यांच्या नशिबातील हे बदल हिंदू, बौद्ध आणि कॉनफ्युशियन या धर्मातून आविष्कृत झाले आहेत. मध्य-अमेरिका आणि अँडीयन या दोन संस्कृतीचे पार विघटन झाले. कोठल्याही प्रकारची लक्षणिय अशी खूण मागे न ठेवता, हे समाज इतर संस्कृतीनी आपल्यात सामिल करून घेऊन, त्यांना आपलेसे

केले. आता उरल्या तीन सभ्यता-मेसापोटेमिया, इजिप्त आणि क्रीट. या सभ्यतेत अंर्तभूत असलेल्या समाजानी आपल्या भागातून आलेल्या समाजांकडे, आपल्या सामाजिक संस्था व आपले ज्ञान सुपूर्द केले. या मागाहून आलेल्या समाजाबरोबर त्यांची देवाण-घेवाण अनेक शतके चालू होती. सरते शेवटी, या समाजात ते पार मिसळून गेले. असे असले तरी त्या मूळ समाजानी आपली मुलभूत वैशिष्टे गमाविलेली नाहीत. मानवाची मुलभूत अशी नैसर्गिक प्रवृत्ती आणि त्याच्या अवतीभोवतीचे पर्यावरण, याबद्दलच्या वेगवेगळ्या संकल्पनातून ही वैशिष्ट्ये आविष्कृत होतात. त्या संकल्पना त्या वैशिष्ट्यांचे प्रतिक आहे असे स्थूलमानाने त्याबद्दल म्हणता येईल. तत्कालिन समाजात प्रचलीत असलेल्या महान धर्माकरवी अत्यंत अमूर्त अशा पातळीवर ही सारी वैशिष्ट्ये प्रतिबिंबित झालेली आहेत. उदा. हिब्रु, ग्रीको-रोमन (ग्रीस-रोमन) इराण, ख्रिश्चन-या समाजांच्या पूर्वेकडील आणि पश्चिमेकडील देशातील या सर्व पंथाच्या द्वारे, आणि इस्लाम या धर्मातून ही सारी वैशिष्ट्ये प्रतिबिंबित झालेली दिसतात. अनेक प्रकारच्या आणि अनेक घडणीच्या रचनाच्य स्वरूपात या सर्व समाजाकडे पहाता येईल. शिवाय त्यांच्याकडे त्या वेगवेगळ्या संस्कृती, भाषिक गट आहेत, राजकीय आणि आर्थिक पद्धती आहेत या स्वरूपांतही पहाता येते. निरीक्षकाच्या दृष्टीकोनावर त्यांच्याकडे कसे पहावयाचे व निरीक्षकाने त्या समाजार्तील कोणत्या गोष्टीवर निरीक्षकाचे लक्ष केंद्रित झाले आहे, त्याचे हितसंबंध कोणते या सर्व मुद्यावर ते अवलंबून आहे.

सभ्यता प्रथम प्राप्त झालेल्या समाजाचा वारसा ज्या समाजाकडे आला, त्या सर्वांना एकाच प्रकारच्या प्रश्नांना सामोरे जावे लागलेले नाही. तसेच त्या समाजासमोर जे प्रश्न उभे ठाकले होते, ते सोडविण्यात त्यांना समान यशही मिळालेले नाही. सभ्यता प्रथम प्राप्त झालेला समाजाचे जे वारसदार समाज होते, त्या समाजापैकी, काही समाज यशस्वी का झाले आणि काही अयशस्वी का झाले याबद्दलही अजूनही अंदाज व्यक्त होत असतात. त्याबद्दल अजूनही चर्चा होतच असते. परंतु एका मुलभूत पातळीवर या सर्व विविध दृष्टीकोनात, एकवाक्यता आहे. या सर्व अपयशी समाजांच्या नेत्यांना एका बाबतीत अपयश आले. या समाजांचा एकजिनसीपणा, त्यातील एकवाक्यता टिकविण्यासाठी- पायाभूत ठरणाऱ्या मूल्यांचा परंपरागत आकृतिबंध व रचना टिकवून धरणे, हे महत्त्वाचे होतेच. पण त्याजबरोबर नवे ज्ञान समाजाला स्विकारावेच लागते, त्यासाठी परंपरागत मूल्यपद्धतीत बदल करावा लागतो. म्हणजेच एकीकडे मूल्यांचा परंपरागत आकृतिबंध टिकवून धरणेही आवश्यक, त्याजबरोबर नव्या ज्ञानाच्या अनुषंगाने, त्यात बदल करणेही जरूर असते. या दोहोत नाजूक समतोल साधणे, हे समाजाचे अस्तित्व टिकविण्यासाठी अत्यंत आवश्यक गोष्ट आहे. त्या समाजातील नेत्यांना हा नाजूक समतोल साधणे हे जमले नाही. त्या समाजांचा पराभव झाला, ते अयशस्वी ठरले, त्या मागचे ते मुख्य कारण आहे. याबद्दल सर्व अभ्यासकात व समीक्षकात एकवाक्यता आहे. मुळातील सभ्यता प्राप्त झालेल्या समाज



अनुक्रमणिका

यापासून सुसंस्कृत झालेल्या समाजा-समाजात फरक होताच. धर्म, भाषा, वाङ्मय, कला आणि संगीत या करवी आविष्कृत झालेल्या परंपरागत संस्था, या नव्या सुसंस्कृत झालेल्या समाजानी आत्मसात कशा केल्या यावर त्यांच्यातील फरक अवलंबून होते. हे सर्व समाज एकमेकापासून अलग करून ते ओळखले जातात ते त्या फरकांच्या अनुषंगाने. तंत्रविज्ञानाच्या बाबतीत एकाच समान पातळीवर राहण्यासाठी आपल्याला प्राप्त झालेल्या पर्यावरणासंबंधी असलेली तत्कालीन सर्वसामान्य अशी जाण हा या सर्व समाजांचा समान गुण होता त्याजबरोबर पूर्वसुरीकडून प्राप्त झालेल्या सत्यावर फार मोठा भर टाकून राहणारे ज्ञान, आणि तसाच तत्कालिन समाजांचा ज्ञान विषयक दृष्टीकोन, हा त्या समाजाचा आणखी एक समान गुण. या ज्ञानविषयक दृष्टीकोनात वस्तुनिष्ठ प्रयोगांना फारच बेताचे स्थान असते. हे ही ओघानेच आले. हे परंपरागत समाज सहजीवन जगत, परस्परांवर परिणामही करीत. परंतु एकाने दुसऱ्यावर सत्ता गाजवावी यासाठी सत्ता किंवा ज्ञान याबाबतीत आघाडीवर राहण्यासाठी कांकणभर सरस असे ज्ञान वा सत्ता कोणाकडेही नव्हती.

मानव हा प्राणी पृथ्वीतलावर उत्क्रांत होण्यापूर्वीचे जीवन, आणि विद्यमान मानवी जीवन ही एक अखंड सातत्याने होत असलेली, प्रक्रिया आहे. तसेच आरंभाचे मानवी समाज आणि त्यानंतरचे सुसंस्कृत मानवी समाज ही आणखी एक वेगळीच प्रक्रिया आहे. या दोन्हीही प्रक्रियांत सामाजिक बदलांचा वेग प्रचंड होता, त्यांची व्याप्तीही प्रचंड होती. मानवी व्यवहाराच्या चलनवलनात ते एक अत्यंत गतिशील असे क्रांतीकारी परिवर्तन होते. आधुनिक युगाचे वैशिष्ट कशात असेल तर ते ज्ञानाच्या क्षेत्रात झालेल्या अफाट वाढीत आहे. वैज्ञानिक क्रांती आणि त्यांतून प्राप्त झालेल्या ज्ञानाशी जुळवून घेण्यासाठी आजवर कधीही झाले नव्हते एवढ्या प्रचंड प्रमाणात प्रयत्न होत आहेत. सर्वच मानव जातीने त्यांत सामिल होण्याचा आग्रहही त्यात आहे. मानवी अस्तित्वाला प्रथमच ज्या धोक्यांचे आणि मानवाला उपलब्ध असलेल्या अनेक प्रकारच्या संधी असे वर्णन ज्या जागतिक प्रकृतीचे करता येईल तसे धोके आणि संधीही मानवाच्या आवाक्यात अगदी प्रथमच आलेल्या आहेत. या उपलब्ध असलेल्या संधीचे स्वरूप व आवाका समजावून घेणे, तसेच त्या धोक्यावर प्रभुत्व मिळविणे या आव्हानाला मानवाला सामोरे जावे लागणार आहे. मानव जातीच्या समोर उभ्या ठाकलेल्या आव्हानातले हे सर्वात मोठे आव्हान. हा अभ्यास आधुनिक युगातील सामाजिक प्रकिये संबंधीचा आहे. मानवी व्यवहारातील ते एक महान क्रांतीकारी असे परिवर्तन. या पहिल्या लेखात आधुनिकतेच्या प्रकृती संबंधीची व्याख्या बंदीस्त करण्याचा प्रयत्न होईल. त्या व्याख्येची यथार्थता सार्वत्रिक स्वरूपाची आहे असे गृहीत धरण्यात यावे. त्याजबरोबर परंपरागत सामाजिक संस्थाना विद्यमान समाजाशी जुळवून घेण्याच्या प्रयत्नात, अनेक मानवी समाजासमोर प्रश्न उभे राहणारच. त्या प्रश्नांचा सर्वसाधारण स्वरूपात शोध घेण्याचाही



अनुक्रमणिका

प्रयत्न या लेखात करण्यात आला आहे. दुसऱ्या लेखात आधुनिक युगातील मानवी अनुभवाच्या सार्वत्रिकतेबद्दल सर्वसामान्य स्वरूपाची सूत्रे व संकल्पना मांडताना तौलनिक पद्धतीने त्यांचा अभ्यास करता येईल का या संबंधीचा विचार करण्यात आला आहे त्याजबरोबर त्या सूत्रांशी व संकल्पनाशी संबंधित असलेले प्रश्नही विचारात घेण्यात आले आहेत. आधुनिकीकरणाची कालौघातील वाटचाल ते तिसऱ्या लेखात तपासण्यात आले आहे. सर्वच आधुनिक अशा वेगवेगळ्या समाजात आढळणारे आधुनिकतेशी संबंधित असलेल्या काही सामाजिक बदलांच्या निश्चित असे टप्पे या अभ्यासासाठी नजरेसमोर ठेवलेले आहेत. आधुनिकीकरणाचे व्यवच्छेदक लक्षण समजले जातील असे अनेक राजकीय प्रश्न आहेत. या राजकीय प्रश्नाला १७० विद्यमान मानवी समाजाना सामोरे जावे लागत आहे. या प्रक्रियेत त्या विद्यमान समाजाना येणाऱ्या अनुभवांची सात प्रमुख आकृती बंधात विभागणी करून तौलनिक पद्धतीने त्यांचा अभ्यास करून त्या विषयी चौथ्या लेखात विचार केला जाईल. आंतरराष्ट्रीय संबंधावर व व्यवहारावर या प्रक्रियेची उमटलेली छाप व त्याचे होणारे परिणाम यांचा अभ्यास पाचव्या व सहाव्या लेखात करण्यात येईल. मानवाच्या दृष्टीपथात येणाऱ्या नजीक भविष्यकाळात या आंतरराष्ट्रीय संबंधाचे गभितार्थ काय आहेत याचाही तपासणी घरण्यात आलेली आहे. आधुनिक युगातील मानवी विकास समजावून घेण्याच्या प्रयत्नात इतिहासकार आणि समाजशास्त्रज्ञ या दोघांनाही अनेक प्रश्नांना सामोरे जावे लागते. त्यांचा मागोवा सरतेशेवटी सातव्या लेखात घेण्यात आला आहे. त्याजबरोबर आधुनिकीकरण या प्रक्रियेच्या अभ्यासाची विद्यमान स्थिती काय आहे याचाही विचार त्या प्रकरणात आला आहे.

**आधुनिकीकरण**

आधुनिकीकरण हा शब्द तसा नवाच आहे. वैज्ञानिक क्रांतीपासून, मानवी व्यवहारात जे सामाजिक बदल प्रचंड वेगाने होत आहेत, त्या प्रक्रियेचे सर्वसाधारण अशा शब्दाने वर्णन करण्यासाठी हा शब्दप्रयोग वापरण्यात येतो. आधुनिक युगाचा युगधर्म दर्शविण्यासाठी 'आधुनिक' हा शब्द लॅटीन भाषेत प्रथम सहाव्या शतकात वापरण्यात आला होता. प्रथम लॅटीनमध्ये, नंतर इंग्लिश भाषेत, आणि कालांतराने युरोपिय भाषात असा त्या शब्दाचा प्रवास आहे. प्रथम हा शब्द, विद्यमान आणि प्राचीन लेखक, त्यांची तत्कालीन संविधाने यांच्यातील फरक दर्शविण्यासाठी वापरला जाई. सतराव्या शतकापासून, 'आधुनिकत्व' 'आधुनिकता आणणारे' आणि 'आधुनिकीकरण' या शब्दांचा वापर अनेक प्रकारच्या कमी अधिक मर्यादीत आणि तांत्रिक स्वरूपाच्या संदर्भात होऊ लागला. फ्रेंच राजकीय क्रांतीतल्या, नेत्यांचे 'आधुनिकता' आणणारे लेखक असे वर्णन इंग्लिश लेखक करीत. हा शब्द ते लेखक तुच्छता व्यक्त करण्यासाठी वापरीत याबद्दल संशय नाही. तथापी या शब्दाचा वापर पूर्वीपेक्षा अधिक वस्तुनिष्ठ दृष्टीकोनातून होत असे. सतराव्या आणि अठराव्या शतकात, तोवर युरोपिय इतिहास क्षेत्रात मान्यवर असलेली कालखंडानुरूप इतिहास मांडणी व लेखन



अनुक्रमणिका

करण्याचा त्याग केला गेला. कालखंडानुरूप इतिहास मांडणी ख्रिश्चन धर्माचा उदय व त्याचा इतिहास, यावर आधारीत होती, इतिहासकारांनी ही मांडणी सोडून, यानंतर इतिहासाचे लेखन, प्राचिन, मध्ययुगीन आणि आधुनिक इतिहासाचा (एकाएकी कॉनस्टानटिनोपलच्या पराभवानंतर अथवा अमेरिकेच्या शोधानंतर २९ मे १४५३ च्या सूर्योदयानंतर किंवा १२ ऑक्टोबर १४९२ साली २ वाजता मध्यरात्री-एखाद्याला अगदी शब्दश: काटेकोरपणे लिहावयाचे झाल्यास) आरंभ होई. विद्यमान काळी युरोपिय इतिहासाची सुरुवात सुमारे इ. स. १८०० च्या आसपास होते असे मानतात.

इ. स. १९४० ते इ. स. १९६५ च्या दरम्यान 'आधुनिकीकरण' हा शब्दप्रयोग फार मोठ्या प्रमाणात वापरात आला. तंत्रवैज्ञानिक, राजकीय, आर्थिक आणि सामाजिक या सर्व क्षेत्रातील विकास ज्या देशानी केला आहे आणि प्रगती केली आहे, त्या देशांतील समान वैशिष्टांचे वर्णन करण्यासाठी विशेषत: तो शब्द वापरण्यात येई. ही समान वैशिष्टें ज्या प्रक्रियेद्वारा या राष्ट्रांनी हस्तगत केली, त्या प्रक्रियेचे वर्णन "आधुनिकीकरण' या शब्दाने केले जाते. प्रथम दर्शनी 'आधुनिकीकरण' हा शब्द नवीन काहीच सांगत नाही. त्यात एक 'तोच-तो' पणा (tautology) आहे असेही कोणास वाटेल. म्हणजे एखादी प्रक्रिया गोष्टी आधुनिक करते ते आधुनिकीकरण. कालगणनेत अगोदर येऊन गेलेल्या गोष्टी प्रमाणेच गोष्टी तयार करणे या सारखा तो शब्दप्रयोग आहे, असे कोणासही वाटेल. परंतु थोडा अधिक विचार केला तर ते तसे नाही हे स्पष्ट होईल. एखाद्या देशाने ख्रिश्चन धर्म स्विकारला, तर मग त्याचे ख्रिस्तीकरण झाले असे आपण म्हणतो. एखाद्या देशात उद्योगधंद्याचे जाळे पसरले की त्या देशाचे 'औद्योगिकीकरण' झाले असे म्हटले जाते. तसेच आधुनिकीकरण या शब्दाचे आहे. ख्रिस्तीकरण होणे आणि औद्योगिकरण होणे या शब्दात जितका 'तोच-तो' पणा (tautology) आहे तितकाच आधुनिकीकरण या शब्दातही. अधिक काहीही नाही. परंतु एका महत्वाच्या बाबतीत मुद्याबाबत वेगळेपण जरूर आहे. ख्रिश्चन धर्म व उद्योगधंदे या शब्दांच्या अर्थाबद्दल सर्वसासाधारण स्वरूपाची एकवाक्यता आहे. परंतु 'आधुनिकीकरण' या शब्दाद्वारे असा अर्थ व्यक्त होत नाही की जो विस्तृतपणे स्विकारण्यात आला किंवा त्याला मान्यता मिळाली. आधुनिकीकरण या शब्दाचा अर्थ स्पष्ट करणे हाच या लेखाचा हेतू आहे.

आधुनिकीकरण या प्रक्रियेचे वर्णन करण्यासाठी केवळ तेवढ्या एकाच शब्दाचा वापर होत नाही. 'युरोपिकरण' आणि 'पाश्चिमात्यीकरण' हे शब्दप्रयोगही तोच अर्थ व्यक्त करण्यासाठी सर्वसामान्यपणे वापरण्यात येतात. विशेषत: अलिकडच्या काळात प्रगत झालेले देश, प्रगतीपथावर आगेकूच करीत असलेले देश, यांच्यावर जो पाश्चिमात्त्य देशांचा प्रभाव पडला, त्याचे वर्णन करण्यासाठी हे दोन्ही शब्दप्रयोग उपयोगात येतात, म्हणूनच सतराव्या आणि अठराव्या शतकातील इंग्लंड अथवा फ्रान्स यांचा निर्देश करताना 'पाश्चिमात्यिकरण'



अनुक्रमणिका

हा शब्द कोणीही वापरत नाही. तसेच विसाव्या शतकात जपानने माँचुरीयांचे 'युरोपिकरण' केले असेही कोणी म्हणत नाही. दुसऱ्या एका अर्थाने 'औद्योगिकरण' 'औद्योगिक क्रांती' आणि 'वाढत्या अपेक्षांची क्रांती' हे शब्द प्रयोग फारच संकुचित अर्थाचे आहेत, त्यात पुरेसा व्यापकपणा नाही. हे शब्द फक्त आर्थिक बाजूवर भर देतात. तंत्रवैज्ञानिक क्रांतीमुळे घडत असलेल्या ताबडतोबीच्या परिणामावर जोर देण्याकडे त्या शब्दांचा कल आहे. परंतु या सर्व प्रक्रियेमुळे गुंतागुंतीची, आणि व्यापक प्रकृतीची अशी जी वैशिष्टें आहेत, ती त्या दोन शब्दाद्वारे निसटली आहेत. या उलट 'उपक्रमशीलता' हा शब्दप्रयोग फारच व्यापक अर्थाचा आहे. लिखित अशा मानवी इतिहासात जे जे काही घडले, त्या सर्वच बदलांचा प्रवाह आविष्कृत करण्यासाठी तो शब्द वापरण्यात येतो. पण त्याजबरोबर तंत्रविज्ञानाच्या क्षेत्रात ज्या सुधारणा व प्रगती होते, त्यांचा खास संदर्भ नजरेसमोर ठेऊनही 'उपक्रमशीलता' या शब्दाचा वापर होतो.

अलिकडच्या काळात ज्ञानाचा विस्तार व वाढ·अतिशय स्फोटक अशा प्रकारे झाली आहे. याचा परिणाम 'उपक्रमशीलता' या जुन्या व मान्यवर प्रक्रियेच्या स्वरूपात आमूलाग्र फरक होऊन, व त्या प्रक्रियेला आगळी गतिमनता प्राप्त झाली आहे. या प्रकल्पात आणि या ठिकाणीही 'आधुनिकीकरण' हा शब्दप्रयोग, गतीमानता आणि त्यातील गतीमानी स्वरूप यांचा संदर्भ ध्यानात ठेऊन वापरण्यात आला आहे. या प्रक्रियेची गतीमानी प्रकृती आणि मानवी व्यवहारावर होणारा तीचा सार्वत्रिक असा परिणाम ही दोन खास वैशिष्टे आधुनिकरण या शब्दाद्वारे आविष्कृत होतात. ती खास वैशिष्टे जमेस धरूनच तो शब्द तयार करण्यात आला आहे, असेही म्हणता येईल. समाजात परिवर्तन होणे शक्य आहे नव्हे ते झालेच पाहिजे. तसेच तो होणारा सामाजिक बदल हवाहवासा वाटतो, ही श्रद्धा आणि दृष्टीकोन त्या शब्दामागे, आहे. त्यातूनच तो शब्द म्हणजे 'आधुनिकीकरण' हा शब्द प्रथम तयार झाला, या शब्दाची व्याख्या करणे आवश्यकच असेल तर ती येणे प्रमाणे करता येईल' **मानवाच्या ज्ञानात आजवर कधीही झाली नव्हती एवढी जी वाढ झाली आहे, ते प्रतिबिंबित करणाऱ्या, झपाट्याने बदलणाऱ्या अशा सामाजिक कार्याशी, इतिहासात उत्क्रांत झालेल्या सामाजिक संस्थांशी जुळवून घेणे, त्याजबरोबर वैज्ञानिक क्रांतीच्या अनुषंगाने येणाऱ्या पर्यावरणावर नियंत्रण ठेवणे, या प्रक्रियेला आधुनिकीकरण म्हणतात अशी अशी त्या शब्दाची व्याख्या करता येईल.** पश्चिम युरोपमधील समाजात 'जुळवून घेण्याच्या' प्रक्रियेचा प्रभाव पडला हे खरेच आहे. त्या ठिकाणीच त्या प्रक्रियेचा उगम झालेला आहे. परंतु एकोणिसाव्या आणि विसाव्या शतकात या प्रक्रियेचा विस्तार आणखीही दुसऱ्या अनेक समाजात झाला. सर्वच मानवी संबंधात जागतिक स्वरूपात परिवर्तन होण्यात त्याची परिणती झाली आहे. औद्योगिकरणाच्या अनुषंगाने येणाऱ्या सामाजिक आणि राजकीय बदला पुरतीच

'आधुनिकीकरण' या शब्दाची व्याप्ती आहे असे राज्यशास्त्रज्ञ वारंवार सांगत आले आहेत. परंतु या प्रक्रियेतील सर्व पैलू व बाजूत अंगभूत असलेल्या गुंतागुंतीला आणि परस्पर संबंधात चांगली शोभून दिसणारी होलीस्टीक (परस्परावर परिणाम करणारी व सर्व घटक समाविष्ट असणारी) विचारसरणी व्याख्या करणे जास्त उचित आहे. (सर्व सामाजिक व्यवहारात सामाजिक बदलांना विचारात घेऊन केलेल्या अभ्यासाला होलीझम हे नाव आहे. अशा सर्व समावेशक घेण्याचा होलीझमच्या सिद्धांतानुसार अभ्यास येणे प्रमाणे करता येतो, आणि तसे करणे आवश्यकही आहे. सामाजिक विश्लेषणात मुलभूत स्वरूपाची म्हणून जी सामुग्री वापरतात (data) त्यात व्यक्तींना, व व्यक्तीगत आविष्काराना स्थान नाही. परंतु सामाजिक प्रवृत्ती, कायदे आणि सामाजिक आंदोलने यांचाच विचार त्यात प्रामुख्याने येतो)

'आधुनिकीकरण' या प्रक्रियेसंबंधी आजवर फार मोठ्या प्रमाणात मान्यता प्राप्त झालेली स्पष्टीकरणे अनेक आहेत. विशिष्ट संस्कृतीत बंदीस्त होणे अथवा ठराविक दिशेने हुकूमी आगेकूच करणे (deterministic) ही त्या सर्व स्पष्टीकरणांच्या प्रकृतीची वैशिष्टे आहेत. आधुनिकीकरण ही प्रक्रिया समजावून घेण्याच्या प्रयत्नात त्या प्रकृती वैशिष्ट्यांनी अडथळा उत्पन्न केलेला आहे. प्रगती या संकल्पनेसंबंधी एक उदारमतवादी दृष्टीकोन आहे. सामाजिक बदल या संकल्पनेसंबंधी आमजनतेसमोर त्या दृष्टीकोनाने एक चित्र उभे केले होते. ते चित्र इंग्लिश भाषक जग आणि पश्चिम युरोपमधील समाज, हे दोन्ही भूभाग विचारांत घेता अगदी यर्थार्थ आहेत अशी सर्वांची श्रद्धा होती हेही आता स्पष्ट झाले आहे. परंतु तो विश्वास चुकीचा होता हेही तितकेच खरे. इतरही अनेक दृष्टीकोन प्रचलीत आहेत. त्यांनाही सार्वत्रिक स्वरूपाची मान्यता आहे. एखादे साधे-सुधे सरळसोट मूळ कारण अथवा प्रेरणा देणारा घटक विचारात घेऊन 'आधुनिकीकरणामुळे' घडणाऱ्या सामाजिक बदलांचे स्पष्टीकरण देण्याचा त्या दृष्टीकोनानी प्रयत्नही केलेला आहे. तथापि हे सारे दृष्टीकोन बहुतेक वेळेला अत्यंत संकुचित अशा ठराविक दिशेने हुकमी आगेकूच (deterministic) करणे या प्रकृतीचे असतात. सामाजिक प्रक्रीया ही सरतेशेवटी अतिशय गुंतागुंतीची असते. आणि तिच्यांबद्दल भविष्य वर्तविता येत नाही. तिच्याबद्दल अंदाज बांधता येत नाही. वर निर्देश केलेल्या सर्व स्पष्टीकरणात या वस्तुस्थितीची बूज ठेवलेली नसते. हे त्या सर्व स्पष्टीकरणातील एका वैशिष्ट्यातून प्रतिबिंबित होते. ते वैशिष्ट म्हणजेच निर्देशलेली सारी स्पष्टीकरणे असे सांगतात की सर्व मुलभूत प्रश्नांची सोडवणूक अगदी नजिकच्या भविष्यकाळात नव्हे तर व्यक्तीच्या आयुष्यातच होईल. असा दिलासाही ती स्पष्टीकरणे देतात. फक्त स्पष्टीकरणात व त्यात अनुस्यूत असलेल्या सिद्धांतात सुचीत केलेला त्यात गर्भित असलेला कार्यक्रम स्विकारला की सारे मुलभूत प्रश्न सुटणार. आधुनिकीकरण या शब्दप्रयोगाचा एक मोठा फायदा आहे. तो म्हणजे औद्योगिकरण, युरोपिकरण, पाश्चिमात्यिकरण हे शब्दप्रयोग अथवा प्रगती हा शब्द-

प्रयोग या सर्व पर्यायी शब्द प्रयोगापेक्षाही 'आधुनिकरण' या शब्दाची व्याप्ती अधिक व्यापक आहेच. त्याजबरोबर कालौघात, या सर्व पर्यायी शब्दांवर वेगवेगळ्या अर्थाची पुटे चढल्याकारणाने, ते वापरताना अडचणी निर्माण होतात 'आधुनिकीकरण' या शब्दाने अडचणी निर्माण होत नाहीत.

पंधराव्या शतकातील पाश्चिमात्य जगतातील सुशिक्षित रहिवाश्यांना कोठच्या गोष्टी विद्यमान इंग्लंडमध्ये परिचयाच्या वाटतील, आणि कोठच्या अपरिचित वाटतील? विद्यमानकालीन जी लिखित भाषा आहे ही त्याला बहुधा समजेल. धार्मिक अथवा चर्चमधील चालिरितींचा काही भाग त्याला ओळखीचा वाटेल. त्याच्या काळातील स्थापत्यशास्त्राचे नमुने म्हणून प्रसिद्ध असलेल्या संस्मरणयी इमारतीपैकी थोड्या अजूनही असतील; ग्रामीण भागात निदान प्रथम दर्शनी तरी ग्रामिण जीवनातील काही वैशिष्ट्यांत फारसा बदल झाला आहे असे त्यास वाटणार नाही. हे जरी खरे असले तरी झालेले परिवर्तन किती प्रचंड प्रमाणात लक्षणीय आहे, तसेच तो जे काही पाहिल आणि वाचिल ते त्याला किती सर्वस्वी नवीन वाटेल आणि अनाकलनीय वाटत असेल?

वारसा हक्काने आलेल्या काही सामाजिक संस्थात कालौघात त्या संस्थांकडून ज्या अपेक्षा असतात त्यात बदल होतो. या बदलांशी त्या सामाजिक संस्था कसे जुळवून घेत आहेत या स्वरूपात 'आधुनिकीकरण' या प्रक्रीयेकरवी ते परिवर्तन घडले आहे त्याची चर्चा होईल. वारसा हक्काने काही संस्था एखाद्या समाजाकडे येतात. 'आधुनिकीकरणामुळे' या सामाजिक संस्थाही आपल्याकडून अपेक्षित असलेल्या कार्यात बदल करताना कालौघात या वदललेल्या सामाजिक कार्याशी त्या संस्थांना जुळवून घ्यावे लागते. 'आधुनिकीकरण' या प्रक्रियेकरवी जे परिवर्तन घडते त्याची चर्चा करता येईल. आजवरचा इतिहास लक्षात घेऊन जो ऐतिहासिक दृष्टीकोन तयार होतो त्याच्या अनुषंगाने सामाजिक संस्थात बदल होणे या प्रक्रियेत सापडलेल्या सामाजिक संस्थांची व्याख्या येणे प्रमाणे करता येईल. जगातील सर्व समाजात ज्या ज्या सामाजिक संस्थात असे परिवर्तन होते, त्या सर्व परंपरागत संस्था आहेत. म्हणजेच 'परंपरागत' आणि 'आधुनिक' या सापेक्ष संकल्पना आहेत. असे असले तरी त्यांचा वापर एका विशिष्ट अर्थाने होतो. पश्चिम युरोप मधील समाजाच्या दृष्टीने मध्ययुगीन समाज हे परंपरागत समाज, या समाजाला आधुनिकतेकडून आव्हान मिळाले, ते बाराव्या आणि अठराव्या शतकाच्या दरम्यान. हे अशाच प्रकारचे आव्हान इतरही अनेक समाजाना 'आधुनिकीकरणामुळे' मिळालेले आहे. या सर्व परंपरागत समाजाना आधुनिकीकरणामुळे ज्या कालखंडात आव्हान मिळाले, ते वर उल्लेखिलेल्या उदाहरणाप्रमाणे अलग करता येतीलही. अत्यंत कमी प्रगत अशा समाजांचा विचार करता परंपरागत सामाजिक संस्था अगदी विसावे शतक उजडेपर्यंत त्या समाजातून टिकून राहिल्या होत्या. अगदी आरंभीच्या काळात ज्या



अनुक्रमणिका

समाजाना आधुनिकतेचे आव्हान मिळाले, त्या समाजाना मिळालेले ते आव्हान, मुलतः अंतर्गत होते. त्या समाजाना परक्या असणाऱ्या समाजांचा त्यांच्यावर परिणाम झाला नव्हता. म्हणूनच परिवर्तनाची ही प्रक्रिया, टप्प्या टप्प्याने पायरी पायरीने संथ गतीने, अनेक शतकांच्या कालावधीत झाली. परंतु त्यानंतर आधुनिकीकरणाच्या आर्वतात सापडलेल्या समाजाना आधुनिकतेचे आलेले आव्हान हे त्या समाजाबाहेरून अधिक वाढत्या प्रमाणात आलेले होते. म्हणूनच ते आव्हान त्या सर्व समाजासमोर एकाएकी उभे ठाकलेले व प्रचंड वेगाचे होते. अर्थातच हरएक परंपरागत सामाजिक युगांतील परंपरागत समाजांचा कालखंड या सर्वच बाबतीत भिन्न असणारच. काही समाजांच्या बाबतीत तो अतिशय गुंतागुंतीचा, वा तरल असेल,काहींच्या बाबतीत तो 'टोळी समाजा' पलिकडेही नसेल. परंतु या दोन टोकाला असणाऱ्या समाजांना जोडणारा एक दुवा आहे. तो म्हणजे इतिहासात उत्क्रांत झालेल्या सामाजिक संस्थांचा एक विशिष्ट आकृतिबंध होता. त्या आकृतीबंधाला विशिष्ट पार्श्वभूमी होती. या सामाजिक संस्थांनी आधुनिकतेत अनुस्यूत असलेल्या सामाजिक कार्याशी जुळवून घेतले. या कारणामुळेच यापैकी प्रत्येक समाजाला त्याचे असे एक खास वैशिष्ट्य प्राप्त झाले आहे.

आधुनिक समाज हे परंपरागत समाजाइतके वैचित्र्यपूर्ण नसतात. आधुनिकीकरणाची प्रकृती असलेली काही विशिष्ट सामाजिक कार्ये ही समान असण्याकडे प्रवृत्ती असते. सर्व मानवजातीबावतच हे विधान करता येईल. तेवढ्यापुरते तरी आधुनिक समाज हे परंपरागत समाजाइतके वैशिष्ट्यपूर्ण नसतात. परंतु आधुनिक समाजातील ती समान वैशिष्टें कोणती हे शोधून काढण्याच्या प्रयत्नांत असंख्य प्रश्न निर्माण होतात. या सर्व अडचणीत व प्रश्नात एक मुख्य समस्या आहे. सर्वच मानवी समाज. अजूनही आधुनिकीकरणाच्या अंतीम टप्प्यापर्यंत पोचलेले नाहीत. अत्यंत प्रगत समजल्या जाणाऱ्या समाजातही अजूनही आधुनिकीकरणाची प्रक्रिया चालूच आहे. दुसऱ्या अनेक समाजात - उदा. भारत आधुनिकीकरणाच्या प्रक्रियेला नुकतीच सुरवात झाली आहे आधुनिक समाजांची वैंशिष्टे शोधून काढण्याच्या हप्त्यापर्यंत यातील कोठच्याही समाजाने मजल मारलेली नाही, म्हणूनच समान वैशिष्टे कोणती याचा शोध घेणे वा ते ठरविणे हे मोठे कठीण काम होऊन बसते. कल्पनाशक्ती कमालीची ताणली व प्रयत्न केला तर आधुनिक समाजांची वैशिष्टे कोणती याचा अंदाज बांधणे कदाचित शक्य होईल. हे झाल्यानंतर आधुनिक समाजात दिसणाऱ्या 'आधुनिक'तेची वैशिष्ट्ये कोणते हे ठरविता येईल. त्याशिवाय जी ठरतील ती त्या समाजाच्या सांस्कृतिक वारश्यातून आलेली आहेत. त्या वारश्याकरवी, त्यातील प्रत्येक समाजाला काही आगळ्या-वेगळ्या गोष्टींची प्राप्ती झालेली असते.

**परंपरा आणि आधुनिकत्व**

मानवी व्यवहाराच्या सर्वच अंगात एकाचवेळी परिवर्तन होण्याची क्रिया सतत चालू

असते. आधुनिकीकरण ही प्रक्रिया अत्यंत गुंतागुंतीची आहे. म्हणून ती प्रक्रिया सोप्या संकल्पनात व नेमक्या अशा काही शब्दात बंदिस्त करता येत नाही. तसे केले तर गंभीर स्वरूपाचा सत्यालाप झाल्याशिवाय राहणार नाही. आधुनिकीकरण ही प्रक्रिया सोपी व सुटसुटीत करून सांगण्यात त्या प्रक्रियेला तिरपाकडे स्वरूप येण्याला धोका आहे. आधुनिकीकरणाचा आपण अभ्यास करताना काही गोष्टी गृहीत धरणार आहोत. सर्व मानवी व्यवहाराची चर्चा त्यांची पांच अंगे गृहीत धरून शक्य आहे. बौद्धिक, राजकीय, आर्थिक, सामाजिक आणि मानसशास्त्रीय अशी ती पांच अंगे होत. कोणतेही एखादे मार्गदर्शक तत्व गृहीत न धरता ही विभागणी करण्यात आली आहे. हे अगदी स्पष्ट व उघड आहे. केवळ विवेचनाच्या सोईसाठीच ही विभागणी आहे. दुसरीही एक अडचण आहे. ही विभागणी ज्या पांच सूत्रांच्या आधारे करण्यात आली, ती सर्व सूत्रे चांगल्या परिचयाची आहेत. तसे असल्याकारणाने त्या सूत्रांचे अतिशय कांटेकोरपणे व्याख्या करण्याचा प्रयत्न करणे हे चुकीचे ठरण्याचा संभव आहे. मानवी व्यवहाराच्या निरनिराळ्या अंगाची आणखीही कितीतरी प्रकारे वर्गवारी करता येईल, त्याची व्याख्याही अनेक प्रकारे करता येईल. तसे जरी केले, तरी ती वेगवेगळी अंगे एकमेकावर सातत्याने परिणाम करतात, त्यांची एकमेकांवर क्रिया-प्रतिक्रिया होतच असते, हा मुद्दा अगदी स्पष्ट व उघड आहे. ही सर्व मानवी व्यवहाराची अंगे वेगवेगळ्या कप्प्यात बंदीस्त करून त्यांच्याबद्दल चर्चाही करता येईल. परंतु तसे करणे हे उघड उघडपणे एकादी गुंतागुंतीची व जटिल अशी प्रक्रिया बुद्धीपुरस्सार साधी व सरळसोट करण्यासारखेच ते आहे. शास्त्रीय विवेचनाच्या कार्यपद्धतीत अशा विचारांना थारा असता कामा नये.

**बौद्धिक**

बौद्धिक जगतापासून सुरुवात करणे हे उचित आहे. मानवाच्या अवती-भवतीचे पर्यावरण गुंतागुंतीचे आहे. त्यातील सर्व गुंतागुंत मानवाने समजावून घेतली व त्यावर नियंत्रण मिळविले आहे. मानवाची ही समजूत व त्यावर त्याने मिळविलेले नियंत्रण या दोन्हीत झालेल्या प्रगतीने व वाढीने आधुनिक युगातील सामाजिक बदलाच्या प्रक्रियेत महत्वपूर्ण व आवश्यक अशी भूमिका बजावली आहे. हे सर्व शक्य होण्यात मानवी व्यवहाराच्या बौद्धिक जगतापासून सुरुवात केली. मानवाकडे असलेल्या ज्ञानाव्यतिरिक्त इतर कशांतही फारसा बदल झालेला नाही हे स्पष्टच आहे. एका विशिष्ट अर्थाने हे विधान केलेले आहे. मानवाच्या अवतीभोवतीचे विविधतापूर्ण पर्यावरण हे नेहमीच अस्तित्वात होते. त्या पर्यावरणाची ताकद व सुप्त शक्ती किती मोठी आहे याची जाणिव मानवाला कालांतराने आली. तथापी ही समज येण्यापूर्वी ते पर्यावरण अस्तित्वात होते, हा मुद्दा महत्वाचा. इतिहासाच्या वाटचालीत मानवाच्या अवती भोवती असलेल्या पर्यावरणात फारच थोडा बदल झाला. तसेच

प्राणीसृष्टीच्या उत्क्रांतीच्या वाटचालीत मानव प्राण्याची मानव जातीत (Homo sapiens) उत्क्रांती झाल्यानंतर मानवात तसे बदल झालेले नाहीत. पश्चिम-युरोपमधील आधुनिक ज्ञानाचा उगम बाराव्या शतकातील प्रबोधनाच्या युगात झाला असे इतिहासकार सांगतात. बाराव्या शतकात ग्रीक आणि अरब विद्वानांचे लिखाण पश्चिम युरोपला उपलब्ध झाले. त्यानंतर अनेक क्षेत्रात जे टिकून राहिल अशा प्रतिभाशाली कामास सुरुवात झाली. या प्रबोधनाचा पाया एका जाणिवेत होती. भौतिक आणि सामाजिक घडामोडीच्या बौद्धिक स्पष्टीकरणाचा शोध घेणे शक्य असते ही जाणिव. आधुनिक युगावर निसर्ग-विज्ञानात (natural science) अंतर्भूत असलेल्या वैज्ञानिक शास्त्रानी मोठी छाप उठविली आहे. परंतु त्या क्षेत्रात ग्रीकांनी आणि अरबांनी केली होती तेवढी प्रगती करण्यासाठी पश्चिम-युरोपमध्ये चौदावे शतक उजाडावे लागले. निसर्गाबद्दलच्या ज्ञानात आणि निसर्ग समजावून घेण्यात १६व्या शतकापर्यंत पश्चिम युरोपमध्ये क्रांतीकारी अशी वाढ होण्याच्या वाटचालीस सुरुवात झाली. या क्रांतीकारी वाढीने प्रचंड सामर्थ्य आणि विनाश करण्याची साधने मानवाच्या हाती ठेवली.

मानवाला आपल्या पर्यावरणासंबंधी जी जाणीव व समजूत होती त्यात अत्यंत नाट्यपूर्ण बदल झाला. या बदलाचे संगोपन वैज्ञानिक क्रांतीने केले या विषयी शंका नाही. तोवर संशोधन कसे करावयाचे, समाजातील चालिरीती कशा असाव्यात, सामाजिक मूल्ये कोणती इत्यादी गोष्टींना सार्वत्रिक मान्यता प्राप्त झाली होती. इतरही गोष्टी कशा करायच्या याचे ज्ञानही समाजाने पूर्वसुरीकडून मिळविले होते. या सर्वच स्वीकृत झालेल्या गोष्टींचा अधिक सर्वसमावेशक अशा पुर्नमूल्यमापनास सुरुवात झाली. वैज्ञानिक क्रांती हा त्या पुर्नमूल्यमापनाचा एक भाग. मानवाने तोवर गृहीत धरलेल्या सर्वच सामाजिक, वैज्ञानिक आणि इतरही सर्व क्षेत्रातील संकल्पनांची काटेकोर तपासणी होत होती. या कारणाने सर्वच क्षेत्रातील बौद्धिक चळवळी व कार्ये यांत फार झपाट्याने परिवर्तन झाले. प्रत्येक पिढीने, आपल्या अगोदरच्या पिढीची सारी दैवते या ना त्या प्रकारे मोडीत काढली. समाजात सर्वसाधारणपणे असा दृष्टीकोन प्रचलित झाला की सतत बदल ही ज्ञानक्षेत्रातील नेहमीची अवस्था आहे. मानव, त्यांनी मानलेले देव व दैवते आणि विश्व यांच्या प्रकृतीबद्दलचे अंदाज, राजकीय विचार, कला, वाङ्मय आणि अनुभवाच्या अनुषंगाने होणारे प्रयोग या सर्वच क्षेत्रात क्रिया-प्रतिक्रिया होतच होत्या. तसेच या सर्व क्षेत्रात वाढही सातत्याने होत होती. कल्पनांच्या विश्वातही ही वाढ व ही क्रिया प्रतिक्रिया अनुस्यूत असलेल्या आकृतिबंधाचा शोध कोणी लावल्यास ते उत्साहवर्धक ठरेल. ही अशा प्रकारची क्रिया-प्रतिक्रिया सातत्याने चालूच असते. ज्ञानाच्या क्षेत्रातील अफाट वाढीमुळे, ज्ञानक्षेत्रात अतिशय गुंतागुंतीची अवस्था विद्यमान आहे. या अवस्थेला येऊन पोचेपर्यंत अनेक नामवंत-प्रज्ञावंत व्यक्तींना अनेक

ज्ञानक्षेत्रांच्या सरहद्दीवर ठोस अशा नवनिर्मिती क्षमतेने काम करता येत असे. म्हणूनच एखाद्या साध्यासुध्या आकृतीबंधाचा शोध घेण्याऐवजी अनेक प्रज्ञावंत व्यक्ती अनेक दिशानी काम करीत आहेत अशा पद्धतीने विचार करावयास हवा. या सर्व प्रज्ञावंत व्यक्तीपाशी परस्पराशी संपर्क साधण्यासाठी आणि परस्परांना स्फूर्ती देण्यासाठी अनेक साधने आहेत व तीही दिवसेंदिवस वाढतच आहेत, हे दखिल विचारात घ्यावे लागेल. त्याजबरोबर या पद्धतीनुसार विचार करणाराला आणखीही एका मुद्याचा विसर पडता कामा नये. या प्रज्ञावंत व्यक्तींनी त्यांच्या आवडीच्या आणि कौशल्याच्या क्षेत्रात एवढे प्राविण्य व ज्ञान मिळविले आहे की अनेक भिन्नाभिन्न ज्ञान क्षेत्रात काम करणाऱ्या अभ्यासकांना एकमेकांच्या कामाबद्दल विद्यमानकाळी फारशी माहिती नसते.

यरोपिय इतिहासकारांनी मानवाच्या जाणिवेतील उत्क्रांतीचे वर्णन पुढील टप्प्यांत करणे सोईचे जाते असे आढळून आले आहे. प्रवोधन, धर्मसुधारण, धर्म सुधारणा विरोध, ज्ञान युग अशी चार युगे आणि आणखी एक (कदाचित) जडवादाचे. या प्रकारचे परंपरागत कालखंड एक संदर्भ चौकट म्हणून नेहमीच उपयोगी असतात. विशेष लक्षणीय गोष्ट कोठची असेल तर ती ही की बारावे ते एकोणिसाव्या शतकापर्यंत ही बौद्धिक क्षेत्रातील क्रांती ही जवळ जवळ सर्वस्वी युरोपचीं निर्मिती होती. तत्पूर्वी ग्रीक अरब, हिंदू गणिती आणि खगोलशास्त्रज्ञ या सर्व पूर्वसूरींचे ऋण हे सर्वांनाच चांगले परिचित आहे. चिन आणि आग्नेय आशियातही ज्या समांतर घडामोडी झाल्या त्यांचाही वाटा आहे. मानव आणि त्याच्या अवती-भोवतीची जडसृष्टी यांच्या दरम्यानचे संबंध समजावून घेण्याचे महान आधुनिक प्रयत्न, ही काही झाले तरी प्रामुख्याने आणि प्रथमत: युरोपिय कामगिरी आहे. एकोणिसावे शतक उजाडेपर्यंत ही परिस्थिती कायम होती. त्यानंतर आधुनिकीकरण या महान सहासात सहभागी होण्यास आवश्यक असलेली बौद्धिक तरलता दुसऱ्या काही समाजानी प्राप्त करून घेतली होती. अजूनही युरोपची आघाडी कायम आहे. जगातील दुसऱ्या अनेक देशात विद्यापिठे आणि संशोधन केंद्रे यांची स्थापना झाली असली तरीही युरोप आघाडीवरच आहे. युरोपमध्ये अगदी आरंभीच्या काळी स्थापन झालेल्या बौद्धिक केंद्रातून, अनेक ज्ञानशाखात आणि संबधीत क्षेत्रात आजवर जमा झालेल्या ज्ञानाचा आणि बुद्धिचा प्रचंड साठा आह जगातील इतर कोठच्याही देशातील तशा प्रकारच्या साठ्यापेक्षा युरोपिय साठा श्रेष्ठ आहे. जगातील प्रामुख्याने इंग्लिश भाषिक राष्ट्रातील काही भागानी ज्ञान क्षेत्रात युरोपची बरोबरची केली आहे. आणि काही क्षेत्रात युरोपला मागेही टाकले आहे. रशियाने युरोपला मागे टकले. परंतु तोही युरोपचा विद्यार्थीच. आधुनिकीकरण हे पाश्चिमात्तिकरण आहे किंवा युरोपियकरण आहे, असे अनेकांना वाटते ते त्या अर्थाने. ज्ञानसंपन्न आणि बौद्धिक स्पष्टीकरणे यात अनुस्यूत असलेली विचार पद्धती या दोन्हींचा वापर करून युरोपने ही आघाडी मिळविलेली

आहे. हे दोन्ही घटक, आधुनिकीकरणाला जे घटक आवश्यक आहेत असे मानले जाते, त्यात सर्वसाधारणपणे सर्वात जास्त मान्यता प्राप्त झालेले घटक. याबद्दल अजिबात संशय नाही. ते विचार अंर्तभूत असलेला मानवी दृष्टीकोन असणे हे आधुनिकीकरण या प्रक्रियेच्या केंद्रस्थानी निश्चितपणे असते. .

मानवी व्यवहारात विज्ञानाचा प्रत्यक्ष वापर हे बौद्धिक क्रांतीचे एक महत्वाचे लक्षण होते. मानवी व्यवहारात तंत्रविज्ञानाच्या स्वरूपात विज्ञानाचा प्रत्यक्ष उपयोग होऊ लागला. आधुनिक युगात अनेक संविधानकात यावर सातत्याने भर देण्यात येतो. मानवाचे ऐहीक जीवन सुधारण्यासाठी नव्या ज्ञानाने अनेक संधी उपलब्ध करून दिल्या आहेत हे त्या संविधानापैकी एक. मानव आपला व्यवहार ज्या पद्धतीने करतो त्यात क्रांती झाली. मग हा मानवी व्यवहार उत्पादन दळणवळण, संपर्क साधने, शेती आणि औषधोपचार या सारख्या विविध क्षेत्रात का असेना, त्यात नव्या तंत्रविज्ञानाने क्रांती घडवून आणली. पुरेसे अन्न, वस्त्र, निवारा, शिक्षण आणि औषधोपचार या सर्व गोष्टी सरतेशेवटी सर्वास उपलब्ध होणे शक्य झाले आहे. अशा तऱ्हेची अपेक्षा करणे मानवी इतिहासातच प्रथमच शक्य झाले. तसेच मानवी जीवनातून आवश्यक वस्तूंची व गोष्टींची चणचण आता पाश्चिमात्य जगतात तरी कायमची हद्दपार झाली. नाना तऱ्हेच्या सेवा आणि वस्तू दिवसेंदिवस प्रचंड प्रमाणात उपलब्ध होऊ लागल्या आहेत. त्यांच्यातील वाढही तितकीच वेगवान. इतकेच नव्हे तर डोई उपलब्ध असलेल्या उर्जेचे प्रमाणही एकसारखे वाढतेच आहे. पाश्चिमात्य जगतात तरी मानवाला यापुढे जिकरीचे शारिरीक श्रम करावे लागणार नाहीत. कारण स्वयंचलीत यंत्राच्या अस्तित्वामुळे त्या प्रकारच्या श्रमांची आवश्यकता दिवसेंदिवस कमी होत जाईल. मानवाच्या अवती-भोवती असलेल्या हवेवर आणि वातावरणावर मानवी प्रयत्नांनी लक्षणीय असे बदल घडण्याची शक्यताही विद्यमानकाळी दृष्टीपथात आली आहे, मानवजात जी जीवन-मूल्ये प्रमाण मानून जगते, त्या मूल्यांवरही वैज्ञानिक दृष्टीकोनाने प्रभाव पाडला आहे.

विश्वाची प्रकृती काय आहे या संबंधी आरंभीला ज्या कल्पना होत्या त्यावर धार्मिक आणि धर्मशास्त्रातील (Theologicon) श्रद्धा पूर्वी आधारलेल्या होत्या. त्या दोघांचाही विश्वाची प्रकृती आणि धर्मशास्त्र- यांचा पुर्नविचार झाला पाहिजे, त्यांचे नव्याने मूल्यमापन व्हावयास हवे हे आव्हान त्या दोघांपुढेही उभे ठाकले आहे. एकाद्या धर्मातील आणि श्रद्धेतील कोणती अंगे ही चिरंजीव अशा सत्यांचे प्रतिनिधित्व करतात आणि त्यातील कोणती एखाद्या विशिष्ट कालखंडाची आणि त्यातील संस्कृतीची प्रतिबिंबे आहेत, यातील फरकावर हे पुर्नमूल्यमापन आणि त्यांच्याबद्दलचा पूर्नविचार आधारलेला असेल. श्रद्धा आणि जीवनमूल्ये यात नेहमीच बदल होत असतो. परंतु आधुनिक जग हे असे आहे की त्यात टिकात्मक आणि समिक्षात्मक दृष्टीकोनावर विशेष करून भर दिलेला आहे. या पुर्नविचारामुळे आणि



अनुक्रमणिका

नव्या मूल्यमापनामुळे एक गोष्ट स्वाभाविकपणेच होणार. हा विचार होताना मानवाचे कल्याण या विचारास आग्रहक्क प्राप्त होणे आवश्यक ठरेल. मानवी अस्तित्वाच्या परिस्थितीत ऐहीक स्वरूपाच्या सुधारणा होण्याच्या दृष्टीने, आधुनिक युगाची सुप्तशक्तीची फारच प्रचंड आहे. आर्थिक आणि सामाजिक अंगाच्या विचारात इतिहास हा विषय वा त्या विषयांचे तयार झालेले शास्त्र, हे दिवसेंदिवस अधिक व्यस्त होत आहे. वाङ्मयात कादंबरी या कलाविष्काराला आवडत असलेल्या घाट (form) होऊ पहात आहे. आधुनिक जगाच्या कल्पनातीत अशा वैशिष्ट्यांचे संशोधन करण्याच्या दृष्टीने कादंबरी हा वाङ्मय प्रकार अधिक अनुरूप आहे हे त्या मागचे कदाचित कारण असेल. आधुनिक पाश्चिमात्य आधुनिक वाङ्मयातील महान कलाकृती समाज विषयक विचारात व्यग्र आहेत असे दिसते. सामाजिक बदल, आधुनिक मूल्ये, परंपरागत मूल्ये या दोघांच्यातील संघर्ष, आणि विशेशत: माणसासाठी स्थिर व पक्के असे नितीनियम वागणूकीसाठी उपलब्ध नसलेल्या युगात मानवाचे भवितव्य काय इत्यादी मूल्यांबद्दल पाश्चिमात्य आधुनिक वाङ्मयातील महान कलाकृतीत फार खोलात जाऊन विचार होतो. या सर्व बाबतीत-मानवाची प्रकृती, मानवी कल्याण आणि मानवाला उपलब्ध असलेली संधी- एवंच मानव हा आधुनिक विचाराचा केंद्रबिंदू बनला आहे.

विसाव्या शतकापासून संशोधनाची पद्धत व प्रकृती या दोहीतही उत्क्रांती होत आहे. या उत्क्रांतीचे परिणाम कितीतरी वेगवेगळ्या प्रकारचे आहेत. खरे म्हणजे त्या वेगळ्या प्रकारांची गणती करता येणार नाही. तसेच ते परिणाम सखोल आणि दुरगामी असेच आहेत. या साऱ्याचा विचार करताना एक महत्त्वाच्या गोष्टीचे भान ठेवणे आवश्यक आहे. प्रचलित कालखंडात संशोधनाची पद्धत व प्रकृती यात अतिशय नाट्यपूर्ण अशी भर पडली आहे. त्याजबरोबर एका प्रचंड बौद्धिक उत्पादनाच्या युगात आपण विद्यमानकाळी वास्तव्य करीत आहोत. एक अंदाज वर्तविण्यात येतो. त्यानुसार अत्यंत प्रगत अशा राष्ट्रामध्ये, त्या राष्ट्रातील एकंदर मानवी आणि बौद्धिक सामुग्रीपैकी जवळ जवळ एक चर्तुथांश भाग सर्व प्रकारच्या व स्वरूपाचे ज्ञानाचे उत्पादन करण्यात खर्ची होतो. या शतकाच्या आरंभीला हे प्रमाण विद्यमान प्रमाणाच्या एक तृतीयांश होते. सर्व जगात वैज्ञानिक विषयाला वाहिलेल्या नियतकालिकांची संख्या १८५० च्या सुमारास सुमारे एक लाख होती. इ. स. २०००च्या सुमारास ही संख्या दहा लाखाच्या घरात जाऊन पोचली आहे. इ. स. १४५० सालापासून दरवर्षी प्रसिद्ध होणाऱ्या ग्रंथात एकसारखी वाढ होत आहे. दर वीस वर्षांनी हे प्रमाण दुप्पटीने वाढल्याचे दिसते. इ. स. १९६८ साली ३ कोटी हून अधिक ग्रंथ प्रकाशित झाले असावेत. असा अंदाज आहे. इ. स. १९८० यानंतर हा आकडा ६ कोटींच्या घरात गेला असा अंदाज आहे. सर्वच प्रगत राष्ट्रातील वैज्ञानिक क्षेत्रात, नोकरी धंदा व काम करणाऱ्या माणसांच्या संख्येतही प्रचंड



अनुक्रमणिका

प्रमाणात वाढ होत आहे. सर्वात महत्त्वाचे काम हे आहे की वैज्ञानिक क्षेत्रात काम करणाऱ्या माणसात अधिक वेगाने वाढ होते. एवंच ज्ञानाच्या निर्मितीवर आणि वितरणावर खर्च प्रचंड प्रमाणात होतो ते निश्चित. त्याजवरोबर एकंदर समाजाचा जो काही वेळ आणि उर्जा आहे, त्यातही प्रचंड वेगाने वाढ होते आहे. परंतु ही एक आणखी सातत्याने होणारी वाढ कमी झालीच पाहिजे. याचे कारण ज्या वेगाने समाजाचा वेळ आणि उर्जा ज्या वेगाने खर्ची पडत आहे, तो वेग सातत्याने तसाच होत राहिला तर थोड्याच वर्षात सर्वच मानवी शक्ती, उर्जा आणि इतर भौतिक साधने हे वैज्ञानिक क्षेत्र गिळंकृत करील-आधुनिक ज्ञान, विचार आणि त्यांचे संगोपन याला किती मध्यवर्ती स्थान आहे हे जाणणे देखिल महत्त्वाचे आहे

**राजकीय**

आधुनिकीकरणाचे गर्भित असे राजकीय परिणाम एका बाबतीत अत्यंत लक्षणीय अशा पद्धतीने स्पष्ट झाले. खाजगी आणि सरकारी या दोन्हीही कार्यक्षेत्रात धोरण ठरविण्याबाबत एकसुत्रता येणे, यातून गर्भित असलेले ते राजकीय परिणाम स्पष्ट होतात. परस्पराशी संपर्क साधण्याची साधने आणि दळणवळणाची साधने या दोन्हीत जी तंत्रवैज्ञानिक स्वरूपाची प्रगती झाली आहे त्याचा काहीसा परिणाम म्हणून हे एकसूत्रीकरण शक्य झाले हे नि:संशय. या तंत्रवैज्ञानिक विकासामुळे एकाच प्रमुख अशा केंद्रातून फार मोठ्या विभागाचे आणि दिवसेंदिवस वाढत्या आकारांच्या प्रकल्पांचे प्रशासन करणे शक्य झाले आहे. हे जरी खरे असले तरी हे एकसूत्रीकरण सरकारी क्षेत्रातील आणि खाजगी क्षेत्रातील आधुनिकीकरण करू इच्छिणाऱ्या नेत्यांच्या इच्छेवर अधिक करू अवलंबून असते. या दोन्ही क्षेत्रातील पाश्चिमात्य समाजातील नेत्याना समाजातील साधने व संपत्ती ही कार्यप्रवण करण्याची तिचा अधिक काटकसरीने योग्य प्रकारे वापर करण्याची इच्छा असते. तसे करण्यामागे अधिक नियंत्रण, कार्यक्षमता आणि अधिक उत्पादन साध्य व्हावे हा हेतू असतो.

सरकारी क्षेत्राचा विचार करता, या एकसूत्रीकरणाने पुढील प्रकारचे स्वरूप धारण केले आहे. राज्याच्या सर्व प्रशासकीय क्षेत्राचे आणि संघटनाचे अधिक अधिक प्रमाणात केंद्रीकरण होणे असे त्याचे स्वरूप राहते. या सर्व जगात परंपरागत राज्यव्यवस्थेची क्षेत्रे प्रत्येक देशागणिक मोठ्या-प्रमाणात भिन्न राहिली आहेत. तसे होते वा असेलही. राज्यातील प्रत्येक नागरीकापर्यंत राज्यातील मध्यवर्ती सत्तेचा अधिकार हा भूतकाळात कधीही कधीही पोचला नव्हता. समाजातील अगदी तळागाळातील व्यक्तीला त्याची जाणही नसे. परचक्रापासून संरक्षण, देशात कायदा व सुव्यवस्था कायम राखणे, अत्यावश्यक अशा सरकारी सेवा कार्यरत ठेवणे आणि सर्व कामे करण्यासाठी पुरेसा पैसा जमा होण्यासाठी कर वसूल करणे, एवढ्या पुरतेच राज्याचे सत्तेचे स्वरूप आणि त्याची व्याप्ती मर्यादीत रहाण्याकडे प्रवृत्ती होती. चिन आणि रशिया हे दोन्ही देशही सर्वाधिकारशाही आणि पराकोटीचे केंद्रीकरण या करता प्रसिद्ध आहेत, त्या देशांची ती परंपरा आहे. परंतु त्या देशातही मध्यवर्ती सत्ता प्रत्येक

शेतकऱ्यापर्यंत अनेक अडत्यांच्या मदतीने समाजातील तळागाळात जाऊन पोचत होती. प्रत्यक्षपणे ती कधीही पोचू शकली नाही. अनेक प्रकारच्या मध्यसत्तामार्फतच ती प्रत्येक नागरीकांपर्यंत पोचे. आधुनिक काळापूर्वी अनेक वेगवेगळ्या संस्था आणि अधिकारी यांच्यात राजकीय सत्ता विखूरलेली असे. बहुतेक वेळी भिन्न भिन्न सामाजिक संस्थात या सत्तेची विभागणी होई. फार काळ चाललेल्या प्रदीर्घ लढ्यानंतरच राजाला ह्या स्थानिक सत्ताधिशांचा विमोड करण्यात यश आले. तोवर स्थानिक पातळीवर या वेगवेगळ्या संस्था, व अधिकारी यांचीच सत्ता प्रत्यक्षात होती. सर्व राष्ट्रात आपल्या सत्तेची बसाबस व्हावयास हवी आणि त्यात एकसूत्रीपणा यावा अशी राजाची इच्छा असे. पण प्रदीर्घ असा संघर्ष केल्यानंतरच राजांना ते उद्दिष्ट साध्य करणे शक्य झाले होते. राजकीय आधुनिकीकरणाच्या इतिहासातील अत्यंत नाट्यपूर्ण अशी काही पाने देशांतर्गत यादवी युद्धाच्या वर्णनांनी भरलेली आहेत, ही यादवी युद्धे केंद्रीकरण करू इच्छिणारी सत्ता एकीकडे, स्थानिक आणि प्रादेशिक क्षेत्रात प्रत्यक्ष अधिकार गाजविणाऱ्या सत्ता विरुद्ध बाजूला यांच्यातील तो संघर्ष असे.

स्थानिक अधिकारांच्या एकसूत्रीकरणातूनच आधुनिक राज्यांचा (states) जन्म झालेला आहे. या नंतर त्या राज्यांनी सामाजिक कार्ये ही पायाभूत मानून आपल्या सत्तेचा विस्तार करण्यास सुरुवात केली. या सर्व सामाजिक कार्याचा अंतर्भाव तोवर खाजगी अथवा स्थानिक क्षेत्रात होत असे. कुटुंब, गांव, जमिनदार, चर्च आणि इतर अनेक प्रकारच्या सामाजिक संघटना मुळात ही सर्व सामाजिक कार्ये पार पाडीत असत. विद्यमान काळी ही सारी कार्ये मध्यवर्ती सत्तेच्या कार्यकक्षेत हळूळहू एकत्रित करण्याची प्रवृत्ती दिसू लागली. काही समाजात सर्व शिक्षण, परस्पर संपर्काची साधने, दळणवळणाची साधने, सामाजिक सुरक्षितता, तसेच उत्पादनाची साधने आणि उत्पादन व्यवस्था ही सामाजिक कार्ये मध्यवर्ती सरकारच्या अखत्यारीत आणण्यात आली. या शिवाय समाजातील इतर प्रकारच्या बहुतेक सामाजिक चळवळी या ना त्या स्वरूपात सरकारी कक्षेत येत असत. स्वित्झरलंड आणि अमेरिका या दोन्ही देशात स्थानिक अधिकाराची मोठी बळकट परंपरा अस्तित्वात होती. त्या प्रकारच्या समांजात देखिल स्थानिक अधिकारांची खच्ची करून मध्यवर्ती सत्तेची सत्ता अधिक अधिक प्रमाणात वाढविण्याची प्रवृत्ती गेली अनेक वर्षे दिसून येते. खाजगी उद्योगधंदे काही समाजात अगदी घट्ट पाय रोवून उभे आहेत ही उत्पादन पद्धती सर्वसामान्यपणे अत्यंत कार्यक्षम अशीच आहे. पण अशा समाजाना मजबूत व शक्तिशाली मध्यवर्ती सत्ता आपल्या प्रकृतीला अनुरूप वाटत नाही. काही राष्ट्रात परंपरागतपणे मध्यवर्ती सत्तेने फार महत्वाची आणि व्यापक अशी भूमिका वठविलेली असते. या उलट काही राष्ट्रातील खाजगी उद्योगधंदे त्या राष्ट्रावर आलेली संकटे आणि त्या राष्ट्राना करावी लागणारे युद्धे यामुळे पार खिळखिळे झालेले असतात. या दोन्ही प्रकारच्या राष्ट्रात जेव्हा आधुनिकीकरण अवतरते, त्यावेळी ते

बहुतेक वेळा या ना त्या प्रकारच्या सर्वाधिकारशाही स्वरूपाच्या मध्यवर्ती सत्तेची सोबत घेऊनच अवतरते. या दोन्हीही बाबतीत एकच गोष्ट होते; या समाजातील सामाजिक संस्था जी सामाजिक कार्ये कार्यक्षमतेने पार पाडू शकत नाहीत, अथवा तसे करणे त्या संस्थाच्या ताकदीबाहेरच असते, अशा ठिकाणी मध्यवर्ती सत्तेला ही सामाजिक कार्ये आपलीच म्हणावी लागतात. अशा ठिकाणी सरकारी आणि खाजगी उद्योगधंदे यांच्यातील संबंध हे त्या त्या समाजात, सामाजिक कार्यक्षमता ज्या प्रमाणे परंपरागतपणे उत्क्रांत झाली आहे त्यावर अवलंबून असतात. आधुनिक राज्ये आपल्या एकंदर राष्ट्रीय उत्पादनाच्य एक चर्तुथांश किंवा एक द्वितियांश इतक्या प्रमाणात महसूल जमा करतात. सर्वसामान्य प्रशासन, सरकारी उद्योगधंदे, आणि सामाजिक सुरक्षितता यांना लागणारा पैसा त्या जमा महसूलातून खर्च होतो. या उलट परंपरागत समाजात एकंदर निर्माण झालेल्या राष्ट्रीय संपत्तीपैकी फक्त पाच टक्के भाग इतकी कमी रक्कम महसूल म्हणून जमा केली जाते.

आधुनिक राष्ट्रात सामाजिक कार्याचे केंद्रीकरण झालेले असते व कार्यकारण तत्त्वावर चाललेल्या कार्याच्या आधारे ते करण्यात येते. प्रगत समाजात अत्यंत सुसंघटीत अशा नोकरशाहीने प्रस्थापित केलेल्या आणि कायम राखलेल्या कायदा व सुव्यवस्थेशिवाय, ही कार्ये करणे आधुनिक राष्ट्राना शक्य होणार नाही. त्याजबरोबर ती राष्ट्रे आणि त्या राष्ट्रांतील प्रत्येक नागरीक यांच्यात जवळीक व सुसंवाद असेल तरच ते शक्य होते. राजकीय क्षेत्रात आधुनिकीकरण या प्रक्रियेचे एकच व्यवच्छेदक लक्षण आहे. कसलेही मार्गदर्शक तत्व नसलेल्या शासनपद्धतीखाली असलेल्या व्यक्ती वा नागरीक ही व्यवस्था जाऊन कायद्यावर आधारलेली शासनव्यवस्था येणे हेच ते लक्षण होय. आधुनिक शासन व्यवस्थेचा व्याप प्रचंड असतो. सुस्थापित कायद्याविना दुसऱ्या कोठच्याही मार्गदर्शक तत्वाच्या मदतीने हा एवढा मोठा पसारा कार्यक्षमतेने चालविणे आधुनिक शासनाला शक्य होणार नाही. धोरण विषयक बाबतीत अत्यंत उच्च पातळीवर कोठलेही मार्गदर्शक तत्व गृहीत न धरता घेतलेले निर्णय अजूनही आवश्यक आहेत. तसेच कायद्यावर आधारीत शासन पद्धतीत, तळागाळातील काही थरातही त्यांना जे काही हवे आहे त्याची निवड करण्यासाठी अनेक प्रकारच्या पसंती उपलब्ध असतात हे खरे आहे. परंतु सर्वसामान्यपणे मान्य झालेल्या मापदंडानुसार जोपर्यंत अशा प्रकारच्या निवडीचे क्षेत्र मर्यादीत होत नाही तोवर आधुनिक राज्य हे व्यवस्थितपणे आणि कार्यक्षमतेने चालणार नाही. म्हणूनच फार मोठ्या नोकरशाहीची आवश्यकता असते. शासनव्यवस्थेला ज्यांनी आपले जीवन वाहिले आहे, अशा बांधिलकीच्या व्यक्ती या नोकरशाहीत असाव्या लागतात. अनेक प्रकारच्या संघटनांना अनुरूप ठरतील अशी संघटना तत्वे उत्क्रांत झाली आहेत. अनेक गुंतागुंतीची धोरणे कार्यक्षमतेने कार्यवाहीत आणणे, शासनाच्या आधुनिक पद्धती आणि शासन व्यवस्थापनाची तंत्रे यामुळे ते शक्य झाले आहे.

आधुनिक राज्य आणि त्या राज्यातील नागरीक यांच्यात जवळीक व सुसंवाद असणे एका गोष्टीमुळे शक्य झाले आहे. आपल्या राज्यातील प्रत्येक नागरीकाबरोबर विद्यमान काळी राष्ट्राचे तसे प्रत्यक्ष संबंध असतात. ती गोष्ट आदीमानवी समाजातून प्रगत मानवी समाजात उत्क्रांत झालेल्या समाजाच्या इतिहासात प्रथमच घडत आहे. करपद्धती, परराष्ट्र धोरण, सामाजिक सुरक्षितता, आणि इतर भिन्नभिन्न स्वरूपांची कामे आधुनिक राज्यांना करावयाची असतात. हे त्या राष्ट्रातील सर्व नागरिकांनी समजावून घेतल्याशिवाय आणि ती कामे करण्याबाबतीतली राष्ट्राची भूमिका फार मोठ्या प्रमाणात नागरीकांनी स्विकारल्या शिवाय ती कामे पार पाडणे शक्य नसते. आम जनतेचा राजकारणातील सहभाग, हा अनेक स्वरूपातून प्रकट होईल. व्यक्तीला असलेल्या हक्कांबद्दलची परंपरा काही राष्ट्रात परंपरागतपणे चांगलीच बद्धमूल झालेली आहे. अशा राष्ट्रातील आधुनिक सरकार हे लोकशाही स्वरूपाचे असते, याचा अर्थ त्या राष्ट्रातले सर्व नागरीक, आपले राजकीय नेते निवडण्यासाठी आणि राजकीय धोरण ठरविण्याच्या बाबतीत काही प्रमाणात तरी सहभागी होतात. तसेच परिणामकारक अशा नागरी स्वातंत्र्याच्या मदतीने निवड करण्यासाठी व्यक्तीला आवश्यक असलेल्या हक्कांची हमी त्या समाजातून घेतली जाते.

लोकशाही समाजा व्यक्तिरिक्त इतर समाजातून राज्यकर्ते आणि त्या समाजातील सामान्य नागरीक यांच्यातील सामंजस्य अनेक प्रकारच्या लौकीक अशा करमणूकीच्या आणि प्रचारांच्या द्वारा साधण्याचा प्रयत्न होतो. तसेच या व अशाच प्रकारच्या अन्य मार्गाकरवी हे सामंजस्य वा एकवाक्यता प्रस्थापिक करणे शक्य झाले नाही तर पोलिसी दंडुक्याच्या जोरावर जबरदस्तीने ते प्रस्थापित करण्यात येते. पोलिसांच्या सैनिकी आणि गुप्तपोलिसांच्या पोलादी पकडीच्या नियंत्रणाखाली असलेल्या राज्यातही प्रचार आणि आर्थिक प्रलोभने यावर फार मोठी भिस्त ठेवावी लागते. आम जनतेने सरकारी कार्यक्रमात सहभागी व्हावे त्याचा आवश्यक प्रमाणात किमान स्विकार करावा, यासाठी अत्यंत करोल अशा पोलिसी राज्यानाही प्रलोभने देणे या मार्गाचा अवलंब करणे भाग असते. केवळ दहशतवादावर भरवसा ठेवून आधुनिक राज्यव्यवस्था पद्धती चालविता येणे शक्य नाही. म्हणूनच आधुनिक हुकूमशहा, विचार नियंत्रण, सार्वमत तयार करणे आणि नाममात्र स्वरूपाच्य प्रतिनिधी सभा या सर्व मार्गाकरवी आम जनतेचा पाठिंबा संपादन करण्याचे त्याचे जे कौशल्य असते वा त्या मार्गाने ते जे कर्तृत्व दाखविताना त्यावर त्याचे यश अवलंबून असते.

आपल्या नागरीकांनी या ना त्या स्वरूपात सरकारी कार्यक्रमांचा स्विकार करावा, त्यात सहभागी व्हावे यासाठी या दोन्ही गोष्टीवर आधुनिक समाज फार मोठ्या प्रमाणावर अवलंबून असतात. ते समाज या बाबीवर इतके अवलंबून असतात की हा अशा प्रकारचा स्विकार मिळविण्याच्या कर्तृत्वावर, त्या राज्याची संरचना अवलंबून असते. मानवी इतिहासात उत्क्रांत

होऊन विद्यमान काळी सिद्ध झालेल्या राष्ट्रापेक्षा भौगोलिक स्थान, आर्थिक परिपूर्णतः, किंवा सुरक्षितता इत्यादी घटकांच्या आधारे कितीतरी भिन्न स्वरूपाचे राजकीय गट निर्माण झाले असते. काहीजण असाही युक्तीवाद करतील की खंडप्राय अथवा जागतिक स्वरूपाची राजव्यवस्था पद्धती हीच विद्यमान युगात तरी अर्थपूर्ण आहे. वस्तुत: असे आहे की स्वखूषी अथवा जबरदस्तीने मिळविलेला पाठींबा पायाभूत मानून राष्ट्रांची व्याप्ती ठरते. तसेच ती व्याप्ती त्यापेक्षा अधिक मोठी असत नाही. विविध स्वरूपाच्या अनेक घटकांचा परिणाम म्हणून ही पायाभूत तत्वे सर्वसामान्यपणे निर्माण झाली. या घटकात समान ऐतिहासिक अनुभव हा अत्यंत महत्त्वाचा घटक आहे हे नि:संशय. बहुतेक बाबतीत अनुभवातील समान असे मुख्य वैशिष्टे समान भाषा हेच राहिले आहे. तसेच आधुनिक राज्यांना एकत्र येण्यासाठी राष्ट्रवाद हाच मुद्दा एकत्र येण्यासाठी वैशिष्ट्यपूर्ण केंद्रबिंदू ठरला आहे. राष्ट्राशी असलेल्या निष्ठात एकसूत्रीपणा आणण्याचे अत्यंत परिणामकारक असे ते साधन आहे हेही सिद्ध झाले आहे. समान भाषा हे साधन नसते, तर या निष्ठा अनेक प्रकारच्या संघटनाशी निगडीत होऊन विखुरल्या गेल्या असत्या. तथापि राष्ट्रीयत्वासाठी पूर्वाश्यक असे म्हणून भाषिक राष्ट्रवाद हेच फक्त एकमेव व आवश्यक असे साधन नाही. जगात बहुभाषिक राष्ट्रांची अनेक उदाहरणे आहेत. तसेच धर्म आणि इतर श्रद्धांनी बांधलेली अनेक राष्ट्रे आजही विद्यमान आहेत. त्याजबरोबर राष्ट्रांच्या सरहद्दी ह्या क्वचितच भाषा वा इतर प्रकारच्या राष्ट्रवादी घटकांबरोबर तंतोतंत व अचूक अशा असतात. तसेच दोन भिन्न राष्ट्रात विखुरल्या गेलेल्या या राष्ट्रवादी घटकाना कोणी एकत्र आणण्याचा प्रयत्न केला तर मग कधीही न संपणाऱ्या संघर्षाचे ते कारण ठरेल. समान भाषिक परंपरा लोकगटांचे भौगोलिक स्थान हे बरेच वेळा असे असते की वेगवेगळ्या व स्पष्ट अशा राजकीय गटांच्या निर्मितीचा मग प्रश्नच उपस्थित होत नाही. म्हणूनच समान भाषिक गटांच्या दरम्यान जो प्रदेश असतो त्याला सामिल करून घेण्याच्या उद्देशाने संघराज्य आणि अल्पसंख्याकांचे हक्क इत्यादी घटनात्मक तरतूदी उत्क्रांत झाल्या आहेत.

आधुनिक राज्ये हे त्या मानाने अगदी हवाबंद कप्पे असतात. लोकांचे संघटन हे त्या राज्यातूनच झाले आहे याचा अर्थ दोन किंवा अधिक राज्ये ज्या संघटनेत अंर्तभूत आहेत, त्यांचे प्रश्न नेहमीच्या व पारंपारीक अशा मार्गाचा वापर न करता सोडविणे भाग असते. आंतरराष्ट्रीय कायदा आणि राजनैतिक स्वरूपाची बोलणी या दोघांत अनुस्यूत असलेली जी तत्वे असतात त्यांचा विकास हा सतराव्या शतकापासून झाला. हिंसेच्या मार्गाचा वापर केल्याशिवाय काही विवक्षित प्रश्न हाताळणे विविक्षीत राज्यांना त्या तत्वामुळे हाताळणे शक्य झाले. आंतरराष्ट्रीय संघटनांची स्थापना हे त्या तत्वांच्या विकासातील एक महत्त्वाचे व लक्षणिय अंग आहे. या आंतरराष्ट्रीय संघटना अनेक राष्ट्रांवर परिणाम करणे व संबंधित अशी



अनुक्रमणिका

कार्ये हाताळण्याच्या उद्देशानेच स्थापन केल्या जातात. उदा. परस्पराशी संपर्क हे त्यापैकी एक कार्य. अगदी अलीकडचे उदाहरण घ्यावयाचे झाल्यास, शांतता कायम टिकविण्याचे सर्वसाधारण राजकीय कार्य करण्याच्या उद्देशाने स्थापन झालेली जागतिक संघटना संयुक्त राष्ट्रसंघ.

आधुनिक परिस्थिती लक्षात घेऊन धोरण ठरविण्यात एकसूत्री आणण्यासंबंधी येथे मांडलेले विचार हे खाजगी क्षेत्रानाही लागू पडतात. खाजगी उद्योगधंदे या क्षेत्रात केंद्रीकरण होणे आणि नोकरशाहीकरण यांच्या दिशेने आगेकूच करण्याची प्रवृत्ती प्रकट झाली आहे. एखाद्या खाजगी धंद्याचा व्याप केवढा असावा अथवा नेमका केवढा व्याप कार्यक्षम ठरेल याबद्दल वाजवी अशी मतभिन्नता जरूर आहे. एखाद्या उद्योगधंद्यातील केंद्रीकरणाची इयत्ता कोणती असावी हे त्या धंद्यात चालणाऱ्या उलाढालींच्या प्रकृतीवर आणि त्याच्या व्याप्तीवर बऱ्याच प्रमाणात आवश्यकपणे अवलंबून असले पाहिजे. काही वेळा असे सांगण्यात येते की, खाजगी मालकीच्या उद्योगधंद्यांपेक्षा सरकारी मालकीचे उद्योगधंदे हे स्वाभाविकपणे अधिक आधुनिक असतात. समाजातील अनेक घटकांत एकसूत्रीकरण आणणे आणि त्यांना सामावून घेणे हे राज्यव्यवस्था अधिक चांगल्या प्रमाणात करते; हे त्याचे कारण म्हणून सांगण्यात येते. परंतु वस्तुस्थिती तशी नाही हे अनुभवातून सिद्ध झाले आहे. आधुनिकतेच्या दृष्टीने कार्यक्षमता ही अत्यंत आवश्यक असा घटक आहे. त्याजबरोबर एकाद्या समाजात संघटनाचा जो ढाचा कार्यक्षम ठरतो तो दुसऱ्या समाजात कार्यक्षम ठरेलच असे नाही. तसेच कोणत्याही उद्योगात अंतर्भूत असलेल्या उलाढालीच्या प्रकृतीवर कार्यक्षमता बऱ्याच प्रमाणात अवलंबून असते. उदा. कोणत्याही आधुनिक समाजाला सैन्याचे प्रशासन, सार्वत्रिक प्राथमिक शिक्षण, फार मोठ्या प्रमाणावरचे बांधकाम या गोष्टी केवळ खाजगी क्षेत्राच्या मदतीने चालविणे शक्य झालेले नाही. ही क्षेत्रे सोडून दुसऱ्या अन्य क्षेत्रातील कार्यक्षमता ही त्या समाजाच्या सांस्कृतिक परंपरेवर फार मोठ्या प्रमाणात अवलंबून असते. काही समाजानी खाजगी क्षेत्रातील उद्योगधंद्यात व्यवस्थापनाच्या विभागात गेली कित्येक शतके उच्च प्रतीचे कौशल्य दाखविले आहे. त्याजबरोबर दुसरे अनेक समाज प्रामुख्याने सरकारी व्यवस्थापनावर कित्येक शतके अवलंबून होते. दुसऱ्या कोणत्याही प्रकारच्या व्यवस्थापनास आवश्यक असलेले मनुष्यबळ आणि मूल्य पद्धती ज्या समाजात उत्क्रांत झालेली नसते त्या समाजात खाजगी आणि सरकारी उद्योगधंदे या दोघांच्यातील संबंध हे त्या समाजाच्या विकासापेक्षाही त्या समाजाच्या सांस्कृतिक वारशाचा एक भाग असतो.

उद्योगधंद्यांना ज्या समाजात चांगली घट्ट व बळकट अशी मुळे आहेत, त्या समाजातही उत्पादन क्षेत्रात अंतर्भूत असलेली मालमत्ता ही दिवसेंदिवस अधिक प्रमाणात खाज़गी क्षेत्राकडून, निगम (कार्पोरेट) क्षेत्राकडे अधिक प्रमाणात हस्तांतरित होत आहे. या निगम (कार्पोरेट) स्वरूपाच्या व्यवस्थापनाचा एक विशेष आहे. त्या निगमात कार्यरत असलेले

व्यवस्थापक त्या मालमत्तेचे व्यवस्थापन करतात. आम जनतेचे हित लक्षात घेऊन सरकारने जी बंधने त्या निगम क्षेत्रावर लादलेली असतात, त्याच्या सीमात त्या व्यवस्थापकाना व्यवहार करावा लागतो. उत्पादनाच्या संलग्न असलेल्या मालमत्तेचे राष्ट्रीयकरण हा नियंत्रणाचा फार जुना पुराणा मार्ग. पाश्चिमात्य समाजाच्या एका विशिष्ट कालखंडाची ती प्रकृती, या कालखंडात युरोप मधील राजे आपल्याला न जुमानणारे अमीर-उमराव आणि धार्मिक संस्था यांची मालमत्ता सरकारकरवी जप्त करून, आपल्या स्वत:च्या स्थानास बळकटी प्राप्त करून घेत असत. याउलट प्रगत समाजात उत्पादनाशी संलग्न असलेल्या मालमत्तेचे नियंत्रण, सरकारकडून अधिक काटेकोरपणे होते. करपद्धती आणि इतर प्रकारचे नियंत्रण यांचा वापर होतो. दुसरे जे काही समाज प्रगत आहेत. ते समाज एकाधिकारशाहीवादी अथवा तानाशाहीवादी असतात. या अशा समाजातून होणारे नियंत्रण हे अन्य प्रगत समाजात होणाऱ्या नियंत्रणापेक्षा वेगळे असते. या प्रकारच्या समाजातून उत्पादन क्षेत्राशी निगडीत असलेल्या मालमत्तेचे नियंत्रण फारसे काटेकोरपणे होत नाही. ज्या मालमत्तेचा विनियोग विनियोगासाठी होतो ती मालमत्ता मुक्त समाजात – तानाशाही समाजापेक्षा – फारशा काटेकोरपणे अजूनही नियंत्रित केली जात नाही. याबाबतीत आधुनिकतेचे एक वैशिष्ट आहे. लोकहितासाठी उत्पादनाशी संलग्न असलेल्या मालमत्तेचे सरकारकरवी नियंत्रण हे ते वैशिष्ट होय. लोकहित म्हणजे काय हे अर्थातच राजकीय नेते ठरवितात. एकाधिकारशाहीवादी समाजवादी आणि साम्यवादी समाजात हे नियंत्रण सरकारी मालकीद्वारा कार्यवाहीत येते. दुसऱ्या अन्य मार्गाने ते नियंत्रण कार्यवाहीत येते. समाजाच्या परंपरागत संस्कृतीवर, नेतृत्वाच्या आणि राजकारणाच्या तत्कालीन गरजांवर ते मार्ग अवलंबून असतात. कायद्याचा वापर करून केलेल्या नियंत्रणाच्या मार्गाने ते कार्यवाहीत येतात. हे समाज किती आधुनिक झाले आहेत याच्याशी त्यांचा संबंध नसतो व त्यावरही ते अवलंबून नसतात.

**आर्थिक**

आर्थिक विकासाची चर्चा दोन प्रमुख घटकांच्या अनुषंगाने करता येईल. या दोन्ही घटकांची कार्ये परस्पराशी संबंधित आहेत. गुंतवणूक व बचत हेच ते दोन घटक होत. परंपरागत अर्थव्यवस्थेत जे काही धन निर्माण होते, ते जवळजवळ सर्वच खर्च करण्याकडे प्रवृत्ती असते. मग भांडवल गुंतवणूकीसाठी आणि आर्थिक विकास यांच्याशी संलग्न असलेल्या आर्थिक प्रगतीसाठी जवळजवळ काहीच शिल्लक राहात नाही. यदाकदाचित शिल्लक पडली तरी अगदी अल्प. एखाद्या अविकसित अर्थव्यवस्थेत समाजात जे काही उत्पादन होते त्याहीपेक्षा लोकसंख्येची वाढ अधिक असेल, तर जी काही थोडी व प्रमाणीत बचत होईल तिचा काहीही उपयोग होत नाही. दरडोई एक विविक्षित रक्कम शिल्लक राहणे हेच भांडवली गुंतवणूकीच्या दृष्टीने ती बचत व्हावी या मागचे उद्दिष्ट असते. तोच प्रमुख आधार असतो. ही अशी तऱ्हेची बचत उपलब्ध असेल तरच विकास शक्य कोटीत येतो. विद्यमान काळी जी राष्ट्रे विकसित समजली जातात त्या राष्ट्रात दोन-तीन शतकांपूर्वी हेच घडले होते. झटपट आर्थिक विकास

होणे ही प्रक्रिया जेव्हा मार्गस्थ झाली, त्यावेळी त्या राष्ट्रातून दरडोई भरपूर जमीन उपलब्ध होती आणि दरडोई उत्पन्नाचे प्रमाणही जास्त होते. थोडक्यात अधिक जमीन आणि जास्त उत्पन्न यामुळे मिळणारे दोन्ही फायदे या राष्ट्राना उपलब्ध होते. आर्थिक विकासाच्या बाबतीत पश्चिम युरोपमधील राष्ट्राना सर्वाअगोदर मार्गस्थ होण्याची संधी मिळाली त्यामागचे ते एक निश्चित असे कारण आहे. अप्रगत देशात विद्यमानकाळी, दरडोई जमीन ज्या प्रमाणात उपलब्ध आहे आणि दरडोई उत्पन्नाची जी पातळी आहे त्यापेक्षा पश्चिम युरोपमधील प्रमाण कितीतरी जास्त होते. त्यामानाने अधिक संपन्न अशा अर्थव्यवस्थेत, नव्या तंत्रविज्ञानाचा वापर होऊ लागल्याकारणाने, अत्यंत आवश्यक अशा आर्थिक विकासात त्या वापराची परिणिती झाली. या आर्थिक वाढीबरोबर काही क्षेत्रात विशिष्ट कौशल्याची वाढ (Specialisation) झाली. त्याचा परिणाम म्हणून पूर्वीपेक्षा कितीतरी अधिक प्रमाणात उत्पादन होऊ लागले. उत्पादन वाढल्यामुळे बचतीचे प्रमाणही वाढले.

विशिष्ट कौशल्यांच्या वाढीबरोबर अंतर्गत आणि परदेशी व्यापाराचा विस्तार झाला. या विस्तारामुळे त्यामानाने अधिक सुसूत्र अशा आर्थिक व्यवस्था व पद्धतीत फार विस्तृत भूभागातील नाना कौशल्याच्या व प्रवृत्तीच्या लोकांना आणि विविध अशा साधन सामुग्रीला एकत्रित करणे शक्य झाले. एकादा परंपरागत ग्रामीण समाज हा जवळजवळ स्वयंपूर्ण असेलही. स्थानिक पातळीवर उपलब्ध असलेल्या नैसर्गिक साधनसामुग्रीतून अन्न, कपडा आणि अवजारे यांचे उत्पादन तो करीत असेल. वेळप्रसंगी फिरस्त्या व्यापाऱ्यांकडून काही वस्तू तो खरेदी करीतही असेल. याउलट आधुनिक समाजाचे आहे. काही थोड्याच वस्तू निर्माण करण्यासाठी आधुनिक समाज आपले सारे प्रयत्न कामी लावील. या समाजात ज्या अनेक वस्तूंची गरज असते त्यातील बऱ्याचशा तो बाहेरून खरेदी करील. या आधुनिक समाजात बचतीचे स्वरूप दोन प्रकारचे असते. एक खाजगी क्षेत्रात झालेल्या नफ्यातील बचत अगर दोन सार्वजनिक क्षेत्रात जे कर गोळा होतात, त्यातून होणारी बचत. या दोन्हीही बाबतीत अनेक धोरण विषयक प्रश्न निर्माण होतात. त्या दोहोपैंकी कोणत्या मार्गाचा अवलंब करून, बचत करण्याचे ध्येय गाठावे याच्याशीच ते सारे प्रश्न संलग्न असतात.

समाजातील साधनसामुग्रीचे वाटप कसे करावे हा प्रश्न भांडवल-गुंतवणूक कशी करावी या प्रश्नाला पुरक आहे. बचत आणि गुंतवणूक या दोन्ही क्रिया सर्वसाधारणपणे पुढील काही संस्थांमार्फत (उदा. – सरकार, पतपेढ्या, सहकारी संस्था, उद्योगधंदे आणि काही धनवान व्यक्ती–) होत असतो. एखाद्या अर्थव्यवस्थेची क्षमता किती मोठी आहे आणि गुंतवणूक करणाऱ्यांचे हेतू आणि त्याच्या एकंदर विचारांची तरलता, कोणत्या पातळीवर आहे यावरच गुंतवणूक धोरण अवलंबून असते. सर्वसाधारणपणे बोलावयाचे झाल्यास ज्या प्रकारच्या साधनात अंतर्भूत असलेल्या वस्तू व माल यांच्याकरवी दुसऱ्या प्रकारच्या वस्तूंचे व मालाचे उत्पादन करतात. उदा. दळणावळणाची साधने, कच्च्या मालाचे उत्पादन करणारे कारखाने

आणि अवजड उद्योगधंदे – अशा उत्पादन – वस्तूत व मालात – गुंतवणूक प्रचंड प्रमाणात केल्यास, आर्थिक विकास जलद होईल. परंतु त्यामुळे एकंदर लोकसंख्येवर फारच मोठा बोजा पडेल. याउलट त्यामानाने ताबडतोब उपयोगात यावयाच्या ग्राहक वस्तूंच्या उत्पादनासाठी फार मोठ्या प्रमाणात गुंतवणूक केल्यास लोकसंख्येतील बहुसंख्य लोकांचा फायदा होईल हे खरे. परंतु त्या अर्थव्यवस्थेच्या उत्पादन क्षमतेत त्याकारणाने प्रचंड प्रमाणात घट होईल. याशिवाय या अशा बाबतीत समाजाना स्वतंत्रपणे निवड करता येते असे नाही. समाज जोपर्यंत एका विशिष्ट टप्प्यापर्यंत विकसित झालेला नसतो तोपर्यंत ग्राहक वस्तूंच्या उत्पादनावर जोर देता येत नाही. असे असले तरी विकासाच्या प्रत्येक टप्प्यावर गुंतवणूकीच्या पद्धतीत नेहमीच काहीना काही निवड करणे प्राप्तच असते. **ही निवड प्रामुख्याने आणि मुलतः राजकीय स्वरूपाची असते.** काही राजकीय नेते, उत्पादन वस्तू व मालात यांचा प्रचंड विकास व्हावा हे उद्दिष्ट नजरेसमोर ठेवून आपल्या अनुयायांकडून आणि एकंदर लोकसंख्येकडून जास्तीत जास्त त्यागाची मागणी करावयास तयार असतात. याउलट दुसरे काही नेते, विकासाच्या अगदी आरंभीच्या अवस्थातही लोकांच्या जीवनमानात, दरवर्षी थोडी थोडी वाढ व्हावी यासाठी तरतूद केली पाहिजे या विचारसरणीस अधिक पसंती दर्शवितात.

आधुनिकीकरणाची आर्थिक बाजू ही इतकी नाट्यपूर्ण आहे की ती या प्रक्रियेचा मध्यवर्ती भाग आहे व तिचे भविष्य नक्की करणारी ती शक्ती आहे. याच दृष्टीकोनातून त्या बाजूकडे अनेकजण पाहतात. वस्तुतः आर्थिक विकास हा कितीतरी प्रमाणात या प्रक्रियेच्या बौद्धिक बाजू तसेच ज्ञानातील वाढ आणि समाजाची साधन सामुग्री कार्यान्वित करण्याचे त्या समाजातील नेतृत्वाचे कर्तृत्व या घटकांवर अवलंबून असतो. परंतु व्यक्तीवर परिणाम करण्याच्या बाबतीत आर्थिक विकास आणि वाढ ही फारच आग्रही ठरली आहे. याबद्दल संशय नाही. अधिक प्रगत समाजात दरडोई खरे खरे उत्पन्न दहा किंवा वीस पटीने, वेळप्रसंगी अधिक प्रमाणात वाढले आहे. या आर्थिक वाढीच्या केंद्रस्थानी वैज्ञानिक आणि तंत्रवैज्ञानिक क्षेत्रातील क्रांती आहे. या क्रांतीमुळे श्रमशक्तीचे यांत्रिकीकरण करणे शक्य झाले. या यांत्रिकीकरणाचा परिणाम म्हणून उत्पादनात 'न भूतो' अशी वाढ झाली. दुसऱ्या क्षेत्राप्रमाणे याही क्षेत्रात अधुनिक स्वरूपाच्या नवनिर्माणतेची मुळे पार पश्चिम युरोपच्या मध्य युगात होती असे दिसेल. निदान त्यांचा उगम तेथवर नेऊन भिडवता येईल. परंतु एकोणिसाव्या आणि विसाव्या शतकातील पाश्चिमात्य देशातील अत्यंत जलद गतीच्या औद्योगिकरणामुळे ही प्रक्रिया तिच्या अत्यंत गतिमान अवस्थेत आलेली आहे.

माणसे एकाद्या क्षेत्रात अगर विषयात पारंगत होतात. हे पारंगत होणे वाढीस लागते. याचा परिणाम उत्पादीत माल आणि सेवा या दोहोंची देवाण-घेवाण त्या क्षेत्रात होत असते विस्तारीत होते. एखाद्या राष्ट्रात अंतर्गत आणि त्या बाहेरही प्रवासावर आणि व्यापारावरून निर्बंध होते ते हळूहळू दूर झाले. यामुळे प्रचंड बाजारपेठा निर्माण झाल्या. या पेठाना मालाचा पुरवठा



अनुक्रमणिका

करणाऱ्या कारखान्यात तयार होणाऱ्या ठोक उत्पादनातून होई. ठोक उत्पादन होऊ लागल्या-कारणाने वस्तूंच्या किमती कमी झाल्या. एक तास काम केल्यांनाच मिळणारे खरे उत्पन्न वाढीस लागले. या झालेल्या विस्ताराने आणि वाढीने उद्योग आणि व्यापाराइतकाच शेतीवर परिणाम झाला. मानवी कारभाराच्या प्रत्येक क्षेत्रात यंत्र हे मानवाच्या मदतीस आले होते.

परंपरा आणि आधुनिकता यांच्यातील आर्थिक क्षेत्रातील फरक अनेक प्रकारच्या परिणामानी आणि आकडेवारीने मोठ्या लक्षणीय पद्धतीने सिमित करता येतो. दरडोई एकंदर राष्ट्रीय उत्पादन हे त्यापैकी एक परिमाण आहे. या परिमाणात अनेक त्रुटी आहेत. परंतु त्याचा वापर सर्वत्र करण्यात येतो. जगातील अत्यंत प्रगत अशा बारा किंवा त्यापेक्षा अधिक समाजांचे दरडोई एकंदर राष्ट्रीय उत्पन्न इ. स. १९७०च्या सुमारास ८०० ते २५०० डॉलर होते. विद्यमानकाळी हे आकडे आणखीनच मोठे झाले आहेत. याउलट कमी विकसित अशा पंचवीस समाजात दरडोई एकंदर राष्ट्रीय उत्पन्न २०० डॉलर आहे. अविकसित देशात जगाच्या लोकसंख्येतील अर्ध्याहून अधिक लोकवस्ती आहे. आधुनिक समाजाच्या एकंदर राष्ट्रीय उत्पन्नाचा एक षठांश किंवा एक चतुर्थांश एवढ्या उत्पन्नाची पुनर्गुंतवणूक होते. यापैकी काही देशात आर्थिक वाढीचा वेग हा त्या देशातील लोकसंख्येच्या वाढीपेक्षा कमी आहे. याचा अर्थ त्या देशातील नागरिक हे हळूहळू दिवसेंदिवस अधिक गरीब होत जात आहेत. आधुनिक समाज तंत्रविज्ञानाचा वापर प्रचंड प्रमाणात करतो. पण परंपरागत समाज तंत्रविज्ञानाचा वापर फारसा करीत नाही. म्हणूनच आधुनिक आणि परंपरागत समाजातील आर्थिक. पातळ्यात आणि विकास व वाढीच्या आकृतिबंधात प्रचंड तफावत असल्याचे आढळून येते. विद्यमानकालीन आधुनिक समाज आणि त्याच समाजांची काही शतकापूर्वीची अविकसित अवस्था यांच्यातील तफावत, यांच्याबरोबर आधुनिक आणि अविकसित समाजातील तफावत यांच्यातील तुलना उद्‌बोधक ठरले. साधन सामुग्री आणि अनेक प्रकारची कौशल्ये याबाबतीतही समाजा-समाजात मोठीच तफावत आहे. त्याचे प्रमाण इतके प्रचंड आहे की, सर्वत्र समाजांची एकाच गतीने वाढ होईल, त्यांच्या विकासाची पातळी उंचावण्याचा वेगही एकच असेल असे गृहीतच धरता येणार नाही. विद्यमान काळी जे समाज प्रगत आहेत, त्यांच्या जवळपासही अविकसित देशांचा वेग येणार नाही. म्हणूनच असे आढळून आले आहे की, विसाव्या शतकाच्या पहिल्या पूर्वाधात, प्रगत देश आणि अप्रगत देश यांच्यातील तफावत रुंदावत आहे. आर्थिक वाढीच्या वेगात हा असा फरक का आहे याचे स्पष्टीकरण मिळविण्यासाठी अर्थशास्त्रापलीकडे जाऊन राजकीय, सामाजिक आणि मानसिक हे सर्व घटक विचारात घ्यावे लागतील.

**सामाजिक**

आधुनिकीकरणाच्या बौद्धिक, सामाजिक आणि राजकीय बाजूंबरोबर त्याना पूरक ठरतील अशा पद्धतीने पाश्चिमात्य समाजात मोठे सामाजिक बदल झाले. या सर्व प्रक्रियेत कोणते सामाजिक बदल अंतर्भूत आहेत? अनेक शतकापर्यंत जे समाज मुख्यत्वे करून शेती

व्यवसायावर अवलंबून होते, त्यात मोठे परिवर्तन घडून आले. आधुनिकीकरणास आरंभ होईपर्यंत पाश्चिमात्य समाजातील एकंदर लोकसंख्येपैकी १० टक्क्यांपेक्षा अधिक लोक, प्रशासन, कारखानदारी आणि व्यापार या क्षेत्रात कधीही नव्हते. बाकीचे सारे लोक शेती व्यवसाय करीत. थोड्याच पिढ्यांच्या कालावधीत या प्रमाणात आमूलाग्र फरक झाला. विद्यमान काळी पाश्चिमात्य समाजात, त्यामानाने फार थोडे लोक ग्रामीण भागात राहतात, इतका तो बदल प्रचंड आहे. व्यवसायातील या बदलाबरोबर ग्रामीण भागातून शहराकडे माणसांचे लोंढेच्या लोंढे जाऊ लागले. थोड्याच पिढ्याच्या कालावधीत, या पाश्चिमात्य देशातील एकंदर लोकसंख्येपैकी तीन-चतुर्थांश किंवा त्याहूनही अधिक लोकसंख्या शहरातून वस्ती करून आहे. या देशातील या शहरीकरणामुळे सर्वसाधारणपणे पुढील सामाजिक बदल घडताना दिसतात. कुटुंबाच्या स्वरूपात व रचनेत फार लक्षणीय असे परिवर्तन झाले आहे. शहरीकरण होण्यापूर्वी शेतकी जीवनाशी संबंधित असे गण-गोतानी भरलेले मोठे कुटुंब असे. शहरीकरणानंतर याच मोठ्या कुटुंबाची जागा अणुवत (Nuclear) अशा छोट्या कुटुंबानी घेतली आहे. या जडसृष्टीत अणू हा अगदी मुलभूत पण अगदी छोटा भाग. या अणुवत कुटुंबात आई-बाप आणि त्यांची छोटी मुले यांचाच फक्त समावेश आहे. **विद्यमानकाळी हा अनुभव आपण भारतात विशेष करून महाराष्ट्रात घेत आहोत. आधुनिकीकरणाची ती नांदी समजावयाची का?** प्रगत समाजात भौगोलिक अभिसरणही कितीतरी अधिक प्रमाणात होते. एकंदर लोकसंख्येपैकी जवळजवळ एकपंचमांश भाग व्यावसायिक गरजेला प्रतिसाद म्हणून एका ठिकाणाहून दुसऱ्या ठिकाणी स्थलांतर करतो.

या प्रवृत्तीबरोबरच पाश्चिमात्य समाजात दुसऱ्याही अनेक गोष्टी घडताना दिसतात. एकीकडे प्रत्येकाचे आर्थिक उत्पन्न, शिक्षण, त्याला मिळणारी संधी या सर्व गोष्टी कितीतरी मोठ्या प्रमाणात समान पातळीवर आल्या आहेत. त्याजबरोबर आणखीही एक अनुषंगिक मुद्दा लक्षात ठेवला पाहिजे. **समाजातील राजकीय आणि सामाजिक भूमिकात या सर्वात त्याच प्रकारची समानता आलेली नाही.** विवेचनाच्या या स्थळी असा प्रश्न कोणी उपस्थित करील की अशा प्रकारची असमानता कधी नाहीशी होणे शक्य आहे का? याचे कारण प्रत्येक व्यक्तीच्या अंगी असलेल्या गुणात कितीतरी फरक असतोच. परंतु हेही लक्षात घ्यावयास हवे की, समाजाला आवश्यक असलेल्या कार्याची गरजही अगदी भिन्न-भिन्न प्रकारची असते व ती सतत बदलत असते. या भिन्न गरजा पुऱ्या करण्यासाठी, समाजाची आपल्यात समाविष्ट असलेल्या व्यक्ती-पासून वेगवेगळ्या सामाजिक भूमिकांची अपेक्षा असते. **प्रतिभाशाली नेतृत्व या अत्युच्च टोका इतक्याच आवश्यक अशा पण कमी नाट्यपूर्ण अशा गुरे राखणे आणि रस्ते झाडणे या सामाजिक भूमिकांचाही त्यात अंतर्भाव असतो.** कार्यक्षमता आणि उपलब्ध साधन सामुग्रीचा कमीत कमी व्यय, ही दोन्ही तत्त्वे आधुनिकीकरणात अनुस्यूत आहेत. या तत्त्वानुसार सर्वांना



अनुक्रमणिका

समान संधी मिळणे, हे समानतेपेक्षाही अधिक अपेक्षित असते. तसे झाले म्हणजे मग समाजातील सर्वत्र व्यक्तींना आपल्या कर्तृत्वास आणि आवडीला उत्तमपणे अनुरूप होतील अशा भूमिका समाजात प्राप्त होतील. कोणत्याही समाजात नेत्यांची जडणघडण, त्यांचे शिक्षण, ते ज्या वर्गातून निर्माण होतात ते वर्ग थोडक्यात सांगावयाचे झाल्यास समाजातील अभिजन (Elite) या सर्व बाबी अत्यंत महत्त्वाच्या आहेत.

आधुनिकीकरणाबरोबरच साक्षरतेच्या प्रचाराची व्याप्ती वाढते. (साक्षरता म्हणजे काय हा खरे म्हणजे फारच वादग्रस्त मुद्दा आहे !) परंपरागत समाजात साक्षरता सार्वत्रिक असते. जवळजवळ सर्वांनाच लिहिता-वाचता येऊ लागते असे आमच्या गृहित धरूया. पण याचा अर्थ त्यांनी वाचलेले त्यांना समजते असे नाही, वा चार ओळीचे पत्र त्यांना लिहिता येते असे नाही. त्यांना अक्षर-ओळख होते एवढाच त्याचा अर्थ. साक्षरतेबरोबर शिक्षणाचाही विस्तार होतो. तो इतक्या प्रमाणात होतो की, काही पाश्चिमात्य आधुनिक समाजात तरी जवळजवळ सर्वांनाच माध्यमिक शालेय शिक्षण आणि एकंदर लोकसंख्येपैकी एक तृतीयांश लोकांना त्यापेक्षाही उच्च स्तरावरचे शिक्षण मिळते. या शैक्षणिक विस्तारामुळे माहिती-ज्ञान संपादन आणि त्याचा प्रसार यांच्यात क्रांती झाली आहे.

स्त्री-पुरुष संबंधातही पाश्चिमात्य जगतात फार मोठा लक्षणीय असा फरक झाला. आधुनिक युगापूर्वी त्या समाजातील स्त्रियांचे स्थान हे एकाच गोष्टीवर आधारित असे. बहुतेक लोकांचा उदरनिर्वाह प्रचंड अशा शारीरिक श्रमावर अवलंबून होता. पुरुषच या प्रकारचे काम उत्तम प्रकारे पार पाडीत. स्त्रियांना या प्रकारची कामे करता येणे सामान्यपणे शक्य नसल्याकारणाने समाजातील त्यांच्या प्रतिष्ठेवर परिणाम होणे अपरिहार्य होते. कालांतराने पाश्चिमात्य समाजात, शारीरिक श्रमांची जागा, हळूहळू यांत्रिकी श्रमानी, कचेरीतील लिखापढीने आणि बौद्धिक श्रमानी घेतली. यामुळे आजवर चालत आलेली स्त्री-पुरुष यांना करावयाच्या कामातील तफावत कमी कमी होत चालली. निदान पाश्चिमात्य समाजात तरी, त्याचा परिणाम गेली कित्येक शतके सामाजिक संबंधाचे जे आकृतिबंध मान्य झाले होते, त्यांनाच आव्हान मिळाले. स्त्री-पुरुष यांच्यातील हे बदलते संबंध हे अनेक प्रश्नांनी व्यापलेले आहेत. तसेच या संबंधाना अनुरूप होतील त्यांना सामोरे जाण्यास उपयुक्त ठरतील अशा संस्थाचे स्वरूप काय असेल याबद्दलही विचार त्या पाश्चिमात्य समाजात होत असतो. तेथे या नव्या सामाजिक संस्थाचे स्वरूप अधिक स्पष्ट व्हावे यासाठी प्रयत्न होत आहेत. स्त्रियांचा उद्धार होण्याच्या दृष्टीने शिक्षण हेच प्रमुख वाहन ठरले. त्याजबरोबर स्त्रियांच्या सामाजिक आणि कायदेशीर स्थानातही परिवर्तन झाले. हे परिर्वतन स्त्रियांना पुरुषांच्या बरोबरीने संधी प्राप्त व्हावी, त्यांच्यावर अधिक प्रमाणात जबाबदारी सोपविण्यात आलीच पाहिजे, हे उद्दिष्ट नजरेसमोर ठेवून झालेले आहे.

वृत्तपत्रे, नियतकालिके आणि इतर प्रसार व प्रचार माध्यमाकरवी, ज्या व्यक्तीला जगात काय चालले आहे याबद्दल दिलचस्पी आहे तिला अनेक क्षेत्रातील विकासाशी संपर्क ठेवता

येतो. परस्पर-संपर्क साधनांच्या या जाळ्यात झालेल्या वाढीमुळे समाजात एकात्मता निर्माण होण्यास मोठा हातभार लागला आहे. आधुनिक समाजातील अनेक भिन्न भिन्न घटकात जवळीक निर्माण होऊन ती कायम रहावी हेही या संपर्क साधनामुळेच ाक्य होते. आधुनिक समाजात दर हजार व्यक्तीमागे इ. स. १९७०च्या आसपास, २५० ते ५०० नियतकालिके प्रकाशित होऊन वाचली जात होती. प्रत्येक वर्षी दरडोई १०० ते ३०० घरगुती पत्रांची वा तत्सम गोष्टींची देवाण-घेवाण होत असे; २५० ते ९०० जणांकडे घरात आकाशवाणी संच होते; ३०० दूरदर्शन संच होती, दरवर्षी दरडोई १० ते २५ वेळा लोक सिनेमा पहात इत्यादी एकविसाव्या शतकाच्या पहिल्या दशकात या सर्वच आकड्यात प्रचंड वाढ झालेली आहे. अनेक परंपरागत समाजात एका शतकाहून अधिक काळापूर्वी यापैकी एकही संपर्क साधन नव्हते. अप्रगत देशात विद्यमानकाळीही ही साधने असलीच तर अत्यंत मर्यादीत प्रमाणात.

पाश्चिमात्य समाजात यंत्राची मदत असल्याकारणाने एकंदर लोकसंख्येपैकी फारच थोडा भाग या देशातून अन्नधान्य उत्पादनासाठी आवश्यक असतो. याउलट यापूर्वी त्या देशातल्या लोकसंख्येची बहुतेक लोक शेती व्यवसायात होते. निरनिराळ्या व्यवसायातील तफावत, त्या व्यवसायातून प्राप्त होणाऱ्या उत्पन्नातील फरक हा आधुनिक समाजात कितीतरी प्रमाणात कमी झालेला आहे. यापूर्वी जी कामे बाहूंची मदत घेऊन केली जात, ती दिवसेंदिवस अधिक अधिक प्रमाणात यंत्रानी केली जात असल्याकारणाने मानवी श्रमशक्तीला पाश्चिमात्य समाजात तरी फारच छोटी भूमिका राहिली आहे. या आधुनिक समाजात एकंदर लोकसंख्येतील अर्ध्याहून अधिक भाग वेगवेगळे शेतीबाह्य क्षेत्रे, सेवा क्षेत्रे आणि कचेरीतील कारकूनी व्यवसायात गुंतलेले आहेत. म्हणूनच श्रमशक्तीची भूमिका या प्रमाण कनिष्ठ होणे हे क्रमप्राप्तच.

विशेष करून पाश्चिमात्य समाजातील आरोग्यातही लक्षणीय सुधारणा झाली. आधुनिक औषध उपचाराचा तो परिणाम. परंपरागत समाजात जन्म आणि मृत्यू या दोहोंचेही प्रमाण ३ ते ४ % टक्क्यांच्या दरम्यान असे. प्रदीर्घ काळापर्यंत हे प्रमाण स्थिर राहिले. आधुनिक औषध-उपचार आणि आरोग्याला पुरक अशी सार्वजनिक साफसफाई या दोहोंतील प्रगतीबरोबर मृत्यूच्या प्रमाणात जलद गतीने घट झाली. परंतु जन्माचे प्रमाण मात्र अनेक वर्षांपूर्वी इतकेच म्हणजे जसे होते तसेच राहिले होते. प्रगत समाजात सामाजिक दबाव, कुटुंबरचना कौटुंबिक वागणूक यांच्यात झालेला फरक या दोन्ही कारणामुळे बालक-जन्माचे प्रमाण कितीतरी कमी झाले. लोकसंख्येच्या वाढीचा वेग त्यामुळे मंदावला. एकोणिसाव्या शतकाच्या आरंभी युरोपची लोकसंख्या इ. स. १८०० साली १८८० लाख होती. ती इ. स. १९१४ साली ४६२० लाख झाली. युरोपनंतर प्रगती पथावर आगेकूच करणाऱ्या समाजात आधुनिक औषधे आणि उपचार या दोन्हींचा प्रभाव जोरदारपणे जाणवला. त्यामुळे मृत्यूचे प्रमाण कमी झाले. परंतु बालक-जन्माचे प्रमाण मात्र परंपरागत आकृतिबंधाप्रमाणेच राहिले. म्हणूनच त्या देशातील लोकसंख्या वाढीचा वेग 'न भूतो' असा होता. आधुनिक समाजात दर हजार बालक जन्मामागे १६ ते ३०

बालके मरण पावतात. आधुनिक समाजातील व्यक्तीचे सरासरी आयुष्य ७० ते ७५ वर्षे आहे. परंपरागत समाजात दर हजार बालक जन्मामागचे मृत्यूचे प्रमाण १०० ते २२५ च्या दरम्यान असते; आणि व्यक्तीचे आयुष्य सुमारे २५ ते ६० वर्षाइतके कमी असते. आधुनिक समाजात दर ५०० ते १००० रहिवाश्यामागे एक प्रशिक्षित डॉक्टर असतो. परंपरागत समाजात हेच प्रमाण दहा हजार ते एक लाखाच्या दरम्यान आहे. **या साऱ्याच आकडेवारीत भारतात तरी फारच बदल झाला आहे. भारत आधुनिकीकरणाच्या रोखाने आगेकूच करीत असल्याचे ते द्योतक आहे.**

आधुनिकीकरणामुळे समाजात निर्माण झालेल्या उत्पन्नाचे वाटप अधिक समप्रमाणात होते. म्हणजे समाजातील विषमता थोडी कमी होते. व्यक्तीचे जे उत्पन्न असते त्यावरील कर चढत्या भाजणीत असतो हे त्याचे एकमेव कारण आहे असे नव्हे. तसेच व्यक्तीच्या सामाजिक सुरक्षितेसाठी केलेल्या तरतूदीमुळे त्यामानाने अधिक प्रगत समाजात सामाजिक गटातील उत्पन्नातील तफावत कमी आहे असे नाही. जनतेची ग्राहक शक्ती कारखान्यातील प्रचंड उत्पादनावर अवलंबून असते व त्यामुळेच सामाजिक गटात असलेली तफावत अरुंद होते. ही दोन्ही कारणे उत्पन्नाच्या समवितरणास हातभार लावतात. आणखीही एक महत्त्वाचे कारण आहे. ठोक उत्पादन हे ठोक ग्रहणशक्तीवर अनिवार्यपणे अवलंबून असते. समाजाचे ज्या प्रमाणात औद्योगिकीकरण होत जाते, त्या प्रमाणात समाजातील सर्वच गट कालांतराने पूर्वीपेक्षा अधिक संपन्न होतात. शिवाय ज्या गटांचे उत्पन्न प्रारंभी बेताचे असते. त्यांच्या उत्पन्नात भर पडते. ही भर ज्या गटांची मिळकत सुरुवातीला जास्त असते त्यांच्या मानाने अधिक असते. ठोक ग्रहणशक्ती असलेले प्रचंड संख्येचे ग्राहक नसतील, तर ठोक उत्पादन व्यवस्था केव्हाच कोसळून पडेल; याबद्दल शंकाच नाही. परंपरागत समाजात अत्यंत उच्च आर्थिक स्थरावर असलेल्या लोकांचे अगदी तळागाळातील सामाजिक स्थरात एकंदर लोकसंख्येपैकी ५० टक्के लोक आहेत. या आकड्यावरून परंपरागत समाजातील विषमता लक्षात येईल. पराकोटीचे औद्योगिकीकरण झालेल्या समाजात ही तफावत १ ते ५ या प्रमाणात असते. परंपरागत समाजात हे प्रमाण एक ते वीस या प्रमाणात असते. अमेरिकेतील उत्पन्नाचे वितरण आणि पश्चिम युरोपमधील **लोकशाही समाजवादी देशाचे** वितरण यांचे प्रमाण सारखेच आहे. याउलट भूतपूर्व "समाजवादी" सोव्हिएट राष्ट्रसंघ जो होता, आधुनिकीकरण लक्षात घेता, त्याच विकासाच्या पायरीवर उभ्या असलेल्या तथाकथित 'समाजवादी' देशातही पूर्वीचीच आर्थिक विषमता विद्यमान आहे. याबाबतीत ही अप्रगत राष्ट्रे आणि भूतपूर्व सोव्हिएट युनियन यात जरूर साम्य आहे.

गुंतागुंतीच्या सामाजिक बदल ही बाजू अनुस्यूत असलेली आणखीही एक प्रक्रिया आहे. या प्रक्रियेला काही वेळा सामाजिक जागृती या नावाने संबोधण्यात येते. या प्रक्रियेत व्यक्तीच्या सामाजिक बांधिलकीचा केंद्रबिंदूच बदलतो. इत:पर व्यक्तीची बांधिलकी आपल्या सामाजिक

गटाला, जाती-जमातीला राहत नाही. तिचा केंद्रबिंदू सर्व समाजच बनतो. आधुनिक समाजात बहुसंख्य लोक आपली परंपरागत वसतीस्थाने सोडून शहरात स्थलांतर करतात. या स्थलांतरा पाठोपाठच सामाजिक जागृती येते. परस्पराशी संपर्क साधण्याच्या साधनात प्रचंड प्रमाणात वाढ झालेली असल्याकारणाने हितसंबंधाचा विचार मग राष्ट्र व राष्ट्रापलिकडे असलेल्या फार मोठ्या जगाच्या अनुषंगाने होतो. लोकांच्या जाणिवा व भान उंचावते. एवंच 'सामाजिक जागृती' या पाठोपाठ येणे क्रमप्राप्तच आधुनिकीकरण होत असलेल्या समाजात परदेशातून येणाऱ्या पत्रापेक्षाही स्थानिक पातळीवरच्या पत्रांचे प्रमाण दिवसेंदिवस लक्षणीयपणे वाढते. राष्ट्रीय उत्पन्नात आंतरराष्ट्रीय व्यापार राष्ट्रांतर्गत व्यापार हा दिवसेंदिवस अधिक महत्त्वाची भूमिका वठवितो. सर्वच राष्ट्रांत या प्रवृत्ती सारख्याच प्रमाणात प्रकट होतात असे नाही. पण या प्रवृत्तीतून राष्ट्रीय पातळीवरून वेगवेगळ्या प्रकारची सामाजिक कौशल्ये आणि साधन सामुग्री यांनी कार्यप्रवण कसे करण्यात आले आहे, याचे प्रतिबिंब पडलेले पहावयास सापडते. संस्कृती राजकीय निष्ठा, आर्थिक हितसंबंध आणि सामाजिक परावलंबित्व इत्यादी घटक, जोडीला राष्ट्रीय आणि जागतिक या दोन्ही पातळ्यावर कमकुवत होत जाणारे अनुबंध, या सर्वांच्या द्वारा ते प्रतिबिंबित होतात. राष्ट्रवाद आणि आर्थिक एकवाक्यता यांना प्रोत्साहन देऊन राष्ट्रीय पातळीवर जाणीव तयार करण्यास हातभार लावणे हे त्या 'सामाजिक जागृतींचे' राजकीय अंग आहे. या सर्व प्रक्रियेत राष्ट्रीय समूहाची आपल्या सर्व नागरिकांवरची पकड मजबूत होते, ही देखील त्या राजकीय अंगाची लक्षणीय अशी बाजू.

**मानसशास्त्रीय**

आधुनिकीकरणाची मानसशास्त्रीय बाजू ही मुलभूत महत्त्वाची आहे. प्रत्येक व्यक्तीची जी जाण आहे, त्यावरच सरतेशेवटी सर्व अवलंबून असते. कोणत्याही विश्लेषणात टाळता येत नाही इतक्या महत्त्वाचा तो मुद्दा आहे. प्रत्येक व्यक्ती आपल्या सभोवतालच्या वातावरणाशी ज्या प्रकारे जमवून घेते ते त्या व्यक्तीच्या बालपणी तिच्या घरात जे वातावरण असते त्यावरच अवलंबून असते. ते वातावरणच तिचा दृष्टिकोन घडविते. तिच्या आयुष्यात नंतर येणाऱ्याही गोष्टींचाही प्रभाव पडतो. परंतु बालपणी अत्यंत ठामपणे प्रस्थापित झालेल्या आकृतिबंधावर परिणाम करण्या इतक्या त्या गोष्टी प्रभावी असाव्या लागतात. स्थिर अशा परंपरागत समाजात प्रत्येक बालकाला आपल्या वडीलधाऱ्या मंडळींचा आदर्श आपल्या नजरेसमोर ठेवता येतो. या वडीलधाऱ्या व्यक्तींची वागणूक एका ठराविक आकृतिबंधानुसार असते. या आकृतिबंधानुसार त्यांच्याबद्दल नेमके अंदाज बांधता येतील या प्रकारचे ठाम असे आकृतिबंध असतात. एखाद्या स्थानिक समुहात, मुलांना त्यांच्या आयुष्यात नंतर येणाऱ्या अनेक प्रश्नाबद्दल शिक्षण मिळते, त्या प्रश्नाना सामोरे कसे जावे, ते कसे हाताळावेत याबद्दल त्या समाजाने मंजूर केलेले मार्ग मुलाना माहीत होतात. ती मुले जेव्हा वयात येतात, तेव्हा बहुतेक व्यक्तींना स्थानिक पातळीवरच्या जुन्या व मान्यवर रितीरिवाजांना अनुसरून जीवनात सामोरे जावे लागणाऱ्या



अनुक्रमणिका

प्रश्नांना तोंड देता येते. या परिस्थितीत नवीन पद्धतीने विचार करणे आणि नाविन्यपूर्ण वागणूक यांची कक्षा ही देखील फारच अरुंद असते.

परंपरागत समाजाच्या त्यामानाने साचेबंद अशा सामाजिक संरचनेमुळे व्यक्तीवादावर, व्यक्तीच्या अहंपणावर फारच मर्यादा पडतात. लोकसंख्येतील बहुतेक लोक शेतीव्यवसायात असतात. हे शेतकरी आपल्या व्यवसायात बदल होईल अशी अपेक्षाच कधीही करीत नाहीत. या समाजात बडे जमीनदार योद्धे, व्यापारी, धर्मगुरू आणि राजे या सर्वांचा त्यामानाने अगदी छोटा असा सामाजिक स्तर असतो. ते सुद्धा आपल्या सामाजिक स्तरावरच आपण कायम राहावे अशी प्रवृत्ती प्रकट करतात. समाजात पुढे जावे या इच्छेने प्रेरित होऊन मिळणारे परिपूर्तीचे समाधान आणि नव्या हक्कांची कमाई ही म्हणूनच या परंपरागत समाजात अगदी मर्यादीत असते. परंपरागत समाजात बहुतेकांचे जीवन त्यामानाने अगदी स्थिर व कोणताही बदल न होणारे असते. हे अशा प्रकारचे जीवन एका बाबतीत त्याचे संरक्षण करते. बाळपणात अनुभवावयास न मिळालेली परिस्थिती आणि लोक या दोहोंशी जमवून घेण्याच्या गरजेपासून त्यांना संरक्षण मिळते. या समाजातील फारच थोड्याना आपल्या गावाच्या चतु:सिमा पलीकडे असलेला, अथवा गावाच्या वेशीवरच्या डोंगर व नदी पलीकडे असलेल्या मोठ्या विस्तीर्ण अशा जगाची कल्पना असते. अर्थातच परंपरागत जीवनाला या कायम आहे त्याच स्थितीत राहावे या त्याच्या प्रकृतीवद्दल अतिशयोक्त कल्पना करता कामा नये. एखादी व्यक्ती आपल्या जीवनचक्रातून जाते. तेव्हा तिच्या इतरांच्या बरोबर असलेल्या संबंधाच्या आकृतिबंधात सातत्याने बदल होतो. सर्वच युगात व्यक्ती एका समतोल ताणांच्या स्थितीतच वावरत असते. जाणिवा आणि सुप्तमन एका बाजूला दुसरीकडे ती व्यक्ती व इतर यात चाललेली रस्सीखेच या दोन प्रकारचे ताण व्यक्तीच्या जीवनचक्रांत नेहमीच हजर असतात. हे सारे जरी खरे असले तरी एका तौलनिक अर्थाने परंपरागत जग हे सामाजिकदृष्ट्या स्थिर व ज्यात बदल होत नाही असे जग होते. त्या जगात एका पिढीपासून तो येणाऱ्या पिढीपर्यंत वागणूकीचे आकृतिबंध सर्व परिस्थिती मग तो काळ युद्धाचा असो वा स्थलांतराचा असो सातत्याने तेच राहत असत.

समाजाचे आधुनिकीकरण होते, तसतसा मानवी स्वभाव आणि त्यांच्या परस्परसंबंध यांच्या मुलभूत प्रश्नात बदल होत नाही. परंतु या बदललेल्या परिस्थितीत त्यांची काही प्रमाणात सोडवणूक होते किंवा त्याना हाताळण्यात येते. बदलत्या परिस्थितीत एक महत्त्वाचा फरक असतो. परंपरागत समाजात असलेली शिलावस्था वा स्थितीस्थापकत्व आधुनिकीकरणानंतरच्या परिस्थितीत नसते. आपले पालक जे आदर्श नजरेसमोर ठेवून कालक्रमणा करतात ते आदर्श त्यांची मुले वयात येतात तोवर कालबाह्य ठरलेले असतात. वागणूकीचे आकृतिबंधही सातत्याने बदलत जातात. बदललेल्या सामाजिक परिस्थितीचा तो परिणाम. तोवर परिचित नसलेल्या जीवनमार्गाचा तो प्रभाव. या सामाजिक बदलात अनुस्यूत असलेल्या समाज जीवनाचाही वयात आलेल्या व्यक्तींच्या परस्परसंबंधावर परिणाम होतो. लोंढ्याच्या लोंढे स्वरूपात शेतकरी ज्या

परिस्थितीत शहरात स्थलांतर करतात, कारागीर व्यवस्थापक होतात आणि तोवर खास हक्क असणाऱ्या वर्गांना पूर्वी ज्यांना काहीही हक्क नव्हते अशा व्यक्तींबरोबर अनेक प्रकारच्या नोकऱ्यांसाठी आणि उद्योगधंद्यांच्या क्षेत्रात, स्पर्धा करणे भाग पडते. दुसऱ्याशी जमवून घेणे, उपक्रमशीलता आणि दुसऱ्याबद्दल सहानुभूती व आपलेपणा हे गुण असले; तरच यशस्वी होता येते याची जाण येते. आपल्या माता-पित्यांपेक्षा आपल्याला समवयस्क अशा म्होरक्यांचे अनुकरण तरुण करतात. सहीसही एकवाक्यतेपक्षाही व्यक्तीवादाला जास्त मान आणि त्याचे सामाजिक मूल्य मोठे मानले जाते. एकंदर लोकसंख्येतील फार मोठ्या भागाला समाजातील वरच्या स्थानावर सरकण्याकरिता अनेक प्रकारच्या संधी उपलब्ध झालेल्या असतात. परंपरागत समाजात या सामाजिक गटानी आपला परंपरागत व्यवसाय व वसतिस्थान बदलण्याचा विचार कधीही मनात आणला नसता. पण आधुनिकीकरणामुळे बदललेल्या परिस्थितीत त्याना ते करणे भाग पडते आणि ते करतातही. वेगवेगळ्या परिस्थितीत कालौघात जमा झालेले अनेक प्रकारचे रितीरिवाज आणि समजूती यांच्यातून व्यक्तीची मुक्तता होते. हे सर्व रितीरिवाज आणि समजूती परंपरागत समाजात व्यक्तीवादाची गळचेपी करीत. भविष्यकाळात केव्हा तरी ज्ञानाची वाढ स्थिरावून ज्ञान एकसारखे वर चढण्याऐवजी ज्ञानाचे पठार तयार होईलही. असे झाले तर कदाचित नवी स्थिरता प्राप्त होईल. परंतु विद्यमानकाळी तरी ती परिस्थिती दृष्टिपथात नाही. आधुनिक समाजात विद्यमानकाळी तरी अधिक सखोल आणि जलद असे सामाजिक बदल होत आहेत हे नक्की.

स्थानिक लोकसमूह, त्यात अंतर्भूत असलेल्या व्यक्ती आणि समाजातील इतर सर्व कुटुंबे ज्या लोक समूहांचे सभासद असतात असे कार्यकारी गट यांच्याबरोबरच्या संबंधात परंपरागत समाजातील व्यक्ती तरी सर्वसामान्यपणे गुंतलेल्या असतात. संकुचित दृष्टिकोनाच्या अनुषंगाने हे गट इतरांकडे पाहतात. हा संकुचित दृष्टिकोन अत्यंत कुबट परिस्थितीत संगोपीत झालेला असतो. त्या गटांची वैयक्तिक सुरक्षितता त्या दृष्टिकोनातच गुंतलेली असते. आणखी एक मुद्दा आहे. एकाद्या दृष्टिकोनाचे मूल्यमापन करण्याच्या अथवा आपल्याला परिचित नसलेल्या पद्धतीने गोष्टी करता येतात त्यांचे कौतुक करण्याची फारच बेताची पात्रता गटांच्या अंगी होती. तसेच परंपरागत समाजातील व्यक्तींना समाजातले आपले स्थान कधी काळी बदलेल अशी फारशी अपेक्षा नसते. त्यांची अशी श्रद्धा असते की पूर्वसुरींकडून परंपरेने चालत आलेली समाजव्यवस्था ही परमेश्वराने निर्माण केलेली आहे आणि ती कदापि बदलणार नाही. विद्यमान काळी हे स्पष्ट आहे की, प्रत्येक युगात खूप प्रवास केलेल्या आणि वरच्या पातळीवर विचार करणाऱ्या व्यक्ती असतात. त्याचबरोबर परंपरागत समाजातही काही प्रमाणात उपक्रम-शीलता असते. सामाजिक बदलही होत असत. अनेक प्रकारच्या क्रांत्या आणि स्थलांतरेही होत. परंपरागत समाजात असंतोष होता याचा तो पुरावा आहे. तथापि, या सर्व प्रक्रियेकडे तुलनात्मक दृष्टिकोनातून पाहिले असता असा मुद्दा स्पष्ट होतो की, परंपरागत समाजात स्थिर, स्थितीप्रिय,



अनुक्रमणिका

बंदिस्त व निद्रिस्त होते.

**आधुनिकीकरणाची तगमग**

परंपरागत समाज आणि आधुनिक समाज या दोन समाज़ातील प्रमुख फरक दर्शविणारा हा काहीसा दृकप्रत्ययवादी वा धावता आढावा. यात गुलाबी आणि विस्तारवादी छटावर आणि घटनावर मुद्दामच जोर देण्यात आला. म्हणूनच ती वाचून आधुनिकीकरण या प्रक्रियेमुळे मानव जातीचा फार मोठा फायदा झाला आहे अशी कोणाचीही कल्पना होईल. तशी ती झाली तर एका विशिष्ट मर्यादेपर्यंत ते योग्यच आहे. आजवर असे नेहमीच सांगण्यात आले की, प्रगतीचे युग विद्यमानकाळी अवतरले आहे. या युगात मानवाच्या कल्याणासाठी नवे ज्ञान सर्वत्र उपलब्ध झाले. त्याचा वापर कोणीही करावा. अनेक प्रकारच्या युरोपिय नागरिकांची स्वप्ने रंगविता येतील. सर्व प्रकारच्या मानवी दु:खावर पाश्चिमात्य समाजव्यवस्थेला मात करता येईल. अशीही अपेक्षा कोणी युरोपिय नागरिक करतील. युटोपिय (रामराज्य) हेच आपले ध्येय आहे असे न समजणारे समाज व्यवस्थेचा गंभीरपणे अभ्यास करणारे अभ्यासकही नजीकच्या काळात या जगातून दारिद्र्य आणि युद्ध या जगातून हद्‌पार करता येईल का? या प्रश्नांची व त्या शक्यतेची चर्चा करतात. तथापि हे सारे जरी खरे असले तरी आधुनिकतेबरोबर अनेक हानीकारक गोष्टी समाजात आल्या आहेत हे सर्वश्रुतच आहे. या अनिष्ट गोष्टींमुळे मानव जातीला आजवर ज्ञात नव्हती, अशी महान संकटे कोसळतील हे सर्वास माहीत आहे. विद्यमानकाळी मानवाने सर्वच मानवी आयुष्याचा नायनाट करतील अशी प्रचंड ताकदीची हत्यारे व शस्त्रे तयार केली आहेत. म्हणूनच विद्यमानकाळी हे अटळपणे स्पष्ट झाले आहे की आधुनिकीकरणाने निर्माण केलेले प्रश्न हे त्या प्रक्रियेने प्राप्त करून दिलेल्या संधी इतकेच प्रचंड आहेत.

या सर्व प्रश्नांत एक अत्यंत मुलभूत व महत्त्वाचा प्रश्न हा आहे की एका नव्या जीवन मार्गाची उभारणी कशी करता येईल? या प्रश्नांत जुन्याचा विनाश हा अटळपणे अनुस्यूत आहे. आधुनिकीकरण म्हणजे नव्या तत्त्वांच्या आधारे समाजाचे एकजिनसीकरण किंवा नव्याने होणारे एकजिनसीकरण असे जर कोणास वाटत असेल तर त्याने दुसरीही एक बाजू विचारात घेतली पाहिजे. त्या एकजिनसीकरणात परंपरागत समाजांचे विघटन अंतर्भूत असणारच. एका त्यामानाने चांगल्या प्रकारे व सयुक्तिकपणे एकजिनसीकरण झालेल्या समाजात सामाजिक संस्था कार्यक्षमतेने काम करतात. साध्ये व साधने याबद्दल समाजात एकवाक्यता असते. हिंसा व अव्यवस्था यांचे प्रमाण फारच खालच्या पातळीवर असते. समाजात जेव्हा लक्षणीय व झपाट्याने बदल आणण्यात येतात तेव्हा त्या समाजातले कोणतेही दोन घटक त्या बदलांबरोबर एकाच प्रकारे व एकाच वेगाने जमवून घेत नाहीत. या कारणामुळे समाजात एकंदरच अव्यवस्था इतक्या पराकोटीला पोहोचते की, समाजात हिंसेचा सर्वत्र उद्रेक होतो. लोक मोठ्या संख्येने देशांतर करतात. परिणामी सरकारला नेहमीचा व सर्वसाधारण कारभार अशक्य होतो. यातील सर्व गोष्टी आधुनिकीकरणाच्या मार्गावर मार्गस्थ झालेल्या समाजात या



अनुक्रमणिका

स्थित्यंतराच्या काळात वारंवार व अनेक वेळा घडतात.

एवंच आधुनिकीकरण ही एकाच वेळी नवनिर्मिती करणारी आणि विनाशी आहे असेच कोणासही वाटेल. ही प्रक्रिया एकाच वेळी नव्या संधी व उमेद प्राप्त करून देते. परंतु त्यासाठी समाज विघटन आणि हालअपेष्टा यांची जबरदस्त किंमत मागते. अन्य कोणत्याही युगापेक्षा आधुनिक जग हे खुनांचे, यादवी, धार्मिक आणि आंतरराष्ट्रीय अशा युद्धांचे, अनेक प्रकारच्या प्रचंड मानवी संहाराचे, नरकपुरीची स्मृती प्रत्यक्षात आणणाऱ्या श्रमछावण्याचे (Concentration camps) युग ठरले आहे. नजीकची व तावडतोबीची ध्येये साध्य करण्यासाठी मानवी जीवन इतक्या सहजपणे खर्ची टाकण्याची कृत्ये यापूर्वी कधीही घडलेली नाहीत. ध्येय प्राप्तीसाठी संघर्ष करणाऱ्या समाजांच्या दृष्टीने; ऐक्य व स्वातंत्र्य प्राप्त ही दोन उद्दिष्टे साध्य करण्यासाठी 'राष्ट्रवाद' ही आधुनिकीकरणात अनुस्यूत असलेली शक्ती समजली जाते. परंतु या शक्तीचे रूपांतर राष्ट्रवाद एकदा प्रस्थापित झाल्यानंतर, एका प्रतिगामी व जुलमी शक्तीत होते. राष्ट्रीय ध्येयापलीकडे जाऊन, आपल्यां लोकांच्या मानवी गरजाना महत्त्व देण्याची दूरदृष्टी फारच थोड्या राष्ट्रीय नेत्याना होती. अनेक वेळा आधुनिकीकरण साध्य करण्याची साधने हीच स्वत:च साध्य बनली. या ध्येय प्राप्तीसाठी इतक्या कडवेपणाने व निघृणपणे लढा करण्यात आला की, त्या साध्याचाच वळी सरतेशेवटी जातो की काय अशी परिस्थिती निर्माण झाली.

कालौघात मान्यता पावलेल्या जुन्या ज्ञान-पद्धतीना सुरूंग लावण्यात आला. नजिकची व तावडतोबीची ध्येये, गरजा या व्यतिरिक्त ज्याना दुसऱ्या कशाचाही मार्गदर्शनाचा आधार नाही अशा व्यक्ती या आधुनिक जगात असंख्य आहेत. चिरंजीव सत्ये, धार्मिक स्वरूपी ठोकळेबाज विचारसरणी (Dogma) ईश्वराबद्दलच्या संकल्पनेत अंतर्भूत असतात. त्याच्याबद्दल कसलाही विचार न करता त्यांचा त्याग करण्यात आला. विद्यमानकाळी ज्यास जुनाट म्हणून संबोधण्यात येते, त्या प्रकारे ईश्वराबद्दलच्या संकल्पनेचा आणि त्या साऱ्यांचा आविष्कार वा प्रकटीकरण होते. हे त्यांचा त्याग करण्यामागचे कारण म्हणून सांगण्यात येते. मग कालांतराने या टाकून दिलेल्या सत्यांचा नव्याने शोध लागतो, आणि आधुनिक विज्ञानाचा तो अगदी नव्यात नवा साक्षात्कार असे सांगण्यात येते. हे अनेक वेळा घडले आहे. मानवी प्रकृती ही दुहेरी आहे. एकाच वेळी ती बुद्धीवादी असते आणि त्याचवेळी ती नसतेही. हा विरोधाभास पूर्वीही ज्ञात होता. परंतु कित्येक पिढ्यांचा काळ गेल्यानंतर आधुनिक मानसशास्त्रात, मानवी प्रकृती दुहेरी आहे एकाच वेळी ती बुद्धीवादी असते आणि त्याचवेळी ती नसतेही. हा जाणवलेला विरोधाभास पूर्वीही ज्ञात होता. परंतु कित्येक पिढ्यांचा काळ गेल्यानंतर आधुनिक मानसशास्त्रात मानवी प्रकृतीचे ते दुहेरीपण आहे असे पुन्हा एकदा सांगण्यात आले. मध्यंतरीच्या काळात ज्ञानी आणि शिकलेल्या व्यक्तीनी बुद्धीवादाच्या पंथाचा जोरदार पुरस्कार केला होता. केवळ आधुनिक असावे या इच्छेपोटी. विद्यमानकाळी, खरे म्हणजे प्रत्यक्षात जे क्षणभंगूर असते अशा तत्वज्ञानाचा उदोऊदो

करण्यामागे अनेक वेळा कल असतो. त्याजबरोबर परंपरागत सामाजिक संस्थाच्या स्वरूपात अनेक मुलभूत मूल्यांचा आविष्कार होत असल्याने, त्या स्वरूपात त्यांचा अनेक वेळा त्याग करण्यात येतो.

राजकीय एकात्मता आणि केंद्रीकरण ही प्रक्रिया विशेष करून, व्यक्ती आणि सामाजिक संस्था यांच्याबाबतीत विनाशी ठरली आहे. स्थानिक आणि प्रादेशिक सत्तांचा पराभव करण्यात, पाश्चिमात्य जगतात चर्च ही. धर्मसंस्था आपल्या नियंत्रणाखाली आणावी आणि आपल्या शेजारच्या राष्ट्रातील आपल्याला हवाहवासा वाटणारा प्रदेश जिंकण्यात राज्यकर्त्यांना आलेल्या यशांचे गुणगान राष्ट्रीय इतिहास करतात. यातील प्रत्येक कृतीने, राष्ट्रीय एकात्मता आणि राष्ट्राची ताकद वाढण्यास हातभार लागला असेलही. हेच वेगळ्या शब्दात सांगावयाचे झाल्यास आधुनिक समाज घडविण्याची अंतिम ताकद वाढण्यास त्यांची मदत झाली. तथापि या सर्व कृतीत प्रचंड मानवी संहार अंतर्भूत असतोच. त्याजबरोबर अनेक शतकांच्या कालावधीत ज्या सामाजिक संस्था आणि संघटना यशस्वी रितीने काम करीत होत्या त्यांचा विनाशही होतो. अनेक वेळा असे घडते की, तत्कालीन स्थानिक अधिकाऱ्यांनां आणि प्रशासकीय संघटनेत काम करणाऱ्या व्यक्तीना कंठस्नान घातल्यानंतर त्या व्यक्ती जी कामे करीत, तीच कामे करण्यासाठी त्यांच्यापेक्षा कमी कर्तबगार आणि कमी अनुभव असणाऱ्या व्यक्तीकडे त्या समाजाना सर्वसामान्यपणे वळावे लागते.

एवंच आधुनिकीकरणाच्या प्रक्रियेत अंगभूत असा अंर्तविरोध आहे. एकीकडे राजकीयदृष्ट्या संघटीत समाजांच्या पातळीवर सत्तेचे केंद्रीकरण करण्याकडे या प्रक्रियेची प्रवृत्ती असते. परंतु त्याचवेळी त्या समाजांपेक्षाही मोठ्या चौकटीत मानवी हालचाली आणि त्यांची कार्ये यांच्यातील बहुतेक सर्व अंगात एकात्मता निर्माण करण्याचीही प्रवृत्ती असते. काही वेळा ही मोठी चौकट सर्व मानव जातच व्यापते. मानवी इतिहासात प्रथमच सार्वत्रिक मान्यता आणि सत्यता म्हणजे नेमके काय हे ठरविणाऱ्या ज्ञान पद्धतीचा विकास होत आहे. जगातील सर्वच समाज आपल्या चतु:सिमापलीकडे फार दूरवर आपल्या स्वत:च्या सुरक्षितेसाठी दिवसें दिवस अधिक प्रमाणात अवलंबून असतात. उत्पादन पद्धतीना लागणारा कच्चा माल, बाजारपेठा आणि कौशल्ये या सर्व गोष्टी कोणत्याही एका देशाला पुरविणे शक्य नाही अशी विद्यमानकाळी परिस्थिती आहे. राष्ट्रीय सीमाना मागे टाकून सामाजिक संबंध आणि सांस्कृतिक संस्था या एकमेकात मिसळत आहेत आणि जी मूल्ये राष्ट्रीय सीमा ओळखत नाहीत, अशी मूल्ये आत्मसात करण्याच्या रोखाने व्यक्ती विकसित होत आहेत. हे सारे एका बाजूला घडते आहे. परंतु त्याच वेळी त्याच्या अगदी विरुद्ध टोकाच्याही गोष्टी घडत आहेत. मानवी हालचालीची सर्व अंगे आणि बाजू ही सारी एका संघटनात्मक नियंत्रणाच्या कक्षेतच झाली पाहिजेत. हे संघटन, राजकीयदृष्ट्या संघटीत झालेले समाज असलेली राष्ट्रे यांच्या अधिपत्याखाली दिवसेंदिवस आले पाहिजे. एवंच स्वातंत्र आणि परावलंबित्व यांतला हा वाढता विरोधाभास, हा आधुनिकीकरणाच्या विद्यमान

अवस्थेत तरी, वर्तमानकालीन आंतरराष्ट्रीय पेचप्रसंगाच्या केंद्रस्थानी आहे.

काही वेळा असे वाटते की, आधुनिक युग हे खास करून आंतरराष्ट्रीयवादाला पोषक आहे. परंतु ती वस्तुस्थिती नाही. प्रत्यक्षात परिस्थिती यापेक्षा फारच वेगळी आहे. परंपरागत समाजात वेगवेगळ्या वंशाचे व भिन्न प्रकारचे लोक अनेक वेळा एकाच धर्माचे अनुयायी असत. एका विस्तृत व सैल अशा बांधणीत त्यांचे आर्थिक अनुबंध आणि राजकीय निष्ठाही प्रवाही असत. काही वेळा जी भाषा काहीशी सार्वत्रिक असे; त्याच भाषेचा ते परंपरागत समाज वापरही करीत. विद्यमानकाळी सर्वत्र राष्ट्रातील अंतर्गत आणि आंतरराष्ट्रीय परिस्थिती फारच वेगळी आहे. आधुनिकीकरणाच्या गरजा कोणालाही कसल्याही परिस्थितीत काहीही दयामाया दाखविण्यास तयार नसतात. या आधुनिकीकरणाच्या गरजांचे राष्ट्रीय पातळीवर कमालीचे केंद्रीकरण झाले आहे. हे केंद्रीकरण इतके कमालीचे आहे की, राष्ट्रीय सुरक्षिततेसाठी अत्यंत आवश्यक असलेल्या आंतरराष्ट्रीय संघटना एकाच अटी खाली स्थापन केल्या जातात. या आंतरराष्ट्रीय संघटनेने त्या संघटनेत सामील झालेल्या. राष्ट्रांच्या अखत्यारीत असलेल्या, प्रामुख्याने व मुलत: स्थानिक समजल्या जाणाऱ्या बाबतीत हस्तक्षेप करता कामा नये. एकाच वेळी असा हस्तक्षेप करण्याची या आंतरराष्ट्रीय संघटनेला परवानगी आहे. जागतिक शांततेला जेव्हा एवढा प्रचंड धोका निर्माण होतो तेव्हा या जगातील महान सत्ता, आपल्या मतभेदांबाबत तडजोड करण्यास आणि जागतिक युद्ध टाळण्यासाठी योग्य ती पाऊले उचलण्यास तयार होतात. आंतरराष्ट्रीय संघटनांना त्याच वेळी स्थानिक बाबतीत हस्तक्षेप करण्याची परवानगी मिळते.

सामाजिक अवस्थेत ही आधुनिक युगाची प्रकृती आहे. या अस्वस्थेतेच मूळ एका गोष्टीतच आहे. एका छोट्या व त्यामानाने भरपूर सवलती असलेल्या आहेरे गटाने संगोपीत केलेल्या परंपराना आणि मूल्याना निर्माण झालेला धोका आणि त्याना प्राप्त झालेली आव्हाने. ही आव्हाने जी प्राप्त मूल्ये कालौघात उत्क्रांत झालेली असतात त्यांना देण्यात आलेले असत. विकसित होणारा आधुनिक एकजिनसी समाज त्या परंपरागत मूल्यांना आव्हान देतो या समस्येमुळे गंभीरपणे या समाजांचा अभ्यास करणाऱ्या अभ्यासकापुढे अनेक प्रश्न उपस्थित झाले. प्रत्येक व्यक्तीला जर शिक्षण द्यावयाचे असेल तर जे उच्च प्रतीचे शिक्षण समजले जाते ते तग धरून राहील का? समाजातील प्रत्येक व्यक्तीने आपला प्रभाव जाणवेल अशा पद्धतीने व्यवहार केला तर लोकशाही कार्यवाहीत येईल का? परंपरागत समाजात विशेष हक्क असलेल्या व त्या समाजाचे नेतृत्व करणाऱ्या गटात काही प्रमाणात वर उल्लेखिलेल्या प्रश्नांची भीती होती याबद्दल काहीही संशय नाही. परंतु परंपरागत समाजांची गोष्ट वेगळी. त्या काळातील आहेरे वर्गांना आपल्या सत्तेत वाटेकरी नको होता, म्हणूनच तशा प्रकारच्या आवश्यतेबद्दल त्यांची नाखूषी असणे हेही स्वाभाविकच. हे सारे जरी सत्य असले तरी एकजिनसी समाजात, अथवा जनता समाजात मानवी जीवनाची तोवरची प्रत कायम कशी राहील हा मुलभूत प्रश्न राहतोच. त्याची सोडवणूक आजवर झालेली नाही. एकमेकाना छेद देणाऱ्या अगणित

हितसंबंधाचे प्रतिनिधित्व करणाऱ्या व्यक्तीना राष्ट्रीय अंदाजपत्रकात मान्यता द्यावी लागते. कला आणि वाङ्मय या दोन्ही क्षेत्रातील निर्मिती यांची 'आम जनताच' त्यांची आश्रयदाती आहे हे ध्यानात ठेवून, त्या दोन क्षेत्रांबद्दल काय तरतूद करावयाची ती या संकल्पित अंदाजपत्रकात करावयाची असते. तसे केले नाही तर त्या क्षेत्रांचा आर्थिक आधारच नाहीसा होणार. असे अनेक प्रश्न आहेत. उदाहरणादाखल हे दोन घेतले. एवंच आधुनिक जीवनात आजवरची मानवी जीवनाची प्रत कशी टिकून राहील हा एक जटील प्रश्न आहे.

आधुनिकीकरणाबरोबर येणारी इतर सामाजिक परिस्थितीही तितकीच गंभीर स्वरूपाची असते. आधुनिक औषधे आणि पूर्वीपेक्षा त्यामानाने अधिक आरोग्यवादी वातावरण निर्माण झाले असल्याकारणाने, अनेक अप्रगत देशात दर हजारी मृत्यूंचे प्रमाण कमी झाले असले तरी मुले जन्माला येण्याचे प्रमाण पूर्वी इतकेच नाही तर ते जास्त झाले आहे. आधुनिक वैद्यकीय सुविधामुळे प्रसुतीच्या काळात मृत्यूमुखी पडणाऱ्या स्त्रिया व बालके यांच्या संख्येत घट होणे हे त्यामागचे कारण आहे. या सर्वाचा परिणाम लोकसंख्येच्या वाढीत होणे क्रमप्राप्तच. सरते-शेवटी ही लोकसंख्या इतकी वाढते की, अशा अप्रगत देशात निर्माण झालेले अन्नधान्य एक वेळ पुरेसे पडेल. पण उत्पादीत झालेल्या इतर वस्तू आम जनतेच्या खिशाला परवडणाऱ्या नाहीत. या अशा प्रकारच्या देशात शेती आणि इतर उद्योग या दोन्ही व्यवसायाना स्थानिक प्रयत्नांनी आणि परदेशी मदतीने जरी प्रोत्साहन दिले तरी अखेरी वाढत्या लोकसंख्येमुळे दरडोई उत्पादन हे खालच्या पातळीवरच राहणार. वेळप्रसंगी ते पूर्वीपेक्षा कमीही होईल. या अशा देशात ते लोक संतती नियमनाची साधने धार्मिक स्वरूपाच्या आज्ञामुळे वापरावयास नाखूष असतात. परंपरागत मूल्ये आणि सामाजिक वागणूकीचा आकृतिबंध यांचा तो परिणाम. मूल्ये आणि सामाजिक आकृतिबंध या दोघातही इतक्या संथ वेगाने बदल होत असतो की, समाजात उपलब्ध असलेली मदत ही सदैव कमीच पडते. भारताचेच उदाहरण घेऊया. भारतात लोकसंख्येचा प्रश्नाचे स्वरूप फारच गंभीर आहे. एका बाजूने धार्मिक समजुतीमुळे संतती नियमनाच्या साधनांचा वापर होत नाही. दुसरीकडे जगातले इतर सर्व लोक ज्यास 'अन्न' समजतात, त्यास भारतीय 'अन्न' मानत नाहीत. मग स्वातंत्र्यवीर सावरकर – एक कट्टर हिंदुत्ववादी महान देशभक्त – हे गाय हा उपयुक्त पशु आहे असे म्हणाले असले तरी भारतीय 'गाय' पूज्यच मानतात. परंपरागत मूल्ये आणि सामाजिक आकृतिबंध यात बदल न झाल्याचा हा पुरावा. या सर्वाचा परिणाम भारतात गायींच्या संख्येत त्या देशाला न परवडणारी वाढ झालेली आहे. भारतातील गरीब शेतकऱ्याला या 'गाई' भाकड झाल्यानंतर त्यांचे पालनपोषण करता येत नाही. त्याना तो चक्क बाहेर सोडून देतो. अशी रानोमाळ भटकणारी, शेतांची नासाडी करणारी शहरातील वाहतूकीला अडथळा आणून, इंधन खाणारी लोकांचा वेळ खाणारी असंख्य जनावरे असतानाही बहुसंख्य भारतीय त्यांना 'अन्न' मानीत नाहीत. फळबागा, माड इत्यादीचा प्रचंड नुकसानी करणाऱ्या आणि त्यातील फळांचे भक्षण करणाऱ्या वानरांना

सामान्यपणे न मारण्याकडेच प्रवृत्ती असते. याचे कारण वानर हे प्रभू रामचंद्राचे सैनिक. भारतासारख्या इतर अप्रगत राष्ट्रातून मानवी गरजांपेक्षाही पूर्वसुरींनी प्रस्थापित केलेले यम-नियम हे अधिक महत्त्वाचे समजले जातात. त्याचा परिणाम लाखो लोकांच्या हालअपेष्टात होतो.

हा लोकसंख्येचा प्रश्न आणखी एका कारणामुळे आणि प्राप्त परिस्थितीमुळे अधिकच जटील होतो. आर्थिक प्रगतीच्या आणि वाढीच्या अगदी आरंभीच्या टप्प्यात लोकसंख्येतील बहुसंख्य भागांच्या गरजा आणि त्यांना लागणाऱ्या वस्तूंचे प्रमाण हे स्थिर ठेवावे लागते. तसे केले तरच भविष्यकाळात गुंतवणूकीसाठी आवश्यक असणाऱ्या भांडवलाचा पुरवठा होणार. परंतु लोकसंख्या ही अगोदरच एकंदर उत्पादन वाढीच्या वेगापेक्षाही अधिक वेगाने वाढत असेल तर हा भांडवल पुरवठा होणे कसे शक्य आहे? भारतापेक्षाही अधिक गंभीर परिस्थितीत अनेक राष्ट्रे आहेत. या प्रश्नाचे त्या देशात तरी अजून उत्तर मिळालेले नाही. त्यामानाने अधिक प्रगत देशात, उदा. एकोणिसाव्या शतकाच्या मध्यावरचे इंग्लंड आणि विसाव्या शतकातील रशिया या दोन्ही देशातील याबाबतीतला अनुभव बोलका आहे. औद्योगिकीकरणाला सुरुवात झाल्यानंतर निदान पहिल्या पिढीत तरी मोलमजुरी करणाऱ्या माणसाचे वास्तविक उत्पन्न कमीच झाले. नव्या औद्योगिक उत्पादनाचे फायदे फार मोठ्या व विस्तृत प्रमाणात उपलब्ध होण्यासाठी एका पिढीपेक्षाही जास्त काळ जावा लागला. **त्या मध्यंतरीच्या काळात त्या देशातील सर्वसामान्य माणसाचे जीवनमान खालावले होते ही वस्तुस्थिती नजरेआड होऊ देता नये.** दुसराही एक महत्त्वाचा मुद्दा आहे. या दोन्ही देशानी आपल्या आर्थिक वाढीच्या दिशेने वाटचाल करावयास सुरुवात केली तेव्हा ते त्यामानाने विद्यमानकाळातील अप्रगत देशापेक्षा अधिक वरच्या पातळीवर होते आणि म्हणूनच आर्थिक विकास करून घेण्याच्या दृष्टीने अधिक अनुकूल परिस्थितीत होते.

व्यक्तीत्वाच्या, अस्मितेच्या स्थैर्यावर आणि तिच्या नेमकेपणावर आधुनिकीकरणाचे होणारे परिणाम गंभीर असतात. परंपरागत समाजात सर्वसामान्य व्यक्तिमत्त्वाचे स्वरूप त्यामानाने स्थिर असेच असते. त्याला एक विशिष्ट वातावरणात आकार येतो, सांस्कृतिक वारशाचे वादातीत असे विश्वतपद वडीलधाऱ्या व्यक्तींकडे आहे असे मानले जाते. या प्रकारचे जे वातावरण होते, या सांस्कृतिक वारशात अनेक शतके लोटली तरी फारसा बदल होत नाही. जो होतो तोही अतिमंद वेगाने. मुलांचे संगोपन कुटुंबातच होते. कुटुंबाबाहेर त्यांना पाठविले जात नाही. एकंदरीत भावनात्मकदृष्ट्या सुरक्षित वातावरणात मुले वाढविली जातात. परिचित अशा जातीजमातींच्या समूहात व गोतावळ्यात ती वावरत असतात. त्यांच्या प्रत्यक्ष सहवासातच ती मुले लहानाची मोठी होतात. आपल्यापेक्षा वेगळा सांस्कृतिक वारसा असलेल्या समूहापासून आणि लोकां-पासून ती त्यामानाने अलिप्त असतात. सांस्कृतिकदृष्ट्या वेगळ्या व्यक्तींशी त्यांचा संबंध येत नाही. हे अशा प्रकारचे परिचित वातावरण आणि व्यक्ती-व्यक्तीतील संबंधाचा संच या दोन्हीमुळे एक प्रकारचा आत्मविश्वास आणि एका जबरदस्त व्यक्तीत्वाची जडण-घडण होते. परंपरागत



अनुक्रमणिका

समाजातील फारच मोठ्या बहुसंख्येचे व्यक्तित्व व त्याची अस्मिता, ही अशी प्रकारची आत्मविश्वासी व स्थिर असते. एकमेकांबरोबर संघर्ष करणाऱ्या रितीरिवाजांना आणि मूल्यांनी सामोरे जाण्याचा प्रसंग, त्या व्यक्तित्वाना येत नाही म्हणूनच त्या व्यक्तित्वावर ताणही पडत नाही.

कितीही युगे लोटली तरी व्यक्तीला अवतीभोवतीच्या समाजाशी जुळवून घेताना, ज्या मुलभूत अशा मानसिक प्रश्नांना तोंड द्यावे लागते त्यात बदल होणारही नाही. त्याजबरोबर समाजातील एकंदर आक्रमक, मवाळ आणि न्यूराटीक, तसेच सायकोटीक व्यक्तींच्या एकंदर संख्येतही फारसा बदल होणार नाही. आधुनिकीकरणाच्या वाटचालीत, असलेल्या समाजात त्या समाजातील व्यक्तीत्वाच्या अवतीभोवती असलेल्या वातावरणात कितीही प्रचंड बदल झाला, तरीवर उल्लेखिलेल्या परिस्थितीत फारसा फरक पडणार नाही. परंपरागत सांस्कृतिक वारसा, झपाट्याने पत्करला जातो आणि त्यांच्या जागी मुलभूत स्वरूपाची पण अनिश्चितता असलेली मूल्ये आणि यम-नियम येतात. मुलांचे संगोपन ज्या परिस्थितीत होते, त्या ज्या यम-नियमनांच्या साक्षीने ती लहानाची मोठी होतात, त्या सर्वांवर अनेक प्रवृत्तींच्या प्रत्यक्ष परिणाम होतो. शहरीकरीकरणामुळे कुटुंबाच्या संरचनेत बदल होतो. खेडेगांव सोडून लोक शहरात रहावयास जातात. काही वेळा ते परराष्ट्रातही जातात. या सर्वांचा परिणाम स्थानिक जाती-जमातींच्या समूहांचा बिमोड होण्यात होतो. स्थानिक समूह वेळप्रसंगी नाहीसे होण्यातही होतो. परंपरागत समाजात गेली शेकडो वर्षे समाजातील पुरुष व स्त्रिया यांच्या भूमिका कोणत्या, त्यात फरक काय, हे अगदी ठरून गेलेले असते. आधुनिकीकरणाबरोबर यंत्रे येतात. ती यंत्रे तोवर श्रम करण्याची जी पद्धत होती, त्यात जबरदस्त बदल करतात. स्त्री-पुरुष व्यक्तित्वाचे तोवर परंपरागतपणे मान्य असलेले आकृतिबंध त्या कारणाने पार बदलून जातात. स्त्री-पुरुष संबंधात बदल होणे हा त्याचा अपरिहार्य परिणाम.

परंपरागत समाजापेक्षा आधुनिकीकरण आलेल्या समाजातील व्यक्ती ही आपल्या अवती-भोवती असलेल्या परिस्थितींच्या प्रभुत्वाखाली कमी प्रमाणात असते. एवंच ही अशी व्यक्ती त्या प्रमाणात स्वतंत्र असते. परंतु त्याचवेळी आपण कशा करता या पृथ्वीतलावर अस्तित्वात आहोत, याबद्दल तिच्या मनात निश्चितता नसते. फार मोठ्या असंतोषाच्या प्रसंगी ही व्यक्ती उद्दिष्टाने भारलेल्या नेतृत्वाच्या हितासाठी आपले 'स्वातंत्र्य अर्पण' करावयास तयार असते. झपाट्याने सामाजिक बदल होत असलेल्या समाजात व्यक्ती आपली प्रकृतीविषयक वैशिष्टे गमावून बसतात. याचा अर्थ 'स्वातंत्र्य अर्पण' करण्याद्वारे स्पष्ट होतो. प्रकृतीविषयक वैशिष्टे गमाविणे याचा अर्थ तो आहे. आधुनिकीकरणामुळे निर्माण झालेल्या परिस्थितीत समाजात व्यक्तीपासून व्यक्ती अलग होते. परिणामी तो समाज 'अणुवत' बनतो. एखाद्या समूहाशी आपली बांधिलकी आहे, आपण त्या समूहाचे सभासद आहोत या विषयीच्या सर्व भावना त्या समूहातील माणसांच्या मनातून नाहीशा होतात. या अशा प्रकारच्या भावना व्यक्तीच्या मनात



अनुक्रमणिका

नसतील तर व्यक्तीला कृतार्थता समाधानकारकरित्या प्राप्त करून घेता येत नाही. वैयक्तिक पातळीवरची असुरक्षितता आणि अनामिक धास्ती ही आधुनिकीकरणाच्या वाटेवरच्या युगाची व्यवच्छेदक लक्षणे आहेत, असे अनेकांना वाटते. ही असुरक्षितता आणि ही धास्ती यांचे मूळ एकाच गोष्टीत आहे. आधुनिकीकरणाच्या बरोबरीने येणाऱ्या कमालीच्या विलगीकरणाशी त्या मन:स्थितीचा प्रत्यक्ष संबंध जोडता येतो.

परंपरागत मूल्ये आणि यम-नियम यांचे विलगीकरण हे अनेक प्रकारच्या दुखण्यातून दृष्टोपत्तीस येते. ही सारी दुखणी ही आधुनिक समाजाची प्रकृती होऊन बसली आहेत. सर्व प्रकारचे सामाजिक विघटन, उदा. गुन्हेगारी, वेडेपणाची वागणूक, घटस्फोट, आत्महत्या, मानसिक रोग इत्यादी. समाज जसा जसा आधुनिकीकरणाच्या मार्गावर आगेकूच करतो, तसतसे या साऱ्या दुखण्याचे प्रमाण वाढत जाते. हे विधान सिद्ध करणे हे अर्थातच कठीण आहे. परंतु सर्वसामान्यपणे ते खरे असावे असे पाश्चिमात्य जगताला वाटतो. लाखो लोक ग्रामीण भागातून शहरात स्थलांतर करतात. तसे केल्याने आपल्या अगदी नजिकच्या वातावरणात व्यक्ती-व्यक्तींमध्ये जे दृढ संबंध व अनुबंध परंपरागत समाजात असतात ते फार सैल होतात. त्याचा परिणाम ज्या सामाजिक यम-नियमा बरहुकूम वागणूक करावयास हवी आणि सामाजिक मान्यतेची परिणामकारकता, या दोन्ही गोष्टींचा जो आब असतो तो कमी होण्यात होतो. वास्तविक या दोन्ही गोष्टी परंपरागत समाजाची प्रकृती समजली जाते. येथे उल्लेखिलेल्या सर्व प्रकारच्या सामाजिक विघटनाच्या मुळाशी आधुनिकीकरण ही प्रक्रिया असते. सर्वसामान्य शब्दात सांगावयाचे झाल्यास व्यक्तीचे हे असे एकाकी होणे वा पडणे, यास **'दुरावा'** या संकल्पनेने संबोधले जाते.

बिनचेहऱ्याच्या समाजात व्यक्तीचे समग्र जीवन अनेक प्रकारच्या नोकरशाही संघटनाच्या ताबेदारीत असते. व्यक्तीच्या समग्र जीवनात काम, घर, आहार, आरोग्य, परस्परसंपर्क आणि करमणूक इत्यादी अनेक विषयांचा समावेश आहे. समाजातील सर्व नोकरशाही संघटना व्यक्तीना एक संख्या जड शरीरे आणि अमूर्त वस्तू या स्वरूपाची वागणूक देतात. येथे ज्याचा उल्लेख **'दुरावा'** म्हणून केला त्याचा गाभा व त्याचे मूळ या गोष्टीत आहे. सहकारी संस्थातील आपल्या निवास स्थानातून लोक राहतात. पण त्यांना त्यांचे शेजारी परिचयाचे असतातच असे नाही. कारखान्यातून आणि कचेऱ्यातून काम करतात, परंतु त्याठिकाणी त्यांचे सहकारी काही महिन्यांनी बदलतात, अनोळखी माणसानी आणून दिलेल्या किंवा त्यांच्याकडून विकत घेतलेल्या वस्तूतून अन्न शिजवले जाते. उपहारगृहात अपरिचित व्यक्ती आजूबाजूला असताना अन्न सेवन केले जाते. इलेक्ट्रॉनिक उपकरणानी प्रक्षेपित केलेल्या करमणूकीपासून आनंद मिळविला जातो. पूर्वी कधीही न पाहिलेल्या व्यक्ती हजर असताना नाटक-बोलपट पाहिले जातात अथवा प्रेक्षागृहात खळांचे सामाने पाहतात. अपरिचित असलेल्या भटजीबरोबर स्वत:ला ज्ञात नसलेले पूजाविधी देवळात जाऊन केले असतात. ज्या सवंगड्यांचा पालकांबरोबर घनिष्ठ



अनुक्रमणिका

संबंध आला नाही, तरी त्या सवंगड्यांबरोबर प्रत्येक कानाकोपऱ्यात धोका दबा धरून बसला आहे, अशा शहरातल्या वातावरणात लोक लहानाचे मोठे होतात या महानगरातून, जनावरे (मुंबईत नाही) व झाडे क्वचितच दृष्टीस पडतात. एवंच व्यक्ती समाजापासून अलग झालेली असते. आधुनिक समाजातील सतत वाढणाऱ्या शहरापेक्षा, आधुनिक सैन्यामध्ये व्यक्तीच्या सामाजिक आणि आध्यात्मिक गरजांकडे खरोखर अधिक लक्ष पुरविण्यात येते. याठिकाणी आधुनिक शहरांचे जे वर्णन केले आहे ते थोडेसे अतिशयोक्त आहे हे खरे. मुद्दा स्पष्ट व अधोरेखित व्हावा एवढ्या उद्देशानेच ते केलेले आहे. तथापि शहरातून लाखो लोक ज्या प्रकारचे जीवन जगतात, त्याला अनुसरून ते खासच योग्य असेच आहे. व्यक्तीचे आपल्या सभोवतालच्या जगाशी संबंध असतात. त्या स्वरूपात आपण जर विचार करणार असलो तर एक गोष्ट स्पष्ट आहे. आधुनिक महानगरीतली ही बिनचेहऱ्याची जीवनपद्धती, ही परंपरागत ग्रामीण समाजातील घट्ट विणीच्या समूह जीवनापेक्षा अगदी पार दुसऱ्या विरुद्ध टोकाची आहे. आधुनिक परिस्थितीशी त्यातील वातावरणाशी, समाधानकारकपणे जुळवून घेणे अनेकांना जमलेले नाही. तसेच आरोग्यदायक/ निरोगी पातळीवर जुळवून घेण्याच्या दृष्टीने उपकारक ठरतील अशा सामाजिक संकटनांचा ढाँचा अजून तरी विकसित झालेला नाही.

आधुनिकीकरणाबरोबर समाजातील हिंसेतही वाढ होते. वरील परिच्छेदात उल्लेखिलेल्या सामाजिक बदलांशी त्या हिंसेचा संबंध कशा प्रकारे आहे हे अजून तरी स्पष्ट झालेले नाही. इ. स. १८२० ते १९४९ या कालखंडात फार तपशीलात जाऊन जागतिक पातळीवरचे अंदाज बांधण्यात आले. त्यातून ठोस निष्कर्ष प्राप्त झाले नाहीत. तेही अपरिहार्यच. परंतु हे अंदाज असे दर्शवितात की, महायुद्धे ही वारंवार होतात. या महायुद्धात, तोवर ४ कोटी ६८ लाख लोक मृत्यूमुखी पडले. परंतु या प्रचंड आकड्यांशी तुलना करता, या दरम्यानच्या काळात, छोट्या गटात मारामाऱ्या होऊन झालेल्या हिंसेत २८ लाखाना यमसदनास जावे लागले. सत्त्याण्णव लाख व्यक्ती ज्या खूनात एक ते तीन व्यक्ती अंतर्भूत आहेत अशा हाणामारीत मरण पावल्या. लोक अशा प्रकारे वाढत्या प्रमाणात बळी पडत आहेत हे तर खरेच. पण जगाची लोकसंख्या ज्या वेगाने वाढते आहे. त्या वेगाने या हिंसेत होणाऱ्या मृत्यूचे प्रमाण वाढलेले नाही. समाजातील वाढत्या हिंसेने व्याकुळ होणाऱ्या मनाला या वस्तुस्थितीने दिलासा मिळाला तर कदाचित मिळेलही. परंतु त्याजबरोबर हेही स्पष्ट झाले आहे की, मानवी इतिहासाच्या अगोदरच्या कालखंडाबद्दल तौलनिक आकडेवारी उपलब्ध नसली, तरी एक मुद्दा स्पष्ट आहे. परंपरागत समाजापेक्षा आधुनिक युगात एकंदर लोकसंख्येचा कितीतरी मोठा भाग, हिंसेमुळे मृत्यूमुखी पडतो.

राजकीय नेत्यांच्या बुद्धीपरस्पर दुष्टबुद्धीत या हिंसेचा काही प्रमाणात उगम आहे हे नि:संशय. तथापि त्या हिंसेच्या फार मोठ्या भागाचे स्पष्टीकरण असे आहे की, आधुनिकी-करणात अनुस्यूत असलेल्या आमूलाग्र अशा सामाजिक बदलांच्या अनुरोधानेच त्या हिंसेचे



अनुक्रमणिका

स्पष्टीकरण मिळेल. या सामाजिक बदलात मानवी सामाजिक वागणूकीचे आकृतिबंध अगदी पूर्णपणे अंतर्भूत असतात. म्हणूनच हे सामाजिक बदल व्यक्ती आणि संस्था यांची सुरक्षितता, त्यांची अस्मिता, त्यांचे व्यक्तीत्व या स्वरूपात त्या त्या प्रमाणात अस्थिरता निर्माण करतात. परंपरागत सामाजिक कार्ये आणि संस्था यात कालौघात बदल झालाच पाहिजे. परंतु तसे होते त्यावेळी संघर्ष केल्यानंतरच ती परंपरागत सामाजिक कार्ये व संस्था माघार पत्करतात. स्थानिक पातळीवर हिंसेला, राष्ट्रीय अधिकारात एकसूत्रता आणणे, राष्ट्रात बंड झाले तर ते दडपून टाकणे आणि प्रस्थापित सरकार उलथून टाकणे या साऱ्यांचे स्वरूप प्राप्त होते. परंपरागत राजकीय नेतृत्वांचे आधुनिकीकरणवादी राजकीय नेतृत्वात परिवर्तन होताना नेहमीच हिंसा होते. अनेक वेळा ही हिंसा प्रखर आणि दीर्घकाळ चाललेल्या यादवी युद्धांचे स्वरूप धारण करते. आंतरराष्ट्रीय पातळीवर या हिंसेच स्वरूप आणखी वेगळे असते. बहुराष्ट्रीक ज्या साम्राज्यात होते त्यांचे विसर्जन झाले. दास्यात असलेल्या लोकांची मुक्तता नवी राष्ट्रे घडविण्याच्या प्रयत्नात अनेक प्रदेशांचे एकीकरण. तसेच त्याने निर्माण झालेली राष्ट्रे आणि जुनी प्रस्थापित राष्ट्रे या दोघांचीही सुरक्षितता टिकवून धरणे, या सर्व गोष्टी करण्याच्या प्रयत्नात हिंसा होणे अटळ असेच आहे. या हिंसेतला बराचसा भाग युरोपिय आणि इंग्लिश भाषिक समाजात केंद्रीत झाला आहे हे खरे. पण त्यात आफ्रिका, चीन आणि **भारतही यांचा अंर्तभाव केला पाहिजे.** कारण या देशात, तेथील साम्राज्यवादी राज्यकर्ते निघून गेल्यानंतरचे हिंसेत बळी पडलेल्या व्यक्तींचे आकडे छाती दडपतील एवढे प्रचंड आहेत. पाश्चिमात्य देशात आधुनिकीकरणास प्रथम सुरुवात झाली हे त्याठिकाणी प्रथम हिंसा झाल्याने आपल्या लक्षात येते हे त्यामागचे प्रमुख कारण. आधुनिक ज्ञान विकसित करण्यासाठी या राष्ट्रात असलेल्या लोकांच्या जोमाची आणि शोधक बुद्धीची अर्थातच मदत झाली. मानवी व्यवहारात, त्याचमुळे, त्या ज्ञानाचा या राष्ट्रातील लोकांनी वापरही केला. परंतु या दोन्ही गुणाबरोबर या राष्ट्रातील लोकात **मनुष्य या जातीत** सर्वसामान्यपणे तोवर न आढळलेल्या पातळीवरची युद्धपिपासू वृत्ती असण्याचीही शक्यता आहे हे दाखवून दिले. लॅटिन, अमेरिका, आशिया आणि आफ्रिका या देशातल्या लोकांनी असे दाखवून द्यावयाचे आहे की, या देशातील राष्ट्रानी, आधुनिकीकरण हे त्यामानाने कमी हिंसा करून साध्य करून घेता येईल. दुर्दैवाने चीन हा आशियाई देश या परीक्षेत नापास झाला. कारण त्याने मार्क्सवादाची धरलेली कास आणि **चाणक्य डांगे यानी त्या हिंसेची केलेली भलावण.**

सामाजिक आणि वैयक्तिक अशा दोन्ही प्रकारच्या संबंधात अंगभूत असलेल्या प्रश्नापासून अधिक प्रमाणात आधुनिकीकरण मार्गावर आगेकूच केलेले समाज, **परंपरागत समाजापेक्षा अधिक स्वतंत्र नसतात.** पण आधुनिक समाजात आपल्या अवतीभोवतीच्या भौतिक आणि मानवी परिस्थितीबद्दल अधिक प्रमाणात जाण असते. म्हणूनच मानवजातीच्या ऐहिक स्वरूपाच्या कल्याणाची जाण करून घेण्याची पात्रता या आधुनिकीकरणावर फार मोठा मार्ग



अनुक्रमणिका

काटलेल्या समाजांकडे असते. असे असले तरी त्या समाजापुढे अधिक गुंतागुंतीचे व अनेक व्यक्तिगत असे प्रश्न असतात. तसेच विध्वसंक आणि हिंसक प्रवृत्तीही या समाजांकडे (काही कारणाने ज्या विद्यमानकाळी अज्ञात आहेत. ) असमान आधुनिक समाजाना ही जी संधी विद्यमान काळी प्राप्त झाली आहे, तिचा जास्तीत जास्त चांगला उपयोग करणे, मिळालेली संधी अधिक अधिक प्रमाणात कामी आणणे, हे त्या समाजानी करावयाचे काम आहे. त्याजबरोबर या आधुनिक समाजांची जी विध्वंस करण्याची ताकद आहे, त्यापासून आपले स्वत:चे, आपल्या समाजाचे संरक्षण करणे, हेही त्या आधुनिक समाजासमोर असलेले एक आणखी एक महत्त्वाचे उद्दिष्ट व काम आहे.

---

सैद्धांतिक पदार्थ विज्ञान शास्त्रज्ञ कशा प्रकारे संशोधन करतो? निसर्ग नियमांच्या विषयी अधिक चांगली समज यावी यासाठी प्रयत्न करण्यासाठी तो कशी सुरुवात करतो? याबद्दल आपणास काही कल्पना यावी यासाठी मी प्रयत्न करणार आहे.

सैद्धांतिक पदार्थ विज्ञानशास्त्रज्ञ दोन प्रमुख मार्गानी व पद्धतीनी जातो. त्यात फरक करता येईल. त्यांपैकी प्रत्यक्ष प्रयोगांच्या आधारे संशोधन करणे हा त्यापैकी एक मार्ग. या साठी पदार्थ विज्ञान शास्त्रात जे प्रयोग होत असतात, त्यांच्याशी अशा पदार्थ विज्ञान शास्त्रज्ञाने नेहमीच घनिष्ट संपर्कात राहिले पाहिजे. जे संशोधक प्रयोग करीत असतात, त्यांचा निष्कर्ष काय होता. याबद्दल प्रयोगाद्वारे संशोधन करणारा संशोधक करतो. समाधानकारक आणि सर्व समावेशक अशा आराखड्यात या सर्व निष्कर्षांना बसविण्याचा प्रयत्न करतो.

गणिताला आधारभूत मानून संशोधन करणे हा दुसरा प्रमुख मार्ग आहे. अस्तित्वात असलेल्या समकालीन सिद्धांताची तपासणी आणि त्याच्यावर टिका टिप्पणी करणे या संशोधकाला करणे प्राप्त असते. अस्तित्वात असलेल्या सिद्धांतील त्रुटीवर नेमके बोट ठेवण्याचा आणि यानंतर या त्रुटी दूर करण्याचा प्रयत्न संशोधक करतो.

पदार्थ विज्ञानशास्त्रातील संशोधन अवलंबित असलेले हे दोन सर्वसाधारण असे मार्ग. या दोन मार्गात फरक जरूर आहे पण तो अगदी काळा-पांढरा यासारखा नाही. या दोन टोकाच्या मध्ये अनेक वेगवेगळ्या छटा अर्थातच असतात.

**–नोबेल पारितोषिक विजेते पॉल डिरॅक यांच्या एका भाषणातून.**



अनुक्रमणिका

# प्रासंगिक टिपणे

**(१) एका लढवय्याला मानवंदना**

**कार्ल पॉपर** हे गेल्या शतकातले एक प्रख्यात तत्वज्ञ. त्यांनी मांडलेल्या वैज्ञानिक क्षेत्रातील सूत्राबद्दल काहीश्या विस्ताराने नवी क्षितिजेच्या ५२व्या अंकात विस्ताराने लिहिलेले आहे. म्हणून पुनरूक्ती होईल या कारणाने त्याबद्दल पुन्हा लिहित नाही. कॉर्ल पॉपर यांच्या सूत्रांची बैठक तशी साधी व सरळ होती. (१) विज्ञान हे जगाबद्दलची आपली समजूत वाढविते. (२) विज्ञानात मांडला गेलेला प्रत्येक सिद्धांत हा खरे म्हणजे तात्पुरता असतो. तो अखेरचा शब्द कधीही नसतो. तो सिद्धांत चुकीचा कसा आहे हे ठरविण्यासाठी त्या सिद्धांतात अंर्तगत अशी तत्त्वे उपलब्ध असतात – कॉर्ल पॉपर यांच्या या सूत्रात त्रुटी काय आहेत याचे विवेचन या अगोदर उल्लेख केलेल्या नवी क्षितिजेतला लेखात आहे. पण कॉर्ल पॉपर यांची ही सूत्रे. आपल्या कामात आपणास चांगलीच उपयुक्त ठरली आहे असे अनेक वैज्ञानिकानी सांगितले आहे. उदा. नोवेल पारितोषिक विजेते **पिटर मेडावर. कॉर्ल पॉपर** यांच्या सूत्रानुसार **सिगमंड फ्राईड** व **कार्ल मार्क्स** हे दोघेही कोणताच वैज्ञानिक स्वरूपाच्या सिद्धांत मांडत नसून त्यांचे लिखाण हे एक प्रकारचे मुक्त 'चिंतन' आहे. तीच त्याची मर्यादा व ताकदही आहे असे कार्ल पॉपर म्हणते होते. याचे कारण या दोघांनी मांडलेल्या सिद्धांतात ते चुकीचे आहेत हे ठरविण्यासाठी कोणतीही त्या सिद्धांतात अंर्तगत तत्त्वे सांगितलेली नाहीत. उदा. फ्राईड यांचेच उदाहरण घेऊया. समजा त्यांनी आपल्याकडे उपचाराला आलेल्या मनोरुग्णाला सांगितले की तुला जी मानसिक व्यथा आहे. तीचे कारण अमूक-अमूक आहे. त्या रूग्णाने त्याचा इन्कार केला तर, फ्राईड सांगणार तू इन्कार करतो आहेस याचे कारण तुला सांगितलेली कारणे योग्यच आहेत हे तुला नाकारायचे आहे यासाठी तू ही इन्कार करतो आहेस. यात महत्त्वाचा मुद्दा हा आहे की फ्राईड यांचे निदान, त्यासाठी त्यांनी दिलेली कारणे, यांचे मूल्यमापन करण्यासाठी त्यांनी कोणतेही मापदंड सांगितलेले नाहीत. एवंच मी (फ्राईड) सांगतो तसेच आहे ! कार्ल पॉपर यांच्या सूत्रानुसार हे विज्ञान नाही, फक्त मुक्त चिंतन आहे. अमेरिकन व्यक्ती म्हणेल– त्यानुसार This is a free country हा देश मुक्त चिंतन व वागणुकीसाठी प्रसिद्ध आहे ! असो.

**कॉर्ल पॉपर** यांना दिर्घायुष्य लाभले. त्यांचा मृत्यु अगदी अलिकडच्या माझ्या स्मरणानुसार वयाच्या ९२व्या वर्षी त्यांनी या जगाचा निरोप घेतला. पण ते या वृद्धपकाळी सुद्धा कार्यमग्न होते; व ते विचारही आपल्या नेहमीच्या मूलगामी पद्धतीने करीत होते. त्यांना **लेस्ली व्हाईट** या पत्रकार कार्ल पॉपर यांचे नव्वदावे वर्ष संपण्याअगोदर थोडे दिवस भेटल्या होत्या. लेस्ली व्हाईट व कार्ल पॉपर यांच्या भेटीचा हा त्रोटक वृत्तांत. "कार्ल पॉपर हे

आज विद्यमान असलेल्या तत्त्वज्ञातील सर्वश्रेष्ठ तत्त्वज्ञ याबद्दल वाद होणारच नाही. (अर्थात लाल निशाणी विचारवंताचे (?) त्यांनी वस्त्रहरण केले असल्याकारणाने ते वाद घालणार नाहीत पण नापसंती व्यक्त करतील – संपादक) यांची भेट घेण्यासाठी एखाद्याला विद्यापीठातील वैराण परिसरात अथवा ऑक्सफर्ड विद्यापिठातील नामवंत चौकातील घरात जावे लागत नाही. लंडन नगराच्या कोणाच्याही फारसे लक्षात न येणाऱ्या **पर्ली** (PURELT) या उपनगरात त्यासाठी जावे लागते. कॉर्ल पॉपर या उपनगरात आजूबाजूला फारशी वस्ती नसलेल्या एका टोकाला असलेल्या घरात राहतात. हे घर चांगलेच प्रशस्त व मोठे आहे. घर अर्थातच ग्रंथानी खच्चून भरलेले आहे. त्यांच्या सोबतीला ताजी फुले नेहमीच हजर असतात. एखादे तत्त्व, सिद्धांत व तत्त्वज्ञान हाच अंतिम व अखेरचा शब्द आहे असे मानून (उदा. भाई डांगे) त्यांच्या अनुषंगाने राजकीय कृती वा विचार करणारांचे कर्दनकाळ **कार्ल पॉपर** या प्रशस्त घरात राहून अत्यंत शांतपणे आपले जीवन व्यतीत करतात. अर्थात आपल्या आवडत्या संशोधनाला त्यांनी अखेरचा सलाम ठोकलेला नाही. ते सातत्याने या संशोधनात कार्यमग्न असतात.''

''त्यांच्या दिमतीला या प्रशस्त घराची देखभाल करणाऱ्या व त्यांचा योगक्षेम व्यवस्थित राहावा यासाठी कार्यमग्न असणाऱ्या बाई (HOUSE KEEPER) आहेत. शिवाय **कार्ल पॉपर** यांच्या मदतनीस आणि मित्र श्रीमती म्यू (MEW) याही त्यांची चांगली काळजी घेतात. सध्या ते आपण लिहिलेल्या ग्रंथाचे नव्याने करण्यात आलेल्या भाषांतरात सुधारणा करणे व वेळप्रसंग त्या भाषांतराचे पुर्नलेखन करणे यात मग्न आहेत. वयाचा परिणाम असेल ते काम करावयास लागल्यानंतर थोड्याच वेळात थकतात. त्यांना काही प्रमाणात ऐकावयासही कमी येते. हे सारे जरी असले तरी आधुनिक जगातील नैराश्य प्रवृत्ती (PESSIMISTIC) प्रवृत्ती पाहून ते काहीसे निराश होतातच.''

''ते काहीही असो त्यांच्या डोळ्यातून उत्साह अजूनही ओसांडून वहात होता. विशेषत: त्यांनी जमा केलेला पुरातन अशा तत्त्वज्ञान विषयाचा ग्रंथसंग्रह दाखविताना. हा संग्रह त्यांना फारच प्रिय आहे. **गॅलिलिओ** हा शास्त्रज्ञ त्यांच्या अत्यंत आवडता वैज्ञानिक. **गॅलिलिओनी** लिहिलेल्या ग्रंथाची इ. स. १६३२ सालची आवृत्ती. चामड्याचे मढविलेल्या बांधणीतील **प्रख्यात तत्त्वज्ञ या तत्त्वज्ञाचे समग्र ग्रंथ आणि** त्यांना सर्वात जास्त प्रिय असलेल्या **कांट** या तत्त्वज्ञाचे समग्र ग्रंथाच्या पहिल्या आवृत्त्या या त्यांच्या ग्रंथसंग्रहात आहेत. **कार्ल पॉपर** यांना या आवृत्या दाखविताना त्यांच्या उत्साहाला उधाण येते.''

''परंतु केवळ शुद्ध पण त्याजबरोबर अमूर्त अशा विचारांवर गुजराण करणारा हा तत्त्वज्ञ नाही. तत्त्वज्ञान या विषयाचा कोणी पाठपुरावा करीत असला तर त्या खटाटोपाच्या उपयोग काय असा प्रश्न एखाद्याने **कॉर्ल पॉपर** यांच्या बरोबरच्या संभाषणात उपस्थित केला तर मग त्या प्रश्न कर्त्याला काय उत्तर मिळेल? **कॉर्ल पॉपर** यांची त्याना छेडणाऱ्या व्यक्तीची 'तत्त्वज्ञान' या विषयाबाबतची ही जी मते होती; त्याच्याशी तो महान तत्त्वज्ञ सहमती

दर्शवितो; हे ऐकून त्या प्रश्न कर्त्याच्या फार आनंद झाल्याशिवाय राहिला नसता. विशेषत: याच **कॉर्ल पॉपर** यांच्या अंगावर त्यांचे समकालीन दुसरे एक महान तत्वज्ञ हातात दाभण घेऊन धावून गेले होते. इतके विटगनस्टाईन पॉपर यांचे भाषण ऐकून चवताळले होते. या प्रसंगाची प्रश्नकर्त्याने जो प्रश्न उपस्थित केला होता त्या संदर्भात आठवण झाली असती तर त्याचा आनंद शतगुणीत झाला असता. या प्रश्नाचे उत्तर देताना पॉपर आपल्या मृदू आवाजात म्हणतात. "होय मी तुझ्याशी सहमत याचे कारण तत्त्वज्ञान या विषयावद्दल मी फारच वाईट मत वाळगून आहे. परंतु मी हे मत जाहिरपणे सांगत नाही. **मी अजूनही समाजवादी विचारांचाच आहे.** पण तो एका मर्यादित अर्थाने. आम्ही सारे बुद्धिजीवी विचारवंत समाजातील कनिष्ठ स्तरावर असलेल्या अनेक व्यक्तींपेक्षा नशिबवान आहोत. या कनिष्ठ वर्गात त्यांचा काहीही अपराध नसतानाही ते त्या कनिष्ठ स्तरात लोटले गेले आहेत. या अशा व्यक्तींना बाहेरच्या जगात जे काही घडत आहे हे त्या कमनशिबी लोकांना समजावे यासाठी त्याना मदत करणे, हे आम्ही सर्व बुद्धीजीवी विचारवंतांचे कर्तव्य आहे असे मी मानतो. दुर्दैवाने हा दृष्टिकोन मान्य करणारे वा स्विकारणारे लोक संख्येने फारच थोडे आहेत; असे मला आढळून आले आहे. बुद्धीजीवींतील विचारवंतातील बहुसंख्य विचारधारा येथवर पोचतच नाही. मला प्रिय असलेल्या माझ्या विषयातील सहकाऱ्यावद्दल काही वाईट बोलावे अशी माझी इच्छा बिलकूल नाही. परंतु तत्त्वज्ञान या विषयाचा शिक्षक असणे हे विद्यमान समाजात फारच हास्यास्पद ठरले आहे. ही दुर्दैवाने वस्तुस्थिती आहे. समाजात तत्त्वज्ञान या या विषयाचे शिक्षण मिळालेल्या अथवा चुकीचे शिक्षण मिळालेल्या व्यक्तींची संख्या अमाप आहे.या अशा आभागी व्यक्तींची समाजाला आवश्यकता नाही अशी कल्पना कोणी करणे, हे हास्यास्पद मूर्खपणाचे आहे. तथाकथित काही बुद्धिवादी विचारवंत वर उल्लेखिलेला विचारांचा प्रसार करण्यासाठी कटीबद्ध झाले आहेत, हे खरे. परंतु या त्यांच्या विचारामागे एक साधे कारण आहे. या अशा प्रकारच्या बहुसंख्य विचारवंत बुद्धीजीवीकडे लोकांना सांगण्यासारखेच काही नसते."

"आम्ही दोघे (मुलाखतकार व पॉपर) चहा पिताना हास्यविनोदाबरोबर इतरही संभाषण करीत होतो. यानंतर पॉपर मला एका छोट्या अभ्यासिकेत नेतात आणि स्वत: अगदी सावकाश खुर्चीत आरामात बसतात. यापुढचे संभाषण एका महान आयुष्यात हळूवारपणे प्रवेश करणारा, शेकोटीजवळ उब घेऊन, जुन्या आठवणींची उजळणी करणारा आणि संभाषणाच्या शेवटी आपल्या अत्यंत गाजलेल्या कारकिर्दीवद्दल आत्मगौरवपर उद्‌गार काढणारा– हा विचार माझ्या मनात जर आला असेल, तर तो किती चुकीचा होता हे मला लगेच समजले. आपल्या शैक्षणिक कारकिर्दीत शिखराला हा महान वृद्ध तत्त्वज्ञ केव्हाचा पोचला होता. वृद्धापकाळामुळे तो आता उताराला लागला आहे असा जर कोणी समज करून घेईल तर तो पस्तावेल. या समजुतीचा कार्ल पॉपर आपल्या धारदार बुद्धिमत्तेचा साहाय्याने पार चिंध्या करून टाकतील, त्यांना अनेक गंभीर विषयावद्दल चर्चा करण्याची

इच्छा आहे. ते विषय गहन असतील, पूर्णपणे समजण्यास कठीण असले, वृत्तपत्रात नेहमी आढळणाऱ्या विषयापेक्षा वेगळे नसले, तरी त्यांना त्याची चिंता नाही.''

''आमच्या समोरच्या मेजावर अनेक पातळ पुठ्ठा बांधणीतील पुस्तकांची चळत. या त्यांच्या जुन्याच पुस्तकांच्या नव्या आवृत्या आहे. त्यांच्या नव्वदाव्या वाढदिवसाचे निमित्त करून त्यांच्या जुन्या ग्रंथाच्या मालिकेतील त्या नव्या आवृत्या आहेत. मुक्त समाज आणि त्यांचे शत्रू (OPEN SOCIETY AND ITS ENEMIES) ह्या त्यांच्या अत्यंत मूलगामी ग्रंथाचे जार्मन भाषेत पुन्हा एकदा नव्याने भाषांतर झालेले आहे. त्या ग्रंथाच्या त्या प्रती आहेत. त्याजबरोबर त्यांना दिलेल्या व्याख्यानांचे संग्रह आहेत. अलिकडेच लिहिलेल्या लेखांच्या पुस्तिकाही आहेत. **रशियन भाषेत** ''मुक्त समाज आणि त्याचे शत्रू या ग्रंथाची पन्नास हजार (५०,०००) प्रतींची नवी आवृत्ती प्रसिद्ध होणार आहे. मार्क्सवादावर अत्यंत कठोर शब्दात मूलगामी टिका करणारा हा ग्रंथ चांगलाच गाजला होता, व प्रसिद्धही होता. अजूनही त्या ग्रंथाचा अभ्यासक वारंवार उल्लेख करतात. माक्सर्वादावर अत्यंत कठोर शब्दात मुहतोड टिका करणारा हा ग्रंथ असल्याकारणाने या ग्रंथाचे **रशियन भाषेत** पूर्वी भाषांतर झालेच नाही. परंतु या ग्रंथातील काही वेचक परिच्छेद व पृष्ठे निवडून त्यांचे भाषांतर होऊन, ते रशियातील भूमिगत संघटनानी त्याला प्रसिद्धी दिली होती. अर्थात भूमिगत प्रकाशनाची दखल घेऊन रशियन भाषेत त्यावेचक वेच्यांवर फारच जोरदार व नेहमीची लाल निशाणी विशेषणे वापरून टिका झाली होती.''

''कॉर्ल पॉपर हे प्रकृतीने नेमस्त आहेत, ते आपल्या तत्त्वाबद्दल फारसे आग्रही नसतात. त्या तत्त्वांचे पालन हे त्यांच्या स्वत:पुरतेच मर्यादित आहे असे ते मानतात. पॉपर यांच्या मते सर्वच प्रकारच्या ज्ञानात काहीना काही गफलत असतेच रशिया आणि जर्मनीतल्या हुकुमशाहीला त्यांनी जोरदार विरोध केला होता. अनेक वर्षे ती त्यांची मते ही त्यांच्या त्यांना होणाऱ्या विरोधास न जुमानता ते मांडीत आले होते. परंतु पूर्व युरोप आणि रशियातील राजवटी कोसळल्यानंतरही आपण आजवर जे काही सांगत होतो, ते किती अचूक होते अशी बढाईही ते मारीत नाहीत. ''मी (**कॉर्ल पॉपरनी**) तुम्हाला सांगितलेच होते हे मी कधीही मान्य करणार नाही'' असे आवाज वाढवून ते सांगतात. जाताजाता ते सांगतात की (मला (**कॉर्ल पॉपरला**) एवढेच माहित होते की, या सर्व 'लाल निशाणी' राजवटी भयाण, पाशवी व रानटी आहेत हे मला माहित होते; आणि मी तसे सांगत राहिलो एवढेच.''

''आमच्या समोरच्या मेजावर पुन: प्रकाशित झालेल्या त्यांच्या आत्मचरित्राची नवी आवृत्ती होती. या आत्मचरित्राचे नांव अंत नसलेला शोध (UN ENDED QUEST) या आत्मचरित्राच्या वेष्टनाच्या मागच्या बाजूवर, या नव्या आवृत्तीला हेलमूट कोहल (HELMUT KOHL) यांची प्रस्तावना आहे, असे मोठ्या दिमाखात जाहिर करण्यात आले होते. हे पाहून व वाचून कार्ल पॉपर यांना धक्काच बसला. त्याबद्दल त्याना राग आला पण



अनुक्रमणिका

त्याजबरोबर वाईटही वाटले. "या पूर्वी माझ्या पुस्तकाबद्दल कोणी काही लिहावे असे मी **(कार्ल पॉपर)** कधीही सांगत नसे. कोणी लिहिल्यास ते मी प्रसिद्ध करीत नसे वा त्याच्या प्रकाशनास परवानगी देत नसे. हे सारे सांगून झाल्यानंतर पॉपर पुढे म्हणाले की "मला या सर्वाची (म्हणजे प्रसिद्धीची, राजकीय आश्रयाची) काय गरज आहे..... मी या गृहस्थांबद्दल (HELMUT KOHL) या व्यक्तीबद्दल आदर जरूर बाळगतो. या गृहस्थांच्या काही निष्ठा आहेत. त्या निष्ठाबाबत ते कधीही तडजोड करीत नाहीत. हा गुण राजकारणी लोकांत फारच दुर्मिळ आहे. परंतु त्यांच्या (HELMUT KOHL) प्रशस्तीमध्ये त्यांनी मी विनयशील व नेमस्त आहे असे सांगून माझी प्रशस्ती केली आहे. हे वाचल्यानंतर लोकांना असे वाटेल की त्यानी माझी स्तुती करावी अशी माझी इच्छा होती."

...... या दोन्ही विधानात– म्हणजे या दोन्ही विधानात "मी विनयशील आहे" आणि "**हेलमूट कोहल** यांनी माझी स्तुती करावी ही इच्छा" फारच भयानक असा अंर्तविरोध नाही का?

"आमच्या दोघांच्या भेटीत कोठच्या गोष्टींची चर्चा व्हावी अशी जी त्यांची इच्छा असेल ती जाणून घेऊन आमची चर्चा निर्वेधपणे पार पाडावी अशी माझी इच्छा होती. पण त्याबद्दल मी त्यांना विचारण्याअगोदर कोणत्या प्रश्नांची चर्चा करावी हे त्यानी ठरवूनच टाकलेले होते. एका परीने मी सुटकेचा विश्वास सोडला. कार्ल पॉपर यांनी त्यांना ज्या मुद्याबद्दल चर्चा व्हावी असे वाटत होते, त्याबद्दल आपले म्हणणे काय आहे हे सांगण्यास सुरवात केली. "रशियाकडे असलेले अणुगोळे काळ्या बाजारात जातील. याविषयी आपण आजकाल चर्चा करण्यास सुरुवात आहे." येथे एक मुद्दा खास करून लक्षात ठेवला पाहिजे तो हा की ही चर्चा काही एकादा आखिव रेखीव असा इतिहास या विषयाचा पाठ नव्हता. **कार्ल पॉपर** यांनी अणुगोळांच्या काळ्या बाजारांचा उल्लेख केल्यानंतर ते उठले, आणि आपल्या घरातील ग्रंथसंग्रहाकडे गेले. त्या अफाट ग्रंथसंग्रहातून त्यांनी नेमके दोन ग्रंथ उचलून बाहेर आणले. (१) 'खुश्चेव (२) भूतपूर्व प्रख्यात रशियन पदार्थविज्ञान शास्त्रज्ञ आँद्रे सखिराव यांच्या आठवणी हेच ते दोन ग्रंथ होते. (ANDREI SAKHAROV) या दोन ग्रंथातील अनेक परिच्छेदावर कार्ल पॉपर यांनी आपली टिका-स्पष्टीकरणे आपल्या देखण्या अक्षरात त्या ग्रंथात पानापानावर नोंदवलेली आहेत. मानव जातीला भविष्यकाळात जो अत्यंत भयावह धोका आहे त्याच्याशी त्यांनी केलेल्या त्या नोंदी संबधित होत्या. त्यांना ते दोन्ही ग्रंथ समोर ठेवले; आणि आपल्या विवेचनास सुरवात केली. पॉपर यांचे सर्वच विवेचन त्यांच्या आजवरच्या लिखाणाइतकेच विस्तारपूर्वक स्पष्ट शब्दात कोठच्याही प्रकारचा वाचकाच्या मनात संदेह राहू नये असे. अनेक मुद्दे-उपमुद्दे यांनी अगदी ठासून भरलेले. हे विवेचन करताना ते मधूनच विश्रांती घेत त्यासाठी थांबत. श्रोत्याच्या कानात अनेक दिवस गुंजन करीत राहील अशा स्पष्टतेने ते विवेचन अनेक नागमोडी वळणे घेत पुढे सरकत होते. हे

सर्वच विवेचन अनेक उदाहरणे आणि संदर्भ यांनी अगदी ठासून भरलेले होते.''

''इ. स. १९६० च्या सुरवातीच्या काळात त्यांचे अमेरिकेत वास्तव्य असताना त्यांनी क्युबाने क्षेपणाअस्त्राच्या संबधी निर्माण केलेल्या पेचप्रसंगाचा अभ्यास करण्यास सुरवात केली. या घटनेमुळे (तत्कालीन) साम्यवादी राष्ट्रांचे खरे व वास्तव उद्दिष्ट काय आहे याबद्दल त्यांना चांगलीच जाण प्राप्त झाली होती. त्यांनी या संबंधात स्पष्टीकरण देताना असे सांगितले की, ''**साखारोव** असे सुचवितात की **साखारोव** यांनी निर्माण केलेल्या अणुगोलाची क्षमता अमेरिकेने हिरोशिमावर टाकलेला अणुगोल प्रमाण मानून, मोजण्यात यावी ही त्यांची सूचना अगदी अतुलनीय अशीच. पण त्याजबरोबर **साखारोव** यांच्या बुद्धीची निर्मिती क्षमता व प्रतिभा दर्शविणारी होती. साखारोव यांनी असे सांगितले की त्यांनी निर्माण केलेल्या अणुगोलाची विध्वंस करण्याची क्षमता, ही अमेरिकेने हिरोशिमावर टाकलेल्या अणुगोलापेक्षा कितीतरी सहस्रपटीने अधिक आहे, इतका तो शक्तीशाली आहे असे विधान साखारोव यांनी केले आहे. या विधानाबद्दल साखारोव यांची आजवरची एकंदर किर्ती लक्षात घेता आपला अनुभव जमेस करता त्यांच्या या विधानावद्दल शंका घेण्याचे कारण नाही. आपण थोडे अलिकडच्या काळात येऊया. आरंभीच ***गोर्बाचॉव्ह*** *यांनी असे कबूल केले की या प्रचंड क्षमतेचे वा ताकदीचे किमान ११ (अकरा) हजार अणुगोल अस्तित्वात आहेत. नंतर त्यांची संख्या १४ हजारावर नेण्यात आली. सरतेशेवटी राजकारणाला रामराम करीत असताना केलेल्या भाषणात ही या अणुगोलांची संख्या ३० हजार आहे असे सांगितले. साखारोव यांच्या 'मोजमापानुसार या अणुगोलांची विध्वंस करण्याची या अणुगोलांची ताकद व क्षमता ९ कोटी हिरोशिमा अणुगोलांइतके प्रचंड आहे. गोर्बाचॉव्ह यांचे हे विधान नेमस्तच आहे असे गृहीत धरले की त्याचा अर्थ काय होतो?* ***विद्यमान रशियात किमान १० कोटी हिरोशिमा अणुगोल काळ्याबाजारात उपलब्ध आहेत.*** *हा विचार हृदयाचा भयानक थरकाप उडविणारा व आपल्या सारख्या सामान्य माणसांच्या कल्पने पलिकडचा आहे.''*

*''राजकीय विचार आणि प्रचलित राजकारण यांची समीक्षा करणे व त्यासंबधी टिका-टिप्पणी करणे, स्तंभलेखन करणे हा ज्यांचा व्यवसाय आहे, त्या सर्वांनी साखारोव्ह यांनी पेश केलेला वृत्तांत वाचला असला तरी कार्ल पॉपर यांनी उदधृत केलेली आकडेवारी त्यांनी टिपलेली नाही हे स्पष्टच आहे. मग त्यांचे गांभीर्य लक्षात येणे दूरच. या संबधात* ***पॉपर*** *यांची एकच तक्रार होती. त्यांच्या मते लोक जे काही वाचतात ते काळजीपूर्व ते लक्ष देऊन वाचीत नाहीत. त्यातील तपशील काळजीपूर्वक वाचीत नाहीत. हेच साखारोव्ह यांनी सादर केलेल्या माहितीतील 'गांभीर्य' लक्षात न येण्याचे प्रमुख कारण आहे. गंमत अशी आहे* की आजकालच्या जगाबरोबर प्रत्यक्ष स्वरूपात विचारांचे आदान-प्रदान न करता जे (कार्ल पॉपर) आयुष्याला सामोरे जात आहेत. ते या विद्यमान जगापासून आपण अगदी अलग



अनुक्रमणिका

आहोत अशा थाटात व अवस्थेत कालभ्रमण करीत असतात. परंतु या चमत्कारिक अवस्थेत असतानाही 'मी हे सारे अगोदरच जाणले होते.' असा दृष्टिकोन वा भावना निर्माण होणे हे स्वाभाविक परंतु तसे काही झाले नाही याला कारण त्यांचे आजवरचे जीवन. एककाळ असे होते की कार्ल मार्क्स यांच्या दास कॅपिटल या ग्रंथाचे काळजीपूर्वक व बारीक-सारीक तपशीलाची नोंद घेऊन वाचन करणारे ते एकमेव वाचक आहेत असे त्यांना वाटत होते. थोडक्यात आपण एकटेच आहोत, एकाकीपणे जीवन व्यतीत करावयास लागणार आहे. त्यानुसारच भावी आयुष्याची वाटचाल करावी लागणार आहे हे त्यांनी जाणले होते. नव्हे ती त्यांच्या नेहमीच्या अनुभवातील परिस्थिती होती. ही वस्तुस्थिती त्यांच्या अंगवळणी पडली असल्याकारणाने त्याला त्यांना फारसा त्रास होत नसावा."

"आमच्या संभाषणात त्यांनी या वास्तवाचा उल्लेखही केला गेला नाही. ते आणखी एका वेगळ्याच मुद्यावद्दल उहापोह करीत होते. "क्युबामध्ये ५० अणुगोल – म्हणजे १५० अणुगोल नेऊन ठेवण्याचे खुश्चेव्ह यांचे उद्दिष्ट होते. .... आणि मी त्या वेळी सांगितले होते की या अणुगोलांचा प्रत्यक्ष वापर करण्याच्या उद्दिष्टानेच खुश्चेव्ह यांनी ते अणुगोल तेथे नेऊन ठेवले होते. "मी (खुश्चेव्ह) सांगतो त्याप्रमाणे कृती जर नाही केलीस तर मी अमेरिकेवर अणुगोलांचा वर्षाव करीत असे काही खुश्चेव्ह यांना सांगता आले नसते. याचे कारण त्याच प्रकारच्या– म्हणजे अणुगोलांच्या वर्षाव करण्याच्या कृतीने प्रत्युत्तर देणे प्रेसिडेंट केनडी यांना भागच पडले असते. त्यांच्याजवळ दुसरा पर्यायच नव्हता. खश्चेव्ह यांनी सांगितले की अणुयुद्ध करण्याची त्यांची इच्छा नाही. याचा अर्थ असा नाही की आपल्या बाजूची फारशी हानी न होऊ देता विजय प्राप्त करून घेण्याची त्यांची इच्छा नव्हती असे नाही. एका झटक्यात अमेरिकेचा निकाल लावण्याच्या त्यांचा मनसुबा होता तेच त्यांचे उद्दिष्ट होते. या माझ्या सांगण्यावर कोणीही विश्वास ठेवीत नव्हते आणि अजूनही ठेवीत नाही. सर्वांना असे वाटते की माझे (कार्ल पॉपर) यांचे प्रतिपादन हा शुद्ध अमूर्त असा वेडेपणा आहे. परंतु खश्चेव्ह यांनी आपल्या आठवणीत तोच आपला मनसुबा होता व तेच आपले उद्दिष्ट होते याची कबुली दिलेली आहे. कदाचित मला (कार्ल पॉपर) ला असा दावा करता येईल की खश्चेव्ह यांच्या भल्या लठ्ठ आठवणीच्या पुस्तकात फक्त मलाच (कार्ल पॉपर) हा अत्यंत महत्त्वाची कबुली आढळली."

कार्ल पॉपर हा तसे बघायला गेले तर एक साधा सरळसोट आसामी आहे. पण ते आम जनतेची झोप उडेल अशी वस्तुस्थिती पेश करतात, त्यावेळी ते आपणास कमालीचे धक्के देतात. त्यांनी एकंदर परिस्थितीचे अवलोकन करून काढलेले निष्कर्ष त्याच प्रकारचे असतात. ते सांगत होते *"मार्क्सवादाचे जे काही थोडे फार मागे राहिले आहे, आणि गेली काही वर्षे तेच मागे राहिलेले आहे हे आपण पहातोच आहोत. भांडवलशाही हा नरक आहे म्हणून त्या समाजव्यवस्थेचा नायनाट झालाच पाहिजे. या साठीच क्युबामध्ये अणुगोल नेऊन ठेवण्यात*

*आले होते. कॉर्ल पॉपर हे सांगताना भावविवश होतात. त्यांच्या आवाजातून त्यांना या विषयाबद्दल वाटत असलेली निकड प्रदर्शित होत होती.' ख्रुश्चेव्ह हे केव्हा काळाच्या पडद्या आड झाले आहेत. पण अणुगोल मागे राहिले आहेतच. विद्यमान रशियात आज असा एकही मनुष्य नाही की रशियात असलेल्या अणुगोलांची संख्याकिती आणि ते नेमके कोठे दडवून ठेवलेले आहेत हे सांगू शकेल. हाच प्रश्न आपणा-सर्वापुढेही आहे; आणि त्याची तड लागावयाच हवी. विद्यमान रशियात जे कोणी अधिकाराच्या जागेवर आहेत, त्यांच्याबरोबर वैचारिक आदान-प्रदान करून हा प्रश्न ताबडतोब निकालात काढला पाहिजे. विद्यमान रशियात जे कोणी अधिकाराच्या स्थानावर विराजमान झाले आहेत त्यांना देखील ही वस्तुस्थिती अगदी निश्चितपणे रूचीची वाटत असेल असे नाही. साम्यवादी देश आणि इतर राष्ट्रे यांच्या दरम्यान असलेली भिंत केव्हाचा कोसळली आहे; आणि या देशांच्या दरम्यानच्या सीमारेषा पूर्वी सारख्या राहिलेल्या नाहीत. परंतु मानवजात व मानवाची सभ्यता व संस्कृती या सर्वाचा विनाशदर्शक खूणा व त्यांची प्रतिके अजूनही अस्तित्वात आहेत.*

"**कार्ल पॉपर** हे प्रख्यात वकिलाचे चिरंजीव. त्यांचे बालपण व्हिएन्नाला साजेला अशा थाटात व वैभवात गेले. घरात अनेक नोकर दिमतीला होते. कुटुंबातील सांस्कृतिक वातावरण देखिल कोणालाही हेवा वाटावा असे. सुखासिनता प्राप्त करून देणारे अनेक मार्ग त्यांच्यासमोर हात जोडून उभे होते. पण अशा या उच्चभ्रू व वरिष्ठ मध्यम वर्गीय समाजाची जी उद्दिष्टे असतात त्या पलिकडे जाणारी **कार्ल पॉपर** यांची बुद्धिमत्ता होती. **वयाच्या तेराव्या वर्षानंतर त्यांनी ऑस्ट्रलियातील कम्युनिस्ट पक्षाच्या मध्यवर्ती कचेरीला आपण त्या कचेरीत निरोप्याचे काम करावयास तयार आहोत असे सांगितले.** त्यानुसार त्याना ते कामही मिळाले. सोळावे वर्षपूर्ण होण्याअगोदर त्यांनी एका जाहिर निदर्शनात भागही घेतला. या निदर्शकांवर पोलिसानी केलेल्या गोळीबारात आठ तरुण कामगार मृत्यू पावले. परंतु केवळ या घटनेमुळेच कार्ल पॉपर हे कडवे मार्क्सवाद विरोधी झाले."

"या निदर्शकावर पोलिसानी गोळीबार केल्यानंतर त्यातील जे निदर्शक लगेच मृत्यूमुखी पडले नाहीत, त्यांना झालेल्या जखमामुळे, त्यांना यमयातना होत होत्या. परंतु कम्युनिस्ट नेतृत्वाला त्या कामगाराना होत असलेल्या त्या स्वरूपाच्या यम-यातना वा त्या निदर्शनात भाग घेतलेल्या काहींना आलेला मृत्यू या विषयी काहीही सोयर सूतक नाही आहे असे तारुण्याच्या उंबरठ्यावर असलेल्या **कार्ल पॉपर** यांच्या लक्षात आले. कम्युनिस्ट नेतृत्वाच्या मते ते सारे वर्गीय युद्धाचा अटळ व अविभाज्य असा तो भाग होता. इतिहासाच्या अनुषंगाने केलेली जी भाकिते केली जातात. त्याबद्दल या घटनेने कार्ल पॉपर यांच्या मनात या घटनेने *घृणा निर्माण केली. ही भावना भविष्य काळातील त्यांच्या सर्व आयुष्यात, त्यांचा सतत पाठपुरावा वा त्यांना साथ देत होती. आपल्या स्वत:ला ज्या कोणात आपल्या स्वत:ला कमी*

*लेखण्याची भावना वा इच्छा असेल असे ज्यांचे वर्णन* **कॉर्ल पॉपर** *करतात – त्यांच्यासाठी ते आपला वेळ खर्ची करण्यासाठी राजी नाहीत. हे सारे खांदे उडवून सांगताना ते म्हणतात. "शहाण्याना भविष्यकाळात जे काय होणार आहे ते नेहमीच ज्ञान असते. मग ते मार्क्सवादी असोव, ज्योतिषी असोत, फ्राईड यांच्यासारख्यांचे शार्गिद असोत. (उदा. विश्वास पाटील, दादर) व इतर मानसशास्त्रज्ञ असोत, अगर चहाच्या पेल्यात चहा पिऊन झाल्यानंतर तळाशी राहिलेल्या चहा-पत्तीवरून भविष्य सांगणारे असोत."*

"**कॉर्ल पॉपर** यांनी आपल्या आरंभीच्या काळात एक निर्णय पक्का केला. **तत्त्वज्ञानाला भविष्यवेत्ता म्हणून समजण्यात येता कामा नये.** त्यांनी आपला अभ्यास विषय म्हणून तत्त्वज्ञान या ज्ञानशाखेची निवड केली होती. परंतु तत्त्वज्ञान या क्षेत्रातील अभ्यासकापेक्षा वैज्ञानिक क्षेत्रात जे कोणी काम करीत होते, त्यांच्या विचाराबद्दल व लेखनाबद्दलची त्यांची पसंती अधिक होती. याला अर्थातच अपवाद होतात, तो बर्ट्रांड रसेल यांचा. **कॉर्ल पॉपर** म्हणाले *"मला* ***रसेल*** *यांच्याबद्दल आत्मियता आहे. पण एक क्षण असा आला की ते खरोखरच वेडे झाले होते. क्युबातील ऐतिहासिक प्रसंगाच्या वेळी अमेरिकेचे अध्यक्ष जॉन* ***केनेडीवर*** *आरोप करणाऱ्या आणि* ***ख्रश्चेव*** *यांच्या नरमाईच्या धोरणासाठी त्यांचे अभिनंदन करणाऱ्या तारा बर्ट्रांर्ड रसेल पाठवित होते. ही घटनाच त्यांच्या वेडेपणाचा पुरावा आहे."*

"**कार्ल पॉपर** यांच्या शिक्षणात फारच वैचित्र होते. कपाटे बनविण्याचे सामाजिक सेवा क्षेत्रात काम करण्याचे आणि शाळेत शिक्षक म्हणून काम करण्याचे शिक्षण त्यांनी घेतले होते. **हिटलरने** स्वारी केल्यानंतर **कार्ल पॉपर** यांनी मार्क्सवादी आणि त्या विचारसरणीचे घट्ट अनुयायी त्यांच्याबद्दलचे त्यांचे निष्कर्ष प्रसिद्ध केले. हे धाडस दाखविण्यासाठी त्यांना एवढा काळ का थांबावे लागले याला कारणेही तशीच होती. **हिटलरने** स्वारी करण्याअगोदर त्यांनी आपला मार्क्सवादाला असलेली विरोध जाहिर केला असता, तर मग त्यांच्या विचारातले मर्म जाणून न घेता ते फॉसिस्ट आहेत हा कम्युनिस्ट शब्द कोशातील सवंग छाप त्यांच्यावर मारण्यात आला असता (भारतीयांना यात नवीन काहीच नाही. **सुभाषचंद्र बोस** हे त्यांचे एक नामवंत उदाहरण. **जयप्रकाश नारायण** यांच्यासारख्या पददलिताना आयुष्यभर साथ करणाऱ्या भारतीय देशभक्ताला हीच बिरूदे चाणक्य **भाई डांगे** यांनी बहाल केली होती याचे स्मरण या ठिकाणी व्हावे) शिवाय हा आपल्या वैयक्तिक प्रतिष्ठेचा प्रश्न आहे असे **कॉर्ल पॉपर** यांना वाटत नव्हते. पण आपल्या या कृतीमुळे आपल्याला ज्या पक्षाबद्दल आपलेपणा होता व ज्याचे ते आस्ट्रीयातून स्थलांतर करीपर्यंत सदस्य होते, त्या पक्षाला हितसंबधाला धक्का मिळेल असे त्यांचे मत होते. कोणत्याही अमूर्त स्वरूपाच्या तत्त्वप्रणालीवर वा विचारावर विश्वास ठेवण्यापेक्षा आपण आपल्या सामाजिक संस्थावर विश्वास ठेवणे हे. आपल्या अधिक हिताचे आहे. *हे मत त्यांनी आस्ट्रीयात वास्तव करीत असताना व्यक्त केले होते, व त्यानंतरही ते मत कॉर्ल पॉपर आवर्जुन मांडीत असत. याहीपुढे*



अनुक्रमणिका

*जाऊन ते सांगत की, "आपणासमोर अगदी स्पष्ट असे नैतिक स्वरूपाचे उद्दिष्ट नसले, तर मग त्यावेळी, आपणास उपलब्ध असलेला, आखिव, रेखीव व नेमका असा वैज्ञानिक पुरावा हाच आपणास कृती करण्यास उत्तम प्रकारे प्रेरणा दायी ठरतो."*

"ऑस्ट्रीयातून स्थलांतर केल्यानंतर ते न्यूझिलंडला गेले. त्यांच्या समवेत त्यांना अत्यंत प्रिय असलेली कै. जोसेफिनही होती. ती त्यांची स्वीय चिटणीस म्हणूनही काम पहात असे. न्यूझिलंडमध्ये त्यांनी व्याख्याने दिली आस्ट्रीया व जर्मनीतून **हिटलरच्या** जुलमी राजवटीच्या जाचातून स्थलांतर करणाराना सहाय्य मिळावे यासाठी Refugee emergency Committee (शरणार्थी आपत्कालीन सहाय्य समिती) संस्था स्थापन करून, ती चांगल्या प्रकारे संघटित केली. इ. स. १९४९ साली लंडन स्कूल ऑफ इकोनॉमिक्स या लंडनमधील प्रख्यात शिक्षण संस्थेत त्यांना आमंत्रित करण्यात आले. तर्कशास्त्र आणि वैज्ञानिक ज्ञान (LOGIE AND SCIENTIFIC KNOWLEDGE) या विषयाचे प्राध्यापक म्हणून ते काम करणार होते. इ. स. १९७० पर्यंत ते या संस्थेत होते. **कार्ल पॉपर** यांचे सर्व आयुष्य **व्याख्याने देणे, आणि** लेखनाकरवी आपल्या विचारांचा प्रसार करणे, आपल्या संशोधन क्षेत्रात आपल्याला सुचलेल्या कल्पना मांडणे यातच गेले आहे. पण याचबरोबर मानवी इतिहासापासून मिळविले धडे आत्मसात करण्याची त्यांची क्षमता त्याबद्दल त्यांना वाटत असलेल्या आशेत कधीही खंड पडला नाही."

*"विषेश करून युरोपमधील सर्व मुलाना असे सांगण्यात येत आहे की ते एका महाभयानक जगात वावरत आहेत. सत्य परिस्थिती अशी आहे की पाश्चिमात्य देशात आजवरच्या जगात जी परिस्थिती व पर्यावरण अस्तित्वात होते व आहे, त्यातील उत्तम अशा पर्यावरणात आपण सारे पाश्चिमात्य राहत आहोत. मी हे असे म्हणतो याचे कारण आपण सारे पाश्चिमात्य श्रीमंत देशात राहत आहोत हे नसून, आपण योग्य न्याय (JUSTICE) देणाऱ्या जगात वास्तव्य करून आहोत."*

*"या विद्यमान काळी ज्या नैराश्यवादाची फॅशन आहे त्याचा एक भाग ही सारी ग्रीन (वनराई) पक्षीय मंडळी आहेत. आजवर झालेली जी तंत्रवैज्ञानिक प्रगती व इतर सामाजिक संस्थाच्या विचारातील प्रगती आहे त्या सर्वाला सोडचिठ्ठी देण्याची त्यांची इच्छा आहे. परंतु ज्या काळात कपडे धुलाई यंत्रे नव्हती त्या काळात घराघरातून ही कामे करणाऱ्या नोकरांची वा व्यक्तीची अवस्था किती दयनीय होती याची कल्पना त्यांनी कधी केली आहे का? कोणाचेही कंबरडे मोडेल असे ते काम होते. विद्यमानकाळी ओझोन वायुमुळे निर्माण झालेल्या पेचप्रसंगाबद्दल बोलले जाते. पण त्या पेचप्रसंगाची व्याप्ती किती त्याचे एकंदर स्वरूप काय आहे यावद्दल निश्चितपणे काहीही सिद्ध झालेले नाही. कदाचित असे दृष्टोपत्तीस येईलही की निसर्गाची ही एक नेहमीचीच शक्यता आहे ! पर्यावरणाला सगळ्यात मोठा व प्रचंड धोका आहे, तो लोकसंख्या विस्फोटाचा. या संबधात प्रत्यक्ष वस्तुस्थिती काय आहे याबद्दल निश्चित अशी आंकडेवारी उपलब्ध आहे. आपणास त्या संबधात काहीतरी करता येईलच."*



अनुक्रमणिका

"कॉर्ल पॉपर यांच्या घरात दूरदर्शनच्या संच नाही. त्याना तो नकोच आहे. नव्वद वर्षाचे वय झाल्याकारणाने त्यांना ऐकू येण्यातही अडचणी आहेत. ते पाश्चिमात्य गायनातील बंदिशी करीत असत. गायन ऐकण्यावद्दलही त्यांना प्रचंड आत्मियता असूनही त्यांना त्याचा आस्वाद घेता येत नाही, त्यांनीच रचलेल्या एका बंदिशीचे प्रयोग नुसतेच झाले पण ऐकू येण्यात निर्माण झालेल्या त्रूटीमुळे, त्यांना ते ऐकता आले नाहीत. श्रीमती मऊ (MEW) आणि मऊचे कुटुंबिय यांच्या समवेत ते फिरायला जातात, कधीकाळी त्यांचे गाववाले व जुने मित्र, प्रख्यात कला-इतिहासकार सर **अर्नस्ट गॉमब्रिच** (हा गावगाला देखील आहे) भेटावयास येतात त्यांचा वाढदिवस फक्त काही दिवसावर येऊन ठेवला आहे. **कार्ल पॉपर** त्या दिवसाची आतुरतेने वाट पहात आहेत. त्यांच्या मित्रांची, चहात्यांची व शार्गिदांची, व अनुयायांची संख्या शेकाड्यांच्या घरात आहे. पण या सर्वापैकी काही थोड्या वेचक (जे गुरुवर्य सामान्यपणे भेटावयास नाखुष असतात) त्यांची मुलाखत प्राप्त व्हावी यासाठी अगदी नियमितपणे विनंती करतात अशा मित्रानांच त्यांच्या वाढदिवसाचे आमंत्रण ते देणार आहेत."

"हे सारे जरी आहे, तरी या सारख्या गोष्टींनी कार्ल पॉपर यांच्या मनात फार मोठे स्थान नाही. आमची मुलाखत संपण्याची वेळ आली होती, चहा-चॉकलेट-बिस्किटे यांचाच समय नजिकच होता. निरोप घेण्यापूर्वी त्याना अधिक काहीतरी सांगायचे होते. ते म्हणाले *"या आपल्या जगात अनेक धोकादायक गोष्टी आहेत, हे तुला ठाऊकच आहे. यात सर्वात महत्त्वाची ग्‌ा्‌र कोठची असेल तर 'लोकशाही' ही समाज व्यवस्था. हा विचार ही संस्था वा व्यवस्था याबद्दल नागरीकांचा असलेला गैरसमज, लोकशाही म्हणजे आपणास जे आवडते त्याप्रमाणे तंतोतंत वागण्यास प्रत्येक नागरीकास यावयास हवे, ही कल्पनाच भयावह आहे. कोठचीही जबाबदारी स्वीकारली नाही, तर मग "स्वातंत्र्य" असणारच नाही. समाजात असलेली हिंसा ही कमी कशी होईल याबद्दल निश्चिती करणे हेच सभ्यतेचे प्रमुख उद्दिष्ट असावयास हवे. हे जोवर स्पष्टपणे नमूद केले जात नाही, तोवर आपण सारेच धोकादायक परिस्थितीत वावरत आहोत." कार्ल पॉपर यांना भविष्य वर्तविणे आवडत नाही. त्यांचे हे विधान आपणास एक प्रकारचे भविष्यच वाटेल. पण त्याबद्दल कार्ल पॉपर हे क्षमा याचना खासच करणार नाहीत."*

**(२) वैज्ञानिक समीकरण सुंदर असलेच पाहिजे**

शिकावयाचे ज्यांना आहे, त्यांच्यासाठी विज्ञान ज्यांच्याकडे ज्ञान आहे त्यांच्यासाठी काव्य

(Science is for those who learn, poerty for those who know)

Jpseph Roux in Meditation o a Parish Priest (1886)

फिलीप लारकीन (Philip Larkin) हे अलिकडच्या काळातील एक नामवंत ब्रिटिश कवी व्यवसायाने ग्रंथपाल आजन्म अविवाहित इ. स. १९७४ च्या मे महिन्यात त्यांनी इंग्लंडमधील आकाशवाणीवर मुलाखत दिला. High Windows (उंच खिडक्या) या नावाचा त्यांचा कवितासंग्रह नुकताच प्रसिद्ध झाला होता. त्याचा पुरस्कार करण्याच्या उद्देशाने त्यांनी ही मुलाखत दिली होती. आपल्या कवितासंग्रहाच्या प्रती अधिक खपाव्यात हा त्यामागे हेतू होता.



अनुक्रमणिका

या मुलाखतीत त्यांनी निर्देश केला की "चांगली कविता ही कांद्यासारखी असते. (A good poem is a like a good onion) बाहेरचा भाग चांगलाच सुखदायक असा गुळगुळीत आणि तितकाच बुचकळ्यात टाकणारा गूढ. (Intriguing) एकामागोमाग असलेल्या पाकळ्या आपण उलगडत गेलो की, मग या दोन्ही गोष्टींचा अर्थ उघड होतो पण त्यावेळी या दोन्ही गोष्टी अधिकच गुळगुळीत आणि गूढ होत जातात. अत्यंत आदर्श ठरेल अशी काही (कविता) रचणे हे त्यांचे उद्दिष्ट होते.

विज्ञान या ज्ञानक्षेत्रातील महान समीकरणात एक प्रत्यक्ष घाट (Form) या स्वरूपात विज्ञानातले भाष्य हे त्यात अंतर्भूत असते. विज्ञानात अनेक महान समीकरणे (Equations) आहेत. त्यांचे एकामागून एक असे येणारे थर हेही उलगडता येतात. परंतु हे थर उलगडल्याने त्याकरवी 'अर्थाचे' प्रतिनिधित्व होत नाही. ते थर त्या समीकणाच्या परिणामांचे व त्यांच्या प्रकृतीचे प्रतिनिधित्व करतात.

महान साहित्य समीक्षकांना आणि अनेक नामवंत कवीना भगिरथ प्रयत्न करूनही वादातीत ठरेल अशी काव्याची व्याख्या करता आलेली नाही. ही वस्तुस्थिती आहे. काव्याच्या बाबतीतच नाही; तर सर्वच ललित साहित्यालाही हे विधान लागू पडते. लेडी चाटर्लीज लव्ह या कादंबरीच्या निमित्ताने इंग्लंडमध्ये झालेल्या खटल्यात साक्ष देण्यासाठी आलेल्या सर्वच नामवंत साहित्यिकांना 'चांगले साहित्य कशास म्हणावे याची व्याख्या करता आली नाही, त्या मुद्यांबावत एकमत झाले नाही हा इतिहास आहे. गणितज्ज्ञांना 'समीकरण' या शब्दाची व्याख्या करावयास सांगितले, तर त्यांना न सुटतील अशा प्रश्नांना सामोरे जावे लागत नाही. एका परिपूर्ण समतोलाचा आविष्कार म्हणजे समीकरण. तीच त्याची मूलभूत अशी प्रकृती. शुद्ध गणित या ज्ञानशाखेला विज्ञानाशी काहीही कर्तव्य नसते. याचा अर्थ असा नव्हे की शुद्ध गणितातील सिद्ध झालेल्या प्रमेयांचा वापर विज्ञान करीत नाही, अथवा शुद्ध गणिताचा विकास बाहेरच्या जगात जे काही घडते आहे त्यापासून अलिप्त असतो, वा त्या समाजाची तावडतोबीची गरज भागवत नाही. हे जरी सारे खरे असले तरी सरतेशेवटी गणिती समीकरण हे अमूर्त विधान आहे. वास्तव जगातील तत्कालीन वास्तवाशी या समीकरणाचे काहीही देणे घेणे नसते. म्हणून य = क्ष + १ अशा प्रकाराचे समीकरण गणितज्ज्ञ पहातो, त्यावेळी त्याच्या मनात काय येत असेल? एकतर य आणि क्ष ही सर्वस्वी अमूर्त प्रतिके (Symbols) आहेत. प्रत्यक्षात अस्तित्वात असलेल्या कोणत्याही गोष्टीची वा वस्तूची ती प्रतिके नाहीत. निसर्गाचा व्यवहार कसा चालतो हे समजावून घेण्याशी गणितातील समीकरणाना काहीही कर्तव्य नसते. अशा स्वरूपात विश्वाची कल्पना परिपूर्ण करणे शक्य आहे. तसे असले तरी, विलोभनीय गोष्ट ही आहे की, या समीकरणाना निसर्गाशी जरूर कर्तव्य असते. वैज्ञानिकांनी बसविलेले वैज्ञानिक नियम, वैज्ञानिक नेहमीचा परिपाठ म्हणून एखाद्या समीकरणाच्या स्वरूपात सादर करतात, या समीकरणात प्रतिके असतात. प्रयोग करणाऱ्याला मोजमाप घेता यावे, अशा पुंजक्यांची



अनुक्रमणिका

(Quantum) ती प्रतिके असतात. वैज्ञानिकाच्या शस्त्रागारात ही गणिती समीकरणे अत्यंत ताकदीची शस्त्रे झाली आहेत. याठिकाणी एक मुद्दा आवर्जून लक्षात घेतला पाहिजे. प्रतिके कसल्याना कसल्या गोष्टीचे प्रतिनिधित्व नेहमीच करतात. या प्रतिनिधित्वाच्या मदतीने वैज्ञानिकांना समीकरणांना अत्यंत सामर्थ्यशाली हत्यार बनविण्याची किमया करता आली.

$E = mc^2$ (उर्जा = वस्तुजाल x पोकळीतून जाणारा प्रकाशाचा वेग[२]) हे आजवरच्या सर्व वैज्ञानिक समीकरणातील अत्यंत मशहूर असे समीकरण. जगतात विख्यात असलेले महान शास्त्रज्ञ आल्बर्ट आईनस्टाईन यांनी इ. स. १९०५ साली या समीकरणाचे सूचन केले. या समीकरणामध्ये दोन वेगवेगळ्या क्षेत्रातील गोष्टींची अमूर्त-प्रतिकांत असलेली समानता नमूद केलेली आहे. या समीकरणात अंतर्भूत असलेल्या गोष्टी वरवर पहाता एकमेकाशी काहीही संबंध नाही अशा प्रकारे भिन्न आहेत असे भासते. E = mc2 या समीकरणाचे हे थोडेसे विस्ताराने केलेले विवरण. या समीकरणात पुढील गोष्टीवर ठोसपणे भर दिलेला आहे. (E) ऊर्जा, (m) वस्तुमान आणि (c) पोकळीतून प्रवास करणाऱ्या प्रकाशाच्या वेगाने स्वत:लाच गुणले तर त्यातून निर्माण होणारा वेग) या समीकरणाच्याकरवी प्रख्यात शास्त्रज्ञ आईनस्टाईन असे भाकीत केले की, तुमच्या माझ्यासारख्या वस्तुजालाला (mass) पोकळीतून प्रवास करणाऱ्या प्रकाशाने स्वत:ला एकदा गुणले असता अशा वेगाने प्रवास केला, तर त्याचा परिणाम $E = mc^2$ या समीकरणरूपी गणितातून प्राप्त झालेल्या उत्तराशी तंतोतंत जुळतो. या परिच्छेदाच्या सुरुवातीला असे विधान केले आहे की, प्रत्येक समीकरणात समतोल असतो. तोच न्याय $E = mc^2$ या समीकरणाला लागू आहे. वजन काट्यासारखेच हे आहे. वजन काटा दोन भिन्न गोष्टीतील समानता – व्यक्ती तिची प्रकृती व तिचे वस्तुजाल – समानता दाखवून देतो. बहुतेक समीकरणे अन्य, भिन्न पुंजक्यातील समानता प्रदर्शित करते. उदा. $E = mc^2$ या समीकरणात ऊर्जेबाबतचा समतोल दाखवून देण्यात आला आहे. या विज्ञान जगतातील अत्यंत मशहूर अशा समीकरणाचा उगम आणि त्याच्या भविष्यकाळातील वाटचालीत प्रख्यात शास्त्रज्ञ आईनस्टाईन यांनी अत्यंत विश्वासपूर्वक अंदाजातून झालेली आहे. अनेक दशके उलटल्यानंतर, हे आईनस्टाईन यांचे समीकरण वैज्ञानिक ज्ञानाच्या भांडवली साठ्याचा (Corpus) एक अत्यंत आवश्यक भाग बनले आहे. पण तेही या समीकरणाच्या अनुषंगाने व अनुबोधाने प्रयोग करणारांनी असे जेव्हा सिद्ध केले की, या समीकरणाला शिरोधार्य मानून केलेली भाकिते, ही निसर्गात खरोखरच आढळून येतात व तसे प्रयोगाअंती दाखवून दिल्यानंतरची विसाव्या शतकात $E = mc^2$ या समीकरणाला देवता (Icon) स्वरूप प्राप्त झाले आहे. दूरदर्शनवरील प्रश्न मंजुषेत भाग घेणाऱ्या प्रत्येकाला या समीकरणाबद्दल ज्ञान असावे अशी अपेक्षा असते.

दुसऱ्या अनेक महान वैज्ञानिक समीकरणासारखेच $E = mc^2$ हे समीकरण अनेक बाबतीत एक महान काव्य आहे. एखाद्या अत्युत्तम सुनिताचे जसे असते, तसेच या समीकरणाचे आहे. सुनितात एखादा शब्द बदलला, एखादे विरामचिन्ह बदलले तर मग ते सुनित पार बिघडून

जाते. $E = mc^2$ सारख्या महान वैज्ञानिक समीकरणातील एखादा बारीकसा तपशीलही बदलता कामा नये. तसे केले तर ते समीकरण निरुपयोगी ठरते. उदा. $E = mc^2$ ऐवजी $E = 3mc^2$ असे समीकरण मांडले. फक्त एका आकड्याचा फरक. या 'नव्या' समीकरणाला मग निसर्गाबरोबर काहीही कर्तव्य रहात नाही.

महाग वैज्ञानिक समीकरणे आणि उत्तम काव्य हे दोघेही, एका विलक्षण अशा सामर्थ्यात सहभागी असतात. उत्तम काव्य कमालीचे आटोपशीर आणि भाषेच्या बाबतीत प्रचंडपणे भारलेल्या स्वरूपाचे असते. विज्ञानातील महान समीकरणाचे ही तसेच आहे. ही समीकरणे आपल्या अवतीभोवतीच्या वास्तवाच्या एका अंगाचे वर्णन करतात. पण हे करताना ती समीकरणे त्या वास्तवाची अत्यंत आटोपशीरपणे जाण आहे हे आविष्कृत करतात. उदा. $E = mc^2$ हे वैज्ञानिक समीकरण हे अत्यंत शक्तिशाली समीकरण आहे. या समीकरणात फारच थोड्या प्रतिकांचा (Symbols) वापर करण्यात आलेला आहे. असे असले तरी त्यात इतके ज्ञान ठासून भरलेले आहे की, प्रत्येक ऊर्जा परिवर्तनाच्या बाबतीत या समीकरणाचा उपयोग करण्यात येतो. उदा. पृथ्वीवरील प्रत्येक सजीव प्राण्यांच्या शरीरातील पेशीपासून तो कमालीच्या दूर अंतरावर असलेल्या विश्वातील (Cosmic) स्फोटांना ते समीकरण लागू पडते. सर्वात महत्त्वाचा व लक्षणीय मुद्दा हा आहे की, काळाच्या आरंभापासून, तो विद्यमान काळापर्यंत तरी ते समीकरण चुकीचे ठरलेले नाही.

याचप्रमाणे विज्ञानातील महान समीकरणांचा सखोलपणे तपशीलात जाऊन अभ्यास केला तर वैज्ञानिकांना लाभच होतो. आरंभीला अशा वैज्ञानिकांच्या ज्या गोष्टी लक्षात आलेल्या नसतात. त्या समीकरणांचा सखोल अभ्यास केल्यानंतर या वैज्ञानिकाच्या दृष्टिपथात हळूहळू येऊ लागतात. अत्युत्तम काव्यालाही हा नियम लागू आहे. अशा काव्याचे वाचन वारंवार केले तर त्यामुळे नव्या भावना व कल्पनातील दुव्यांचे नवे अनुबंध, हे सारे चांगलेच ढवळले जातात. त्यांना चालना मिळते. महान वैज्ञानिक समीकरणे ही स्फूर्ती देण्याच्या बाबतीत चांगलीच समृद्ध आहेत. भाष्याच्या संदर्भातही हा नियम अगदी यथार्थ आहे. एखादी कल्पना कवीच्या मनात येऊन तयार होऊन बसली आहे, तिला उत्तम अशा काव्याच्या वाचनाने स्फूर्ती व चालना मिळते. शेक्सपिअरच्या एका सुनितामध्ये 'Shall I compare thee to a summer day' (सुनीत क्रमांक १८) अशी ओळ आहे. शेक्सपिअरच्या असंख्य वाचकांना या ओळीत अनेक वेगवेगळ्या अर्थाचे भावन झाले. खुद्द शेक्सपिअरलाही ते झाले नसावे. महान शास्त्रज्ञ आईनस्टाईन यांची गोष्ट यापेक्षा वेगळी नाही. त्यांनी मांडलेल्या सापेक्षतावादाच्या स्पष्टीकरणाचे इतके अगणित परिणाम होतील असे भाकित त्यांनाही वर्तविता आले नसते.

या विवेचनातून असे सूचन करण्याचा अजिबात प्रयत्न नाही की, काव्य आणि वैज्ञानिक समीकरणे ही सारखीच आहेत. प्रत्येक कविता ही एका विशिष्ट भाषेत प्रथम लिहिली जाते. पण ती भाषांतरित झाली की, त्या कवितेत मुळात जी जादू होती ती हरवते. प्रख्यात झेक लेखक

मिलान कुंदेरा यांचे म्हणणे असे आहे की, **भाषांतर हे भाषांतरच नाही. ती नवनिर्मिती आहे. म्हणजे त्या कवितेचे पुनर्लेखन करून 'नवी कविता' निर्माण करणारा नवी जादू कदाचित निर्माण करीलही.** वैज्ञानिक समीकरणांच्या बाबतीत परिस्थिती पराकोटीची वेगळी आहे. गणित या ज्ञानशाखेची तशीच विज्ञानाची वैश्विक अशी भाषा वा परिभाषा आहे. त्या भाषेतच गणित वा वैज्ञानिक समीकरणे आविष्कृत केली जातात. उदा. $E = mc^2$ हे समीकरण इंग्लिश, फ्रेंच, जर्मन, रशियन आणि इतकेच नव्हे तर मराठीतही मुळातले जे समीकरण असते तसेच ते राहते. त्यात बारीकसा फरकही होत नाही. परंतु शब्द आणि विचार याकरवी आदानप्रदान होऊन त्यातून अनेक अर्थ निर्माण करण्याचा प्रयत्न कवी करतात. (जे न देखे रवी ते देखे कवी ! मुंगी उडाली आकाशी । तिने गिळिले सूर्याशी (मुक्ताई) तेणे कारणे मी बोलीन। बोली अरूपाचे रूप दावीन । अंतिंद्रिय परि भोगवीन इंद्रियाकरवी ।। ज्ञानेश्वर (६. ३६) ) वैज्ञानिकांचे ते उद्दिष्ट कधीच नसते. आपल्या समीकरणाकरवी ते एकच एक तर्कशुद्ध व नेमका अर्थ प्रक्षेपित करणे हेच त्यांचे उद्दिष्ट असते.

महान वैज्ञानिक समीकरणे सामान्यपणे आपणास कोणत्या व कशा प्रकारचा 'अर्थ' सादर करतात? त्यांना सर्व साधारणपणे निसर्गाचे नियम असे मानण्यात येते. नोबेल पारितोषिक विजेते रिचर्ड फेनमान (Richard Feynman) ही एक अत्यंत विलोभनीय अशी व्यक्ती. भौतिक शास्त्रातील अत्यंत गहन समीकरणे फारच सोप्या भाषेत सादर करण्यासाठी प्रसिद्ध. इतरही अनेक गोष्टी करता ते मशहूर आहेत. पण तो मुद्दा वेगळा. वैज्ञानिक समीकरणे आणि निसर्ग नियम यांच्यातील परस्परसंबंध एक उदाहरण देऊन जनतेपर्यंत या महान शास्त्रज्ञाने पोहोचविण्यास सहाय्य केले होते. त्यानी असे सांगितले की, कल्पना करा बुद्धिबळाचा डाव, दोन बुद्धिबळपटू खेळत आहेत हा सामना पाहाण्यासाठी अनेक प्रेक्षक हजर असणारच अशीही कल्पना करा, या प्रेक्षकाना बुद्धिबळ या खेळातील नियमांचे ज्ञान नाही. त्यांना त्यांचे शिक्षणही कधी मिळालेले नसते. अशा परिस्थितीत ते दोन बुद्धिबळपटू, पटावरची मोहरी व प्यादी यांची हालचाल कशी करतात त्यांचे निरीक्षण करून त्या खेळाचे नियम काय असतील याची कल्पना त्या अज्ञानी प्रेक्षकांना करता येईल. यापुढे जाऊन अशीही कल्पना करा नेहमीचा बुद्धिबळपट चांगलाच विस्तारित केला गेला आहे. अशा परिस्थितीत या सामान्यांचे जे अनपढ निरीक्षक असतील त्याना मग अत्यंत काळजीपूर्वक निरीक्षण करणे भाग पडेल असे करून या अनपढ प्रेक्षकांनी बुद्धिबळपटू ज्या खेळी करतात त्यांच्यातील आकृतिबंधाच्या तपासात रहावे लागेल. त्याचप्रमाणे आपण ज्या खेळाचे नियम आपलेसे करण्याच्या प्रयत्नात आहोत, त्यांच्या शोधातही अत्यंत जागरुकपणे रहावे लागेल. वैज्ञानिकासमोर जो जटील प्रश्न असतो, त्याचे सारतत्त्व नोबेल पारितोषिक विजेते रिचर्ड फेनमान यांनी सामान्य वाचकांपर्यंत त्याला समजेल अशा भाषेत अतिशय सुलभपणे पोहोचविले आहे. वैज्ञानिक सखोलपणे तपशिलात जाऊन आणि कमालीच्या बारकाईने निसर्गाचे निरीक्षण करतात — थोडक्यात बुद्धीबळाच्या पटावरील

मोहऱ्यांची व प्याद्यांच्या हालचाली ते सामानवीर कशा करतात यांचे निरीक्षण आणि या निरीक्षणांच्याकरवी त्या सर्व हालचाली कोणत्या नियमानुसार होत असाव्यात यांच्यांकडे दृष्टीक्षेप टाकण्याचा प्रयत्न ते अनपढ प्रेक्षक करीत असतात.

**एक)** निसर्गाचे बहुतेक मूलभूत नियम हे इतक्या सोईस्करपणे समीकरणांच्या स्वरूपात का व्यक्त करता येतात वा लिहिता येतात? **दोन)** या कोड्याने विचारवंताच्या फलटणीचा नेहमीच पराभव केलेला आहे. **तीन)** प्रत्यक्षपणे ज्यांचा काही संबंध नाही असे समीकरणाच्या डाव्या व उजव्या बाजूला असलेला पुंज हे अगदीच तंतोतंत बरोबरीचे आहेत अशी वज्रलेप आज्ञा (Aboslute Imperative) अशा स्वरूपात हे इतके मूलभूत असे निसर्ग नियम का बरे व्यक्त केले जातात. **चार)** शिवाय मूलभूत असे निसर्ग नियम मुळातच का अस्तित्वात असतात? हे देखील स्पष्ट झालेले नाही. परमेश्वर हाच गणिती आहे असे चाचरत दिले जाणारे जनताप्रिय असे स्पष्टीकरण आहे. परंतु ही कल्पना मुळात उपस्थित केलेल्या प्रश्नांच्या जागी जे प्रतिपादन कधीही सिद्ध करता येणार नाही, त्याची प्राणप्रतिष्ठा करतात. एवंच हा मार्ग स्पष्टीकरण मिळविण्याच्या दृष्टीने अत्यंत निरुपयोगी आहे. असे असले तरी विज्ञानातील समीकरणांच्या कार्यक्षमतेबद्दल, ती ईश्वरी संकल्पचित्रे आहेत, हे स्पष्टीकरण गेली अनेक शतके फारच जनताप्रिय आहे. याचे एक नामवंत उदाहरण– अमेरिकेत व्यवसायाने खगोलशास्त्रज्ञ म्हणून काम करणाऱ्या पहिल्या महिला खगोल शास्त्रज्ञ मारिया मिचेल (Maria Mitchell 1918-1889). यांच्या स्मरणार्थ न्यूयॉर्क शहरातील ब्राँक्स हॉल ऑफ फेम (ब्राँक्स नावाच नामवंताचे व गुणवतांचे दालन) या ठिकाणी त्यांचा अर्धपुतळा आहे. त्याच्या तळपट्टीवर खालील वाक्य खोदण्यात आलेले आहे. ('Every Formula which expresses a law of nature is a hymn of praise of God') **निसर्गाचा नियमव्यक्त करणारे प्रत्येक सूत्र हे ईश्वराच्या** स्तुतिस्तवनातील कडवे आहे. हे शब्द खुद्द मिचेल बाईंचे इ. स. १८६६ सालचे.

वैज्ञानिक समीकरणांचा उगम कसा झाला हा प्रश्न जटिल आहेच. पण त्या प्रश्नापेक्षाही अधिक जटील व वादग्रस्त असा आणखी एक प्रश्न आहे. इंग्रजीत दोन क्रियापदे आहेत. एक To invent आणि दुसरे To discover. यातील पहिल्या क्रियापदात असे सूचन आहे की, एखादी कल्पिलेली गोष्ट अस्तित्वात नसते. मनुष्य आपल्या कल्पनाशक्तीच्या जोरावर ती अस्तित्वात आणतो. म्हणून या कल्पनेची निर्मिती To invent होते. To Discover यात असे सूचन आहे की, एखादी कल्पना वा गोष्ट अस्तित्वात असते. पण ती कोणाला दिसत नाही वा भावत नाही. मानव आपल्या कल्पकतेच्या आणि प्रयत्नाच्या मदतीने ती अनावृत्त करतो. त्या कल्पनेचा वा गोष्टीचा धांडोळा घेतो. एवंच वैज्ञानिक समीकरण हे कल्पनेच्या साहाय्याने लावलेला शोध आहे की, अगोदरच जे अस्तित्वात होते ते अनावृत केले गेले आहे? हा प्रश्न वैज्ञानिक समीकरणांचा उगम कसा झाला यापेक्षा नक्कीच अधिक जटिल आहे. सुब्रम्हण्यम चंद्रशेखर हे प्रख्यात Astro-Physicist (खगोल-पदार्थशास्त्र वैज्ञानिक) खगोल भौतिक

शास्त्रज्ञ. यांचा जन्म भारतात झाला. पहिले शिक्षणही येथेच झाले. पण आपले बहुतेक सर्व संशोधन प्रामुख्याने अमेरिकेतल्या प्रयोग शाळातूनच केले. बहुतेक सर्व महान वैज्ञानिक सिद्धांत रचणाऱ्यांच्या वतीने चंद्रशेखर पुढील विधान करीत असावेत. He remarked that when he found some new fact or in sight it appeared to him to be something "that had always been there and that I chanced to pick up" (मला काही नवा पुरावा वा घटीत आढळते. नवी अंतर्दृष्टी प्राप्त होते. या सर्वाचा अर्थ माझ्या दृष्टीने एकच आहे. या सर्व गोष्टी त्या तिथे अस्तित्वात होत्या. माझ्या सुदैवाने ती उचलून घेण्याचे भाग्य मला लाभले) या दृष्टिकोनानुसार या विश्वाचा कारभार कसा चालला आहे, त्याच्या पाठीमागे जी समीकरणे आहेत ती सर्व त्या 'तिथे' आहेत. मानवी अस्तित्वापासून ती स्वतंत्र आहेत. पण मानवाच्या दृष्टिआड असलेल्या सर्व नियमांना अनावृत्त करण्याचा प्रयत्न हे शास्त्रज्ञ करीत असतात. हे सारे जरी मान्य केले तरी मुळ मुद्दा राहतोच त्याचे उत्तर या स्पष्टीकरणात नाही. या निसर्ग नियमांचा उगम कसा झाला? हे अजूनही सर्वस्वी परिपूर्ण असे राहिलेले गूढ आहे

इतिहासकाळात लाखो वैज्ञानिक संशोधक होऊन गेले आहेत. त्यांच्यापैकी फारच थोड्याशा नावावर एखादे महत्त्वाचे समीकरण असेल. आल्बर्ट आईनस्टाईन आणि त्यांच्या इतकेच बुद्धिवान इंग्लिश सैद्धांतिक भौतिक शास्त्रज्ञ **पॉल डिरॅक** हे दोघेही होऊन गेलेल्या वैज्ञानिक संशोधकातील अत्यंत बुद्धिवान शास्त्रज्ञ. मूलभूत स्वरूपाची समीकरणे अनावृत्त करून, त्यांचा शोध लावणे हे या दोन वैज्ञानिकांचे वैशिष्ट होते. यापैकी एकानेही शाळेत वा महाविद्यालयात गणित या विषयाचे शिक्षण घेतलेले नव्हते. **पॉल डिरॅक** यांनी विद्युत अभियंता होण्यासाठी शिक्षण घेतले होते. ते पुढे एकदा असेही म्हणाले की, मी गणित शास्त्रातील काटेकोरे विचार करण्यासारखा नव्हतो. अभियंत्याप्रमाणे कामचलाऊ उत्तरांनी माझे समाधान होत असे म्हणून तर मी समीकरणे मांडली. ते काहीही असो. असे होते तरी नवीन समीकरणे बसविणे आणि लिहिणे यात ते दोघेही उन्मेखून लक्षात घ्यावे असे बुद्धिवान शास्त्रज्ञ ठरले आहेत. त्यांच्या नावावर असलेली समीकरणेही अत्यंत श्रेष्ठ दर्ज्याच्या काव्याइतकीच नवनिर्मितीला प्रोत्साहित करणारी होती. भौतिक शास्त्रातील मूलभूत समीकरणे ही सुंदर असलीच पाहिजेत या श्रद्धेने या दोन्हीही वैज्ञानिकांना भारून टाकले होते.

यानंतरचे माझे विधान आहे ते कदाचित विलक्षण व जगावेगळे आहे असे अनेकांना वाटले. 'सुंदर' या संकल्पनेबाबत ज्या व्यक्तिनिष्ठ कल्पनांचे स्वागत आदबशीर व शालीन अशा बौद्धिक समाज गटात होत नाही, तसेच अत्यंत उच्चभ्रू अशा विद्यापीठीय समीक्षेत ज्या प्रकारच्या व्यक्तिनिष्ठ कल्पनांना अजिबात स्थान नसते. असे जरी असले आणि जो कोणी अत्यंत पढीक असा समीक्षक असला तरी एखादे निरागस हसरे बालक, अगदी नयन मनोहर व आश्चर्यचकित करील अशी डोंगरराजी अगर विलोभनीय असे आर्किड फूल पाहिल्यानंतर आपल्या सर्वांच्या ओठाद्वारे कोणता शब्द बाहेर पडतो? किती सुंदर ! एखादे वैज्ञानिक

समीकरण सुंदर आहे असे सांगणे याचा नेमका अर्थ काय? त्याचा अर्थ साधा व सरळ आहे. आपण ज्या अनेक इतर गोष्टींचे वर्णन सुंदर असे करतो तशाच प्रकारच्या मनोभावाचा उद्‌भव सुंदर वैज्ञानिक समीकरण करते, हाच त्याचा अर्थ आहे. सुंदर वैज्ञानिक समीकरणे अनेक आहेत. कोणत्याही वैज्ञानिक समीकरणात, ते केवळ आकर्षक आहे एवढा एकच गुण नसतो. त्यात दुसरेही अनेक गुण समाविष्ट आहेत. सुंदर वैज्ञानिक समीकरण हे एखाद्या महान कलाकृती-सारखे आहे. त्यात विविधता, साधेपणा, अपरिहार्यता आणि एक प्राथमिक स्वरूपाची शक्ती यासारखे अनेक गुण अंतर्भूत असतात. प्रख्यात हक्कप्रत्ययवादी चित्रकार सेझान यांचे एक महान तैलचित्र Appels and Pears (सफरचंदे आणि पेअर) हे आवर्जून पहावे आणि त्यासंबंधी विचार करावा. इतरही यासारखी अनेक उदाहरणे पेश करता येतील. मी स्वत: अशा अनेक वैज्ञानिक समीकरणांना अनेक वेळा सामोरा गेलो आहे. त्यातून मला अनेक प्रकारचे अनुभव प्राप्त झाले. पण त्या वैज्ञानिक समीकरणांच्या सान्निध्यात प्रथमच आल्यानंतर मला अनेक गोष्टींची जाण आली. संकल्पनेच्या बाबतीत युगानयुगे संस्मरणीय ठरेल. मूलभूतपणे पराकोटीची शुद्ध, कोणत्याही प्रकारच्या कुरूप गोष्टीपासून अलिप्त असलेली आणि अत्यंत काळजीपूर्वक रचना करून सादर केलेली ती वैज्ञानिक समीकरणे यांची रचना अशी काही असते की, त्या संकल्पनेत काना-मात्रेचाही बदल केला तर त्या संकल्पनेचे सामर्थ्य कमीच होणार नव्हे वेळप्रसंगी नाहीसे होणार.

एखाद्या चांगल्या वैज्ञानिक समीकरणाचा आणखी एक गुण असतो. त्यात उपयोगी ठरेल असे सौंदर्य असते. हे वैज्ञानिक समीकरण ज्यांच्याशी संलग्न आहे, त्या संदर्भात केलेल्या सर्व प्रयोगांच्या निष्कर्षाशी ते एकीकडे तंतोतंत मिळते-जुळते ठरलेच पाहिजेच. याशिवाय तत्पूर्वी कोणीही जी भाकिते केली नव्हती तशी भाकिते त्या वैज्ञानिक समीकरणाला वर्तविता आली पाहिजेत. वैज्ञानिक समीकरणांचे हे जे अंग आहे, ते अत्यंत सखोलपणे तपशिलात जाऊन तयार केलेल एखादे यंत्र असते त्यातील सौंदर्यासारखे आहे.

आईनस्टाईन यांना सौंदर्याची संकल्पना खास करून महत्त्वाची वाटे. विसाव्या शतकातील ते अत्यंत शुद्ध आणि परिपूर्ण असे सौंदर्यापासक होते. त्यांचा मोठा मुलगा हॅन्स (Hans) याने सांगितल्याप्रमाणे "आपणास वैज्ञानिकाची प्रकृती नेहमीच जशी वाटते त्याच्यापेक्षा आईन-स्टाईन हे अधिक कलावंत होते." उदा. आईनस्टाईन एखाद्या चांगल्या सिद्धांताचा गौरव पुढील शब्दात करीत. एखादा सिद्धांत हा नुसता अचूक अगर तंतोतंत जुळणारा असून भागत नाही. तसाच तो सुंदर असावयास हवा" आईनस्टाईन यांनी याहीपुढे जाऊन असे सांगितले की "भौतिक शास्त्रातील जे सिद्धांत सुंदर असतील **तेवढेच** सिद्धांत मान्य करण्यास व स्वीकारण्यास आम्ही राजी आहोत" या विधानात अर्थात असे गृहित धरण्यात आले आहे की, एखादा चांगला सिद्धांत (सुंदर सिद्धांत) प्रयोगाद्वारे प्राप्त झालेल्या निष्कर्षाशी **तंतोतंत, मिळताजुळता असेल.** विसाव्या शतकातील आईनस्टाईन यांच्या जवळपास पोहोचणारे

वैज्ञानिक पॉल डिरॅक. आईनस्टाईनपेक्षाही त्यांनी सुंदरता संकल्पनेवर फार ठोसपणे भर दिला होता. मुलभूत भौतिक शास्त्रातील सिद्धांताची गुणात्मकता, कोणत्या पातळीवरची आहे हे ठरविण्यासाठी मापदंड म्हणून **''गणिती-सौंदर्य''** या संकल्पनेवर आपली श्रद्धा आहे असे ते वारंवार बजावीत. त्याही पुढे जाऊन त्यांनी असे सांगितले की, 'गणिती सौंदर्य' हा त्यांच्या दृष्टीने **'एक प्रकारचा धर्मच'.** ते आपल्या स्वत:च्या आयुष्याच्या व कारकीर्दीच्या अखेरच्या चरणात जगात सर्वत्र प्रवास करून, व्याख्याने देण्यात आपला बराचसा वेळ खर्च करीत. ही व्याख्याने त्यांच्या नावावर जी वैज्ञानिक समीकरणे होती ती त्यांना कशी सुचली वा त्यांचे उगमस्थान यांचे प्रामुख्याने वर्णन करणारी. या व्याख्यानात आपण सौंदर्याचा पाठपुरावा कसा केला याचा मुद्यावर त्यांनी सातत्याने भर दिल्याचे आढळते. 'सौंदर्य' हा त्यांच्या आयुष्यातील ध्रुवतारा आणि स्फूर्तिस्थान होते. इ. स. १९५६ मध्ये मॉस्को विद्यापीठात एक परिसंवादात ते सहभागी झाले होते. त्यावेळी **त्यांना सांगण्यात आले की 'भौतिक शास्त्राबद्दलचे आपले तत्त्वज्ञान त्यांनी साररूपाने सांगावे'.** पॉल डिरॅक जागेवरून लगेच उठले. फळ्याजवळ गेले आणि त्यानी भल्या मोठ्या अक्षरात लिहिले. **''भौतिकशास्त्रातील सिद्धांतापाशी गणिती सौंदर्य असावयास हवे'.''** पॉल डिरॅक यांनी ज्या फळ्यावर ही अक्षरे लिहिली तो फळा अजूनही काळजीपूर्वक जतन करून ठेवलेला आहे; आणि तो मॉस्को विद्यापीठ भेटीला येणाऱ्या विद्वतजनास ते विद्यापीठ मोठ्या दिमाखाने दाखविते.

आईनस्टाईन आणि त्यांच्या जवळपास पोहोचणारे पॉल डिरॅक यांचे हे तत्त्वज्ञान त्यांनाच उपयोगी. त्यांच्या इतके जे महाभाग प्रज्ञावान नाहीत अशा वैज्ञानिकांचे काय? या महाभागांना अर्थातच या पातळीवरची सौंदर्योपासना ही अत्यंत कठीणच आहे; आणि हे ध्येयवाक्य त्यांच्या दृष्टीने उत्पादक नाही. बहुतेक सर्व वैज्ञानिकांच्या दृष्टीने, एक अत्यंत गद्य विचार त्यांना प्रस्तुत वाटतो. सौंदर्य या संकल्पनेशी त्याना देणे-घेणे फारसे नसते; आणि त्यांच्या दैनंदिन कामात ती संकल्पना मार्गदर्शक होण्याच्या दृष्टीने अजिबात उपयुक्त नसते. हे वैज्ञानिक जी वैज्ञानिक समीकरणे वापरताच त्यांना सौंदर्याचे अस्तर असते हे खरे आहे. तसेच या वैज्ञानिक समीकरणाकरवी जर अचूक उत्तरे वा निष्कर्ष प्राप्त होतात तो निष्कर्ष अधिक करून कुरूप असण्याऐवजी सुंदर असण्याचीही शक्यता अधिक. काही वेळा सौंदर्य ही संकल्पना व सौंदर्योपासना ही चुकीच्या मार्गावर घेऊन जाणारी ठरते. अनेक वैज्ञानिक सिद्धांत एकेकाळी सुंदर वाटले होते. कालांतराने ते चुकीचे ठरले. निसर्गाच्या मनात नव्हते तेच ते सिद्धांत व्यक्त करीत होते. विज्ञानाच्या इतिहासात या प्रकारच्या वैज्ञानिक सिद्धांताच्या प्रेतांचा खच पडलेला आहे असे आढळून येईल. एखाद्या नव्या सिद्धांताविषयी वैज्ञानिक जेव्हा संशोधन करतात. तेव्हा त्या सिद्धांताची यथार्थता (Validity) ठरविणे हे प्रथम क्रमांकाचे. हा एकच मापदंड वापरतात. हा सिद्धांत प्रत्यक्ष प्रयोग केल्यानंतर त्यापासून प्राप्त झालेल्या निष्कर्षाशी मिळता-जुळता आहे की नाही हाच तो प्रथम क्रमांकाचा मापदंड.



अनुक्रमणिका

प्रत्यक्ष प्रयोग आणि गणितावर आधारलेले वैज्ञानिक सिद्धांत यांच्या मनोमन मिलाफातून विज्ञान प्रगत होते ही कल्पना तशी सापेक्षपणे नवीनच आहे; या कल्पनेचा उगम ३५० वर्षापूर्वी इटालीतील फ्लॉरेन्स या शहरात झाला. एकंदर मानवी इतिहासातील सर्व कालखंड विचारात घेता ही घटना अगदी काल घडल्यासारखी आहे. या कल्पनेचा जनक गॅलिलिओ नावाचा वैज्ञानिक. तसे बघायला गेले तर हा पहिला-वहिला आधुनिक ठरेल असा वैज्ञानिक. या वैज्ञानिकाने हे जाणले की, एका अति बंदिस्त अशा क्षेत्रातील घटिते विचारात घेऊनच विज्ञानाची उत्तम ठरेल अशी प्रगती होईल. या अशा प्रकारच्या खटाटोपातून जे निष्कर्ष निघतील त्यांना नियमांचे स्वरूप प्राप्त होईल. अर्थात त्यांची रचना नेमक्या गणिती परिभाषेत केली तरच. वैज्ञानिक कल्पनांचा आजवरचा जो समग्र इतिहास आहे त्यात ती कल्पना अत्यंत महान आणि नवनिर्मितीकारक ठरलेला शोध आहे.

· गॅलिलिओच्या नंतरच्या काळात विज्ञान हे हळूहळू गणितशास्त्राच्या आधाराने अधिक अधिक वाटचाल करू लागले. गॅलिलिओनी आपल्या OPERE IL SATTIA TORE (इ. स. १६५६) ग्रंथात लिहिले आहे. "आपण जोवर गणिताची भाषा शिकून घेतली नाही तोवर हे विश्व म्हणजे काय हे आपणास वाचताच येणे शक्य नाही. म्हणून गणित ज्या भाषेत लिहिले जाते, त्याच्यातील मुळाक्षराशी आपण चांगला परिचय करून घेतला पाहिजे." नेहमीप्रमाणे प्रख्यात तत्त्वज्ञ प्लेटो यांनी हा विचार केव्हाच व्यक्त केला होता. प्लेटो यांनी असे म्हटले होते "जग हे ईश्वराने मानव जातीला लिहून पाठविलेले पत्र आहे आणि ते गणिती भाषेत लिहिलेले होते." (The world was God's epistle written to mankind, and it was written in Mathematical letters) आपण या ठिकाणी उन्मेखून लक्षात ठेवले पाहिजे की, गॅलिलिओ आणि आधुनिक भौतिकशास्त्राचे संस्थापक समीकरणे वापरत नसत. ते गुणोत्तरांचा (Ratios) वापर करीत. समीकरणांचा वापर भौतिक शास्त्रात होण्यासाठी काही दशकानंतर अधिक पसंती दाखवली जात होती. विद्यमानकाळी तरी गणिती समीकरणे हे विज्ञान या ज्ञान-क्षेत्रातील फारच महत्त्वाचे हत्यार होऊन बसले आहे. ते इतक्या महत्त्वाला पोहोचले आहे की, निदान निश्चितपणे बहुतेक भौतिक-वैज्ञानिक आणि बहुसंख्य इतर वैज्ञानिकांनी यांच्यात गणिती समीकरण हा एक श्रद्धेचा भाग झाला आहे. त्यातील बहुतेक वैज्ञानिकांना असे वाटते की, ते ज्या प्रश्नाच्या अभ्यासात व्यस्त आहेत त्यातील घटितांचे वर्णन करण्यासाठी एक मूलभूत स्वरूपाचे गणिती समीकरण अस्तित्वात आहे, अथवा त्या अभ्यासात त्यांना आढळणाऱ्या घटितांना एका सूत्रात बांधण्यासाठी एका योग्य अशा गणिती समीकरणाचा शोध कोणीतरी कधीतरी लावील. रिचर्ड फेनमान या नोबेल पारितोषिक विजेत्याबद्दलचा उल्लेख यापूर्वी येऊन गेलाच आहे. त्यांच्या · अवलीया प्रकृतीला अनुसरून त्यांनी वैज्ञानिक भाकिते वर्तविण्याचा छंदच होता. ते एकदा असे म्हणाले की, होता होता असे होईल की, निसर्गासंबंधीचे जे मुलभूत नियम आहेत ते गणिती समीकरणांच्या परिभाषेत मांडण्याची आवश्यकताच राहणार नाही. त्यांना इतरही अनेक मार्गांनी व्यक्त करता येईल. बुद्धिबळातील खेळांच्या नियमासारख्या आणखी काही नियमांनी तेच अधिक चांगल्या प्रकारे व्यक्त केले जातील.

विद्यमानकाळी तरी विज्ञानाचे बहुतेक मूलभूत असे नियम अत्यंत कार्यक्षम पद्धतीने गणिती समीकरणांच्याद्वारा व्यक्त करता येतात असे दिसते. खुद्द रिचर्ड फेनमानही याला अपवाद नाहीत. येथे एक मुद्दा उन्मेखून लक्षात ठेवला पाहिजे. गणिती समीकरणे रचण्याचा वा मांडण्याचा ध्यास वैज्ञानिक घेत नाहीत. वैज्ञानिकांपैकी अनेकांची गणितशास्त्राशी नुसती तोंड ओळख असते. हा मुद्दा एका प्रसिद्ध विनोदाद्वारे चांगलाच अधोरेखित झालेला आहे. एक भौतिकशास्त्रज्ञ, एक अभियंता आणि एक जीवशास्त्रज्ञ यातील प्रत्येकाला π पाय हा संख्येच्याद्वारा व्यक्त करावयाचा झाला तर तुम्ही तो कसा कराल असा प्रश्न विचारण्यास आला. भौतिक शास्त्रज्ञाने π पाय = ३. १४१५९३ एवढा आहे. फारतर ०. ००००० १ एवढ्या संख्येने तो अलीकडे पलीकडे असले. अभियंताचे उत्तर होते सुमारे ३, जीवशास्त्रज्ञाने उलट प्रश्न केला π पाय ही काय भानगड आहे?

हे अर्थातच अतिशयोक्त असे अर्कचित्र आहे. (Caricature) काही भौतिकशास्त्रज्ञांना गणितशास्त्रात थोडी फार गती असते. काही अभियंते आपल्या कामात गणितशास्त्राचा वापर करण्याबाबत फारच वरच्या दर्जाचे कौशल्य, चमक व हुशारी प्रदर्शित करतात. (याचे उत्तम उदाहरण भौतिकशास्त्रज्ञ पॉल डिरॅक) काही सैद्धांतिक जीवशास्त्रज्ञ विलक्षण ज्ञानी असे गणिती असतात. हे सारे जरी असले तरी प्रत्येक अर्कचित्रात सत्याचा अंश थोडा बहुत असतोच. गणित शास्त्राकडे बघताना उपयुक्ततावादी दृष्टिकोन घेण्याची प्रवृत्ती अभियंत्याची असते. म्हणूनच गणितशास्त्राला अभिप्रेत असलेल्या नेमकेपणाऐवजी गोळाबेरजेने येणारे उत्तर त्यांना अधिक पसंत असते. तशा प्रकारची गोळाबेरजेची उत्तरे काढण्यात ते प्रविण असतात, वा पटाईत असतात. सर्वच विज्ञान ज्ञानशाखात भौतिकशास्त्र हे गणितशास्त्रावर जास्तीत जास्त विसंबून असते. याउलट जीवशास्त्रज्ञ हे कमीतकमी. गॅलिलिओंच्या काळापासून गोष्टी साध्या व सुटसुटीत ठेवून भौतिकशास्त्राने जोरदार आगेकूच केलेली आहे. गोष्टी वा घटिते साधी व सुटसुटीत करण्यासाठी दैनंदिन जीवनात आढळणाऱ्या गुंतागुंतीच्या गोष्टीत वा घटिते त्यातील अंतर्गत भाग अलग अलग करून भौतिकशास्त्राने आपली प्रगती साध्य केलेली आहे. परंतु या अशा प्रकारचा Reductionism (क्षपणवाद) हा पर्याय जीवशास्त्रज्ञांना नेहमीच उपलब्ध नसतो. अत्यंत गुंतागुंतीच्या शरीररचना असलेल्या सजीव प्राण्यांचे जगत हे त्या शास्त्रज्ञांचे कार्यक्षेत्र. या प्राणी जगतातील सर्व प्राणिसमूह हे एकमेकांशी संबंधित असतातच. शिवाय त्यातील प्रत्येक प्राणी अणुशास्त्रीय परिभाषेचा बोलावयाचे झाल्यास अत्यंत गुंतागुंतीची संरचना असलेला. The Origin of Speciers हा जगत् विख्यात जीवशास्त्रज्ञ सर चार्लस डार्विन यांचा ग्रंथ हा जीवशास्त्रज्ञांना 'गीता बायबल' या धर्म ग्रंथाइतका वंदनीय व प्रमाण आहे. सर्व प्राणिजगत एका सूत्रात कसे बसवता येईल हे या ग्रंथाने दाखवून दिले. परंतु या वंदनीय ग्रंथात गणितशास्त्राचा कमीतकमी उपयोग करण्यात आला. सर चार्लस डार्विन यांनी आपल्या जीवशास्त्रीय उत्क्रांतीविषयक सिद्धांत सादर करताना 'नैसर्गिक निवड' या तत्त्वाचा वापर केला. पण उन्मेखून लक्षात घेण्याचा मुद्दा हा आहे की, त्यात एकाही गणिती समीकरणाचा उपयोग केलेला नाही. भूगर्भशास्त्रज्ञ, फार प्राचीनकाळी विद्यमानकालीन पाचही खंडे हा एकच सलग भूभाग होता.



अनुक्रमणिका

कालौघात ही खंडे अलग झाली असा सिद्धांत आहे. (Continental Drift) या सिद्धांताचे समर्थन करणारे पहिले काही शोध निबंध पहिल्या महायुद्धातनंतरच्या लगेचच म्हणजे सुमारे इ. स. १९२०च्या आसपास प्रसिद्ध झाले. त्यातल्या एखादी शोध निबंधात एखादे गणिती समीकरण वापरलेले नाही.

आधुनिक जीवशास्त्रात, गणिती समीकरणांचा समावेश जरूर आहे. जीवशास्त्रीय उत्क्रांती-वादातील काही कल्पना, गणिती समीकरणांच्याद्वारा व्यक्त करता येतात असे प्रतिपादन करणारे काही शोध निबंध प्रकाशित झालेले आहेत. या शोध निबंधातील गणिती समीकरणांच्या मदतीने या सजीव प्राणिसृष्टीबद्दल अत्यंत संपन्न व विविधतायुक्त अशी अनेक प्रकारची अंतर्दृष्टी प्राप्त होते. उदा. रेडडिअर या प्राण्यातील (Red Deer) नर-मादी ज्यावेळी समागम करतात, त्यावेळी त्यांचे वर्तन कशा प्रकारचे असते. Wasp वास्प या किड्यांच्या समूहातील नर-माद्यांचे प्रमाण किती? इत्यादी एखाद्या बागेत असलेल्या तळ्यातील माशांची संख्या एकसारखीच बदलत असते. हे कसे होते हे वरवर सोप्या भासणाऱ्या गणिती समीकरणांच्याद्वारे समजावून घेता येते. अथव माळावरील (Grouse) ग्राऊज पक्षांच्या संख्येत बदल का? याचा उलगडा गणिती समीकरणांच्या मदतीने होतो. सैद्धांतिक Ecology अधिवासिक शास्त्रात Quadratic नकाशा असे नाव असलेला एक नकाशा आहे. Quadritic याचा अर्थ अ x अ पासून अ x अ x अ अशा कल्पनांपर्यंतच्या ($a^2$ to $a^n$) संख्याचा समावेश ज्या गणिती समीकरणात असतो त्यांचा वापर करून तयार करण्यात आलेला नकाशा. या गणिती समीकरणांचा वापर इतरही अनेक जीवशास्त्रीय प्रश्नात होतो. महत्त्वाचा मुद्दा असा आहे की, जीवशास्त्रीय गणिती समीकरणांनी दुसऱ्या एका नव्या शास्त्राच्या इतिहासात कळीच्या महत्त्वाची कामगिरी बजावलेली आहे. या नव्या शास्त्राचे नाव आहे Chaos (गोंधळ) विषयक शास्त्र. याचे साधे कारण असे आहे की या गणिती समीकरणात गोंधळी वागणूक अंतर्भूत आहे. म्हणजे असे आहे की, आरंभीला जी परिस्थिती असते. तिच्या अनुरोधाने पुढील वाटचाल होण्याबाबत 'गोंधळी वागणूक' कमालीची संवेदनाक्षम असते. या गणिती समीकरणाबाबत आणखी एक मुद्दा नमूद केलाच पाहिजे. शालेय स्तरावरील विद्यार्थ्यांना अभ्यास करता येईल इतके साधे व सोपे असे हे गणिती समीकरण आहे. पण या गणिती समीकरणाचा वापर करून इ. स. १९७७ साली वैज्ञानिकांच्या लक्षात काही गोष्टी आल्या. उदा. काही गणिती समीकरणे गत-इतिहासाच्या परिभाषेत भविष्य काळासंबंधी भाकिते वर्तविताना दिसतात. बहुसंख्य वैज्ञानिकांनाही तसेच वाटत होते. परंतु वास्तवात असे आढळून येते· की, या गणिती समीकरणांच्या कुवतीबाहेर अशी भाकिते वर्तविणे आहे.

एवंच प्रख्यात शास्त्रज्ञ पॉल डिरॅक म्हणाले होते त्यासारखेच हे आहे. त्यांनी सांगितले होते. **My equation is smarter than I am** (मी मांडलेले गणिती समीकरण हे माझ्यापेक्षाही हुशार व तरतरीत आहे)

**–नाना जोशी**



अनुक्रमणिका

